# मनोहरची आकाशवाणी

( आवृत्ति दुसरी )

प्रो. ना. सी. फडके

कमला प्रकाशन

३

एकमेव विक्रेते

रामकृष्ण बुक डेपो

गिरगांव : मुंबई ४

## प्रो. फडके यांच्या कादंबऱ्या—

| | |
|---|---|
| अल्ला हो अकबर | ( २ री आवृत्ति ) |
| कुलाब्याची दांडी | ( २ री ,, ) |
| जादूगार | ( ४ थी ,, ) |
| दौलत | ( ४ थी ,, ) |
| अटकेपार | ( २ री ,, ) |
| निरंजन | |
| कलंकशोभा | ( २ री ,, ) |
| आशा | ( ३ री ,, ) |
| उद्धार | ( ३ री ,, ) |
| काश्मिरी गुलाब | |
| प्रवासी | ( ३ री ,, ) |
| समरभूमि | ( २ री ,, ) |
| उन्माद | |
| गुप्त प्रायश्चित्त | |
| इंद्रधनुष्य | |
| प्रतिज्ञा | |
| वादळ | ( २ री ,, ) |
| शाकुंतल | ( सरकार जमा ) |
| अखेरचं बंड | ( २ री आवृत्ति ) |
| बस नंबर बारा | |

# मनोहरची आकाशवाणी

| | |
|---|---|
| नाकेबंदी | Closed Frontiers |
| आपण एकटीच कां आहोत ? | We are not alone |
| गुप्त प्रायश्चित्त | Secret Sentence |
| पवित्र ज्योत | Sacred Flame |
| नो पासारान् | No Pasaran |
| टोपीवाल्यांचा किल्ला | Hatters Castle |
| क्षमस्व ! | Forgive us our Trespasses |
| बद्नामीचा खटला | Action For Slander |

# भाषण पहिलें

रवीलासुद्धा जें दिसत नाहीं तें कवीला दिसतं असं एक सुभाषित आहे; व त्यांतला साधा अभिप्राय येवढाच समजायचा कीं या संसारांतल्या ज्या घटना सामान्य माणसाला सामान्य वाटतात त्याच कलावंत लेखक आपल्या दृष्टीनं पाहून सांगूं लागला कीं वाचकांचं चित्त वेधून घेतात. लेखक आपल्या कलेच्या सहाय्यानं त्यांत नाट्य उत्पन्न करतो. साध्या घटनांची जर ही गोष्ट, तर ज्या घटना मुळांतच नाट्यपूर्ण अन् अंतःकरण थरारून सोडणाऱ्या असतील, त्या कादंबरीच्या रूपानं निष्णात लेखक सांगूं लागला कीं किती मनोवेधक होत असतील तें काय सांगावं? या दृष्टीनं आज जर्मनी इटली, स्पेन, रशिया, चीन इत्यादि देशांत राजकीय घडामोडींनं जे प्रचंड उल्कापात होत आहेत. त्यांवरील कादंबऱ्या वाचण्यास मं

फार उत्सुक असतों. जर्मनींत हिटलरकडून ज्यू लोकांचा जो अवन्वित छळ झाला व होत आहे, त्याचं समर्थन करण्यासाठी नाझी सरकारकडून एक ठराविक विचारसरणी पुढें करण्यांत येते. ही विचारसरणी जिवंत अंतःकरणाच्या कोणाहि माणसास पटणं शक्य नाहीं ही पहिली गोष्ट; पण ती तर्कशुद्ध मानली तरीसुद्धां ज्यू लोकांचा भयंकर छळ कांहीं नाशाबीत होत नाहीं. या छळामुळं नोबेल प्राइझ मिळविणारा जर्मन कादंबरीकार ' टॉमस मान ' यानें स्वदेशत्याग केला व तो आतां अमेरिकेंत राहणार आहे म्हणतात. ' फरांझ वेर्फेल ' या कादंबरीकारावरहि तीच पाळी आली. हिटलर-कडून ज्यांचं सर्वस्वहरण झालं, असे हजारों ज्यू कसेबसे प्राण वांचवून जर्मनींतून पळून जाऊन आज फ्रान्समध्यें अगर इंग्लंडमध्ये दिवस कंठीत आहेत. त्यांची हृदयद्रावक कहाणी सांगणाऱ्या तीन कादंबऱ्या माझ्या वाचण्यांत झाल्या. ' जोलांडा फोल्डेस ' ची ' दि स्ट्रीट ऑफ दि फिशिंग कॅट ' ही एक. हिला चार हजार पौंडांचं बक्षीस मिळालं आहे. ' मिस लिलोलिके ' ची ' कॅन्सल ऑल व्हाऊझ ' ही दुसरी आणि ' ब्रुनो फ्रँक ' याची ' क्लोज्ड् फ्रॉण्टिअर्स ' ही तिसरी. तुमच्यांपैकी ज्यांना शक्य असेल, त्यांनीं या तिन्ही कादंबऱ्या वाचाव्या. परंतु या तिहींत सर्वांगसुंदर, चटकदार व मनोवेधक कोणती असं तुम्हीं मला विचारलंत, तर मी म्हणेन ' ब्रूनो फ्रँक 'ची ' क्लोज्ड् फ्रॉंटिअर्स ' अर्थात् ' नाकेबंदी ! ' ( प्रकाशक : मॅकमिलन, किं. ७ शि. ६ पेन्स. )

चित्रकारांच्या सर्वसंमत शिरस्त्याप्रमाणें गडद काळा व लाल अथवा गुलाबी यांची रंगसंगति योग्य समजली जाते की नाही मला नक्की माहीत नाहीं; पण माझ्या एका चित्रकार-मित्रांनीं मजजवळ असे उद्गार काढले होते, कीं या रंगाच्या संगतीचा प्रयत्न सहसा कोणी करीत नाहीं; कारण ती सफाईनं साधून चित्राचं सौंदर्य कायम ठेवणं फार कठीण आहे. ' नाकेबंदी ' ही कादंबरी प्रथम जेव्हां मी वाचून संपविली, तेव्हां काळा, लाल आणि गुलाबी या रंगांत काढलेलं एक सुंदर चित्र पाहिल्यासारखं मला वाटलं ! नाझी सत्ताधाऱ्यांची

निर्दय कृत्यें, हिटलरच्या हस्तक हेरांचे व सैनिकांचे अत्याचार, ज्यू स्त्रीपुरुषांची विटंबना इत्यादि भीषण घटनांच्या गडद काळ्या पार्श्वभूमीवर मानवी सदभावना, सात्विक आकांक्षा, विद्यालालसा, आशा व प्रीति यांची कुठं लाल तर कुठं नाजूक गुलाबी चित्रं या कादंबरीत काढलेली आहेत. ती मनोज्ञ व्हावीत म्हणून कादंबरीलेखकानं जे कसब दाखविलेलं आहे तें उलगडून पाहण्यासारखं आहे. त्याबद्दल या लहानशा भाषणांत मला जेवढं सांगतां येईल तेवढं मी सांगतों.

नाझी पक्षाच्या हातांत जर्मनीच्या राज्यकारभाराची सूत्रं गेल्याबरोबर जी जुनी छोटीमोठी राजघराणी नामशेष करण्यांत आलीं, त्यांपैकीं एका राजघराण्यांतील राजपुत्र 'लुड्विग' याच्या जीवनातील प्रसंग 'नाकेबंदी' मधें वर्णिलेले आहेत. लुड्विग अवघा दहा वर्षाचा होता, तेव्हा त्याच्या बापाचं राज्य खालसा झालं. त्या वेळेपासून पुढच्या सुमारें चवदापंधरा वर्षातील हकीगतीनीं लेखकानं एकंदर कथानक गुंफलं आहे. लुड्विगचा शिक्षक 'ऑटो स्टायगर' राजसत्तेचा विलक्षण अभिमानी होता. हिटलरची उपटसुंभ राजवटी दीर्घ काल टिकणार नाहीं, जर्मनींत पुन्हा राजसत्ताक स्थापन होईल, असा त्याचा विश्वास होता आणि जर्मनीच्या राज्यपदावर चढण्यासाठीं लुडविगचा अवतार आहे, अशी त्याची श्रद्धा होती. लुडविगला आपल्या शिक्षकाची हीं स्वप्नं वेडेपणाचीं वाटत; पण त्याच्याबद्दल त्याच्या मनांत आदरभाव व निष्ठा मात्र अतोनात होती. लुडविग मोठा झाला, तेव्हां उच्च शिक्षणासाठीं बर्लिन शहरीं गेला व तेथें प्रो. रोटेक यांच्या हाताखालीं अभ्यास करूं लागला. 'चित्रकलेचा इतिहास' हा प्रो. रोटेकचा विषय होता आणि त्या विषयांतील एक असामान्य अधिकारी संशोधक म्हणून त्याची त्रिखंड कीर्ति होती. त्याच्या विद्वत्तेविषयीं व विदारक चिकित्सेविषयीं लुडविगला अमर्याद आदर व कौतुक वाटूं लागलं व त्याच्या सहवासांत तो शक्य तितका काळ घालवूं लागला. प्रो. रोटक व त्याची तरूण, सुंदर–पुस्तकांत अहर्निश डोकं खुपसून बसणाऱ्या अभ्यासजड संशोधकाशीं जरा

विजोडच भासणारी–पत्नी ‘ सुझाना ’ हीं उभयतां त्याला अतिशय अगत्यानं अन् प्रेमानं वागवीत. सुझाना आपल्याविषयीं जें अगत्य दाखविते तें सामान्य ममतेहून अधिक नाजुक स्वरूपाचं असून आपल्याहि मनांत तिच्याविषयीं आसक्ति उत्पन्न होत आहे असं लुडविगला आढळून आलं व त्याच्या पापभीरु सरळ मनाला या प्रकाराची भीति वाटूं लागली. या विचित्र पाशांतून आपल्याला कसं सुटतां येईल याचा तो विचार करूं लागला; पण त्याची चिंता अकल्पितपणें दूर झाली. ज्यू लोकांची हकालपट्टी करण्याचा हिटलरचा सोटेशाही उपक्रम एकदम जोरानं सुरू झाला आणि त्या उपक्रमास प्रो. रोटेक बळी पडला. त्याला युनिव्हर्सिटींतून बडतर्फ करण्यांत आलं व तो जर्मनीतच राहिला तर त्याचा प्राणघातहि होईल अशीं चिन्हं दिसूं लागलीं. लुडविगनं आपल्या पदरचे पैसे खर्च करून आपल्या गुरूची आणि गुरुपत्नीची जर्मनीबाहेर रवानगी केली. रोटेक-वांचून बर्लिनचं विश्वविद्यालय त्याला शुष्क वाटूं लागलं. त्यानं बर्लिनला रामराम ठोकला !

लुडविगचा बाप मरण पावला. हिटलरच्या ज्यू लोकांवरील जुलमाला याच सुमारास ऊत आला. देशांत क्रान्ति घडवून आणून राजसत्ता पुन्हा प्रस्थापित करायला काळ फार अनुकूल आहे असं स्टायगरला वाटूं लागलं व जुन्या राजवटींतील कांहीं सेनापतींच्या सहाय्यानं लुडविगला गादीवर बसविण्याचं गुप्त कारस्थान त्यानं सुरू केलं. स्वतःची फारशी उत्सुकता नसतांहि आपल्या प्रिय शिक्षकाच्या आग्रहाखातर लुडविग या कारस्थानांत सामील झाला; पण हें कारस्थान फुटलं. या गुप्त कटाची मूळ कल्पना व सारी रचना आपली अशी खोटी कबुली देऊन स्टायगरला आणि इतरांना वांचविण्याचा लुडविगनं प्रयत्न केला; पण तो साधला नाहीं. हिटलरच्या हेरांनीं त्याच्या साऱ्या गुप्त खलबतांची फोनोग्राफ–रेकॉर्डस् घेतली होतीं ! सगळ्यांची धरपकड झाली. आता आपणां सर्वांना गोळ्या घालून ठार करण्यांत येईल याबद्दल लुडविगची खात्री होती. कारण

जर्मनींत असले प्रकार त्या वेळीं सर्रास चालू होते. पण काय झालं कुणास ठाऊक, लुडविगला फक्त सशस्त्र पाहाऱ्यांत जर्मनीच्या हद्दीबाहेर पोचविण्यांत आलं व 'तूं परत आलास तर तुझ्या शिक्षकाला व इतर कटवाल्यांना ठार करण्यांत येईल,' अशी समज देण्यांत आली !

अशा रीतीनं प्रो. रोटेक देशत्याग करून जिथं राहिला होता तिथंच लुडविग गेला. आपद्ग्रस्त स्थितींतहि प्रोफेसर रोटेकचा व्यासंग चालूच होता आणि युरोपियन चित्रकलेसंबंधी एक महत्वाचा संशोधनात्मक ग्रंथ लिहिण्यांत तो मग्न झाला होता. लुडविगची पुन्हा भेट झाल्यामुळं प्रो. रोटेकला फार आनंद झाला. सुझानाला तर फारच झाला. ती व लुडविग एकमेकांच्या निकट सहवासांत अधिकाधिक येऊं लागलीं. दोघांनी एकमेकांची अनुरक्ति ओळखली आणि अखेर संयमाचं बंधन त्यांनी झुगारून दिलं. लुडविगचं सुझानावरील प्रेम मनःपूर्वक होतं. 'गुरुपत्नीशीं आपण व्यभिचार केला हें फार वाईट झालं, पण आतां निदान आपल्या गुरूशीं आपण प्रतारणा करूं नये, त्याच्याजवळ प्रामाणिकपणानं आपला व सुझानाचा संबंध कबूल करावा,' असं लुडविगला वाटूं लागलं. मनाची मोठी तयारी करून तो रोटेकला भेटायला गेला. पण तिथं रोटेककडून त्याला कळलं, की सुझाना गृहत्याग करून नाहीशी झाली होती ! सुझाना गेली ! तिच्या पतीला बसला नसेल येवढा दुःखाचा धक्का लुडविगला बसला ! आपल्या जीवनांत कांही अर्थ नाही असं लुडविगला वाटूं लागलं आणि प्रेमनिराशेच्या जाचणीनं मरून वाया जाण्यापेक्षां आपल्यासाठीं बंदिवासांत पडलेल्या आपल्या प्रिय शिक्षकाला मुक्त करण्याचा साहसी प्रयत्न करतां करतां तरी मरावं असा त्यानं निश्चय केला.

पण असा प्रयत्न करणं महाकठिण कर्म होतं. आपण पकडले गेलों तर आपला तर प्राणघात होईलच; पण ज्या स्टायगरला

मुक्त करण्याचा आपला हेतु, त्यालाहि ठार करण्यांत येईल हें लुडविग पुरतेपणीं जाणून होता. परंतु ज्यानं आपल्यावर अमर्याद प्रीति व निष्ठा ठेवली व जो केवळ आपल्यासाठीं संकटांत पडला, त्याच्या सुटकेसाठीं प्रयत्न केल्यावांचून आपलं जीवित व्यर्थ होय अशी त्याच्या मनाची तयारी झाली होती. त्यानं बेमालूम वेषांतर केलं, नांव बदललं, खोटा पासपोर्ट मिळविला, जर्मनींत पुन्हा प्रवेश केला, लाचलुचपतीसाठीं पैसे पेरले आणि अखेर मोठ्या शिताफीनं व साहसानं स्टायगरची सुटका केली. पण नुसतं येवढं करून भागण्या सारखं नव्हतं. हिटलरचा हात जिथं पोंचणार नाहीं, अशा स्थळीं जाऊन पोंचल्याखेरीज आपला किंवा आपल्या शिक्षकाचा प्राण सुरक्षित समजतां येणार नाहीं हें लुडविगला उघड दिसत होतं. त्यानं प्रयत्नांची शिकस्त करून स्टायगरसह लंडन गाठलं. पोटापुरते पैसे मिळविण्यासाठीं तो शिकवण्या करूं लागला व चित्रकलेवर एक संशोधनात्मक ग्रंथ लिहिण्याची तयारी करण्यासाठीं तो लंडनच्या जगविख्यात ग्रंथालयांत जाऊन तिथं वाचनांत तासन् तास घालवूं लागला. त्याचा वृद्ध शिक्षक स्टायगर एखाद्या मातेप्रमाणं गृहव्यवस्था पाही. लुडविगचं पुत्रवत् संगोपन करण्यापलीकडे त्या राजनिष्ठ वृद्धाला आतां आयुष्यांत दुसरं कांहीं कामच उरलं नव्हतं.

मात्र लुडविग पूर्ण सुखांत नव्हता. सुझानानं त्याच्या हृदयावर केलेली प्रेमनिराशेची जखम आतां जुनी झाली होती; पण दुसरीच एक चिंता व हुरहूर त्याच्या मनाचा छळ करीत होती.

त्याच्या पित्याला दुर्मिळ नाण्यांचा संग्रह करण्याचा फार षोक होता आणि या संबंधांत पुराणवस्तूंची पारख करण्यांत निष्णात असलेल्या ‘ वेट्झलार ’ नांवाच्या एका व्यापाऱ्याचा व त्याचा गाढ स्नेह झाला होता. लुडविग वेषान्तर करून जर्मनींत गेला व स्टायगरच्या सुटकेचा प्रयत्न करूं लागला त्या वेळीं ‘ वेट्झलार ’चा ड्रायव्हर ‘ मार्टिस ’ याची अकस्मात् गांठ पडून त्याची लुडविगला फार मदत

झाली होती आणि त्याच्याकडूनच त्याला 'वेट्झलार'ची करुण कहाणीहि कळली होती. हिटलरनं आपल्या सत्तेच्या जोरावर ज्यू लोकांची जी राक्षसी लांडगेतोड केली होती, तिला वेट्झलार बळी पडला होता. त्याचं अमूल्य व दुर्मिळ पुराणवस्तूंचं दुकान लुटण्यांत आलं होतं, त्याच्या सर्व मालमत्तेवर डाका घालण्यांत आला होता व तो स्वतःहि ठार झाला होता. त्याची एकुलती एक मुलगी 'रूथ' प्रवासासाठीं परदेशीं गेली होती म्हणून वांचली म्हणायची ! ! परंतु ती आतां कुठं होती कुणालाच माहीत नव्हतं. लुडविगनं या रूथला कित्येक वर्षांपूर्वी ती आपल्या बापाबरोबर राजवाड्यावर आली असतांना एकदांच काय तें पाहिलं होतं. पण या वेळीच तिच्या कारुण्यपूर्ण, स्वाभिमानी, मोहक मुद्रेचा ठसा त्याच्या मनावर पक्का उठला होता व मार्टिसकडून तिची शोककथा त्याला कळली तेव्हां तिच्याविषयीं एक प्रकारची गाढ सहानुभूति त्याच्या मनांत उत्पन्न होऊन त्याला वाटूं लागलं, रूथला शोधून काढलं पाहिजे. अन् तिच्यावर आपल्या मायेची पाखर घातली पाहिजे. परंतु रूथचा शोध लागायचा कसा ? या प्रश्नाचं उत्तर त्याला कांही केल्या सांपडेना. मनांतल्या मनांत तो सचिंत व कष्टी झाला.

पण एके दिवशीं वाचनालयांत ग्रंथवाचन करीत असतां त्याचं लक्ष सहज शेजारीं वाचीत असलेल्या व्यक्तीच्या हाताकडे गेलं. ती कोणीतरी नाजुक स्त्री असली पाहिजे असं त्याला वाटलं आणि त्या हाताच्या मनगटाकडे त्यानं अधिक लक्षपूर्वक पाहिलं तों वेट्झलारच्या संग्रहांत त्यानं कित्येक वर्षांपूर्वी पाहिलेलं एक दुर्मिळ नाणं त्याला दिसलं. 'तूं वेट्झलारची मुलगी रूथच का ?' असं एका चिठी-वर लिहून त्यानं ती चिठी पुढं केली. रूथनं चिठी वाचली, चुरगाळली अन् ती उठून निघून जाऊं लागली. पण लुडविगनं तिला अडवलं व म्हटलं, 'आज कित्येक दिवस मी तुझ्या शोधांत आहे.' आपल्याला कुणी ओळखावं, आपल्या ज्या पितृसुखाची आणि वैभवाची मदांध हिटलरकडून राखरांगोळी करण्यांत आली, तिची आठवण करून

देऊन कुणी आपल्याविषयीं करुणा दाखवावी हें रूथला रुचत नव्हतं असं दिसलं. ती विलक्षण स्वाभिमानी होती व पित्याच्या वियोगानंतर अनेक संकटं अन् दुःखं भोगून गरिबींत पण स्वाभिमानाचं रक्षण करून आतां लंडनमध्यें राहिली होती. लुडविग तिची मनःस्थिति ओळखण्याइतका चतुर होता. त्यानं फार हळुवारपणानं तिचं सांत्वन करून स्नेह जोडण्याचं धोरण राखलं. लवकरच स्नेहाचं रूपांतर मधुर प्रीतींत होऊं लागलं. पण याच सुमारास लुडविग तिला घेऊन एका जलशाला गेला असतांना तिथं त्याला सुझाना दिसली. तिच्याशीं बोलण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती; तरी तीच आपण होऊन त्याच्याजवळ आली व आपला हात चुंबनासाठीं दिल्याप्रमाणं त्याच्या ओठावर टेकून ती आपल्या पुरुष-मित्राबरोबर निघून गेली. ती आतां अगदीं निर्लज्ज स्वैराचरणी झाली होती, हें लुडविगनं ओळखलं. तिच्या त्या विचित्र सलगीचा रूथजवळ तो खुलासा करूं लागला; पण ती एक शब्दहि ऐकून घेईना. लुडविगच्या चारित्र्याबद्दल तिला पक्काच संशय आला होता. तिनं रागानं त्याचा निरोप घेतला !

दुर्दैव असं, कीं रूथ कुठं राहते तें लुडविगला माहीत नव्हतं. एखाद्या वेड्यासारखा तो तिच्या बिऱ्हाडाचा शोध करूं लागला. ती वाचनालयांत पुन्हा येईल व भेटेल अशा आशेनं तिथं तो रोज घटकान् घटका तिची वाट पाहात बसूं लागला. अखेर त्याच्या लक्षांत आलं, कीं वाचनालयांत येणाऱ्या प्रत्येक माणसाचा पत्ता तिथल्या हजेरीपटांत नोंदलेला असतो. त्यानं रूथचा पत्ता पाहिला आणि त्या जागीं तो गेला. पण रूथ ती जागा सोडून गेली होती. तरी लुडविगनं प्रयत्न सोडला नाहीं आणि अखेर दैव उघडून त्याला ती सांपडली. पण सांपडली ती कशा स्थितींत ?—टॉनसिल्सच्या दुखण्यानं फणफणत्या तापांत अंथरूणावर पडलेली !

काय वाटेल तें करून रूथला त्या प्राणघातक दुखण्यांतून सोडवायला हवी होती. अगदीं निष्णातातल्या निष्णात डॉक्टरकडून

तिच्या टॉन्सिल्सवर ऑपरेशन करवून घ्यायचं लुडविगनं ठरवलं; पण अशा डॉक्टरची फी हजार दीड हजार रुपयांच्या खालीं नव्हती ! इतके पैसे आणायचे कुठून ? लुडविग अगदीं हताश, वेडापिसा होण्याच्या बेतांत होता. पण तितक्यांत स्टायगरनं एक ताईत ट्रंकेमधून काढून त्याच्यापुढं ठेवला. हा ताईत लुडविगच्या आईनं मरतांना त्याच्या गळ्यांत बांधला होता. त्याचा बाप मोडल्यापासून लुडविगनं तो काढून पेटींत ठेवला होता. त्याच्या मोलाची त्याला कल्पनाहि नव्हती. पण आतां लुडविग तो ताईत घेऊन जवाहिऱ्याकडे गेला तों त्याला समजून आलं, कीं तो ताईत म्हणजे साऱ्या जावाहिऱ्यांना ठाऊक असलेला एक अत्यंत नामांकित तीस हजार रुपये किंमतीचा अलंकार होता. लुडविगला त्या अलंकाराच्या कीर्तीपेक्षां त्याच्या मोलाचं अगत्य अधिक होतं. त्यानं रूथला डॉक्टरकडे नेलं व तिला दुखण्यांतून वांचवलं. लवकरच रूथची प्रकृति चांगली सुधारली. लुडविगनं जो संशोधनात्मक ग्रंथ लिहिला होता तोहि एका प्रकाशकानं घेतला. लुडविग व रूथ दोघंहि पूर्ण सुखी झालीं !

'नाकेबंदी'चं हें कथानक साधंच आहे, नाहीं का ? त्यांत अनेक मुख्य पात्रांची गर्दी नाहीं किंवा वाचकांस भांबावून सोडणारी प्रसंगांची गुंतागुंत नाहीं ! पण पुस्तक घेऊन वाचायला लागलं की ते संपवीपर्यंत मनावरची पकड सैल होत नाहीं; पुढंपुढं जात असतां चित्ताला सारख्या गुदगुल्या होत असतात अन् कादंबरीचं अखेरचं वाक्य वाचलं, कीं 'अरेरे ! एका सुंदर पुस्तकाची संगति संपली' अशी सूक्ष्म हुरहूर लागते ! कोणत्याहि कादंबरीच्या उत्कृष्टपणाचा हा हमखास पुरावा असतो. 'नाकेबंदी' अशी सरस करण्याकरितां तिच्या लेखकानं कोणतं कौशल्य लढविलं असेल ?

ब्रूनो फरँक यांनी 'नाकेबंदी'च्या कथानकाची पूर्ण जुळवणी आधी केली असेल हें संभवनीय नाहीं. अशी सबंध कथानकाची जुळणी आगाऊ कधींच होत नाहीं. पण हें जितकं खरं तितकंच

हेंहि निर्विवाद, कीं कथानकाचा कच्चा आराखडा तयार करतांना त्यांतील मुख्य मुख्य पेचप्रसंग त्यांनी ठरविले असतील. वाचकांच्या मनावर विस्मय आणि जिज्ञासा यांचा दुहेरी परिणाम होत राहावा यासाठीं कादंबरीच्या कथानकांत लेखक परस्परविरोधी द्रव्यं पेरून ठेवण्याची दक्षता घेत असतो. हीं स्फोटक द्रव्यं एकमेकांवर आपटलीं, कीं भडका उडतो व त्याची शोभा पाहण्यांत वाचक भान विसरतो. 'नाकेबंदी 'च्या लेखकानं कथानकांत किती परस्परविरोधी प्रवाह खेळवले आहेत व त्यांतून पेचप्रसंगांची मालिका कशी निर्माण केली आहे तें नीट पाहा, म्हणजे तुम्हांला फार गंमत वाटेल.

नाझी सत्तेचा जुलूम अन् ज्यू लोकांची असहायता, जुन्या राजवटींतली वैभवशाली घराणीं अन् त्यावर नांगर फिरवायला सजलेल्या हिटलरची क्रूर मदांधता, लुडविगची एक वेळची श्रीमंती अन् नंतरचं दारिद्र्य, त्याच्या अंतःकरणांतल्या सात्विक वृत्ति अन् गुरुपत्नीशीं व्यभिचार करायला लावणारी त्याच्या नवतारुण्याची कामुकता, अशा झटापटी कादंबरीच्या प्रारंभापासून शेवटपर्यंत 'नाकेबंदींत'त सारख्या चालू ठेवल्या आहेत. आणि लुडविगच्या चारित्र्याविषयीं रूथच्या कोमल, निष्पाप मनांत जो संशय उत्पन्न होतो, त्याचा तर मोठा सुंदर झटका कादंबरीच्या अखेरीची रंगत वाढवितो. या अनेक विरोधी प्रवाहांच्या कमीअधिक खळबळींतून एकामागोमाग चित्तवेधक पेचप्रसंग कसे उत्पन्न झाले तें जरा लक्षपूर्वक पाहूं या.

हिटलरच्या अत्याचारी प्रहाराखालीं कोसळणाऱ्या जुन्या दौलतींच्या, संस्कृतीच्या, संस्थांच्या, कलावंतांच्या, धनिक व्यक्तींच्या शोकविव्हल आर्त रवांनी सगळ्याच कादंबरीची पार्श्वभूमि साधली आहे. तेव्हां त्याबद्दल मी अधिक बोलत नाही. या चित्तक्षोभक, उदास, करुण पार्श्वसंगीताचे स्वर ऐकवितां ऐकवितां लेखकानं कोणकोणते महत्वाचे पेचप्रसंग वाचकांच्या दृष्टीपुढून सरकविले आहेत

त्यांकडे मी तुमचं विशेष लक्ष वेधूं इच्छितों. पहिला पेचप्रसंग उत्पन्न होतो तो प्रो. रोटेकची पत्नी सुझाना लुडविगचं चित्त विचलित करते त्या वेळीं. पण ब्रूनो फ्रॅंकचं लेखनकौशल्य हें म्हणायचं, की त्या वेळीं त्या पेचप्रसंगाची आपल्याला नुसती चाहूल ऐकूं येते अन् आता लुडविग शुद्ध राहतो की पतन पावतो अशी भयशंका आपल्याला येते न येते तोंच तो प्रसंग टळतो. सुझाना पती-बरोबर देशांतर करते आणि आपल्याला वाटतं, सुटला लुडविग एका मोठया मोहांतून. लेखकानं त्याची ती सुटका तेवढया वेळेपुरतीच केली आहे याची आपल्याला शंकाहि येत नाहीं. त्यानं आपल्या हातातलं हुकुमी पान लपवून ठेवलेलं असतं. लुडविग कामपाशांतून सुटतो, पण नाझी सत्तेच्या मगरमिठींत सांपडतो. आपल्याला वाटूं लागतं, लुडविग आतां प्राणालाच मुकणार. कादंबरीचीं दोनतृतीयांश पानं उरलेलीं स्पष्ट दिसत असतात, म्हणूनच आपल्याला धीर वाटतो, कीं ‘ नाहीं, लुडविग कांहीं या ठिकाणीं मरणार नाहीं.’ लुडविगला हद्दपार कर-ण्यांत येतं; पण अशा प्रकारें त्याचा प्राण वांचतो तर नैतिक अधःपात पुन्हा जवळ येतो. ज्या पेचप्रसंगाची चाहूल प्रथम एकदां ऐकूं आली, तो आतां साक्षात् प्राप्त होतो. कारण हद्दपारीमुळं लुडविग व सुझाना पुन्हा एकत्र येतात. त्याच्या सात्विक, शुद्ध मनाचा आणि मोहविकाराचा संग्राम सुरू होतो. लुडविगचा मोह अनावर होतो व सुझानाशीं त्यानं केलेल्या एकान्ताचं उन्मादक वर्णन वाचतांना वाच-काला वाटतं, वामसंबंधानं का होईना, पण आतां लुडविग व सुझाना कायमचीं एक झालीं.

पण वाचकाला असं वाटतं न वाटतं तोंच त्याला लेखकानं विस्मयाचा धक्का दिला आहे. पतीला व लुडविगसारख्या प्रिय-करालाहि सोडून सुझाना नाहीशी होते ! आणि गंमत अशी, की सुझानाच्या गृहत्यागाचं वृत्त वाचतांच चकित झालेला वाचक विस्म-याची लाट ओसरल्यावर जेव्हां त्याबद्दल विचार करूं लागतो तेव्हां त्याला कबुली द्यावी लागते, की तिच्या या विलक्षण कृतीशीं सुसंगत

असंच तिचं स्वभावचित्र लेखकानं पहिल्यापासून काढलेलं आहे. लेखकाच्या चातुर्याचा विलास तो हाच ! मुझानाच्या प्रकरणावर याप्रमाणं पडदा पडल्यानंतर पुढं कांहीं काल कथानकाला संथपणा येतो. लुडविगचं वेषांतर, स्टायगरची सुटका, दोघांचं लंडन शहरीं आगमन इत्यादि घटना रहस्यपूर्ण आहेत व लहानलहान युक्त्या योजून लेखकानं त्या खूप चित्तवेधक केल्या आहेत. परंतु त्यांत बडा पेचप्रसंग नाहीं. असा पेचप्रसंग लुडविगला रूथ अकस्मात् भेटते, तिचं प्रिया-राधन तो करतो आणि मग जलशाच्या ठिकाणीं मुझानाच्या आचरट कृतीनं रूथ बिनसते व लुडविगला सोडून नाहींशी होते तेव्हां पुन्हां उत्पन्न होतो. प्रिकराविषयीं विनाकारण गैरसमज उत्पन्न होऊन प्रेयसीनं त्याच्यावर राग धरावा ही कादंबरीकारांची व नाटककारांची अगदीं पेटंट क्लृप्ति आहे. पण 'नाकेबंदी'च्या लेखकानं या गैरसमजाच्या बीजारोपणासाठीं मुझानाची योजना केली आहे ती फार मार्मिक असल्या-मुळं त्या ठरीव ठशाच्या प्रसंगाला बहारीचा ताजेपणा आला आहे. रूथची पुनर्भेट झाल्यावर तिचं दुखणं बरं करण्यासाठीं लुडविगची जी उतावळी, घाबरी धडपड लेखकानं दाखविली आहे, ती वाचकांच्या जिज्ञासेला ताण देणारी कथानकांतील अखेरची गोष्ट होय. हा ताण संपतो तेव्हां गोष्टच संपते आणि त्या दोघां तरुण प्रियजनांच्या आलिंगनाचं वर्णन आपण वाचतों तें शांत कौतुकाच्या वृत्तीत !

कथानकांतल्या लहानमोठया घटनांचे आणि मुख्यमुख्य पेंच-प्रसंगाचे सांधे बेमालूम जुळविण्याचं लेखकाचं कसब जसं तुम्हीं अभ्यासपूर्वक पाह्यला पाहिजे, तद्वतच नीट निरखून पाहण्यासारखी आणखी एक गोष्ट आहे. ही गोष्ट सगळ्याच उत्कृष्ट कादंबऱ्यांत सारखीच नजरेंत भरण्याजोगी असते असं नाहीं; पण 'नाकेबंदी'त ती आहे. ती म्हणजे कादंबरीचा प्रारंभ. ब्रूनो फ्रँकच्या या काद-बरींचं सबंध कथानक मी तुम्हांला सांगितलं आहे आणि कथानकानं एकंदर सुमारें चवदापंधरा वर्षांचा काल व्यापलेला आहे हें तुम्हांला माहीत झालं आहे. पण या पंधरा वर्षांतल्या हकीगती कालक्रमा-

नुसार लेखकानं पुस्तकांत सांगितल्या आहेत असं तुम्हांला वाटतं कीं काय ? छे छे ! ब्रूनो फ्रँकनं या बाबतींत मोठी गंमत केली आहे. त्याच्या कादंबरीच्या पहिल्या प्रकरणांत कसलं वर्णन आहे, माहीत आहे ? जर्मनीच्या हद्दीपलीकडील झेक देशांतल्या एका शहरीं तिन्हीसांजच्या वेळीं कोणी एक थकलेला वाटसरू एका खाणावळीचं दार ठोठावतो, इथपासून कादंबरी सुरू होते. हा वाटसरू म्हणजेच हद्दपार करण्यांत आलेला राजपुत्र लुडविग ! अशा प्रकारे एखाद्या रहस्यमय नवलकथेला सुरवात करावी त्याप्रमाणं सुरवात केल्यावर मी माझ्या ' प्रतिभासाधन ' ग्रंथांत विलोमपद्धति म्हणून जिचं वर्णन केलं आहे, तिचा अवलंब करून ब्रूनो फ्रँकनं कादंबरीचा पुढचा एक विभाग लिहिला आहे आणि या विभागाच्या शेवटी पहिल्या प्रकरणांत सोडलेलं सूत्र पुन्हा हातीं घेतलं आहे. म्हणजे असं म्हणा, कीं एकंदर पंधरा वर्षांपैकीं पहिल्या चवदा वर्षांच्या हकीगतीचा ' पूर्वरंग ' व शेवटच्या वर्षातील घडामोडी म्हणजे मुख्य आख्यान अशा हिशोबानं ब्रूनो फ्रँकनं प्रथम आख्यानाचं ' सूतोऽवाच ' करून ठेवलं आहे. ' अशा संशयी तऱ्हेनं एका भिकार खाणावळींत उतरायला येणारा हा राजपुत्र कोण बरं ? अशी जबर जिज्ञासा तुमच्या मनांत उत्पन्न करून, आतां चवदा वर्षांच्या हकीगती तुम्हांला सांगितल्या तरी तुम्ही जांभया देणार नाहीं, अशी खात्री झाल्यावर त्यानं ' पूर्वरंग ' भरला आहे. आणि मग पुन्हा धागेदोरे सोडले तिथं उचलून घेऊन उरलेलं आख्यान सरळ कालानुक्रमानं सांगितलं आहे ! या पद्धतीनं निरूपणांत केवढी चमत्कृति उत्पन्न होते अन् वाचकांना कशी ओढ लागते तें तुम्ही नीट पहा.

कादंबरीतल्या प्रसंगमालेला मुक्ताहाराची उपमा दिली तर असं म्हणतां येईल, कीं या शुभ्र मोत्यांच्या सरांत लेखकानं अतिशय बहारदार प्रसंगाचे एकदोन नीलमणी बसविलेले असतात व त्यांची आठवण वाचकांना कांहीं केल्या विसरतां येत नाहीं. अशा स्थलांना इंग्रजींत 'High lights' म्हणतात. ' नाकेबंदी'तल्या असल्या दोन प्रसंगांचा मला विशेष उल्लेख करावासा वाटतो.

त्यांपैकी पहिला प्रसंग लुडविग आपल्या स्खलनाची कबुली द्यायला प्रो. रोटेकच्या घरीं जातो त्या वेळचा. ज्या प्रो. रोटेकच्या असामान्य बुद्धिमत्तेविषयीं लुडविगला पराकाष्ठेचा आदर, ज्याला यत्किंचित्‌हि दुःख द्यायला तो प्राणान्तींहि तयार झाला नसता, त्याच्याच पत्नीविषयीं त्याच्या मनांत अभिलाष उत्पन्न व्हावा हा केवढा भयंकर दैवदुर्विलास ! आपल्या पापाची कबुली द्यायला लुडविग तयार होतो हा म्हटला तर त्याचा बेशरमपणा, म्हटला तर त्याच्या सालस उमद्या स्वभावाचा पुरावा ! लुडविग प्रो. रोटेकच्या भेटीला जातो त्या वेळीं तो जाणून असतो, कीं आपण जी कबुली देणार आहोंत ती ऐकतांच आपल्या गुरूनं संतापानं आपल्याला ठार केलं तरी तें योग्यच होईल. पण गुरूची वंचना करण्यापेक्षा त्याचा संताप अंगावर घेतलेला बरा अशा विचारानं तो प्रो. रोटेककडे जातो. वाचकहि अगदीं अनावर उत्सुकतेनं गुरुशिष्यांची भेट वाचूं लागतो. आणि या भेटीचा शेवट जेव्हां अकल्पित स्वरूपाचा होतो, तेव्हां करुणरसाचा रम्य उत्कर्ष वाचकांना अनुभवावयाला सांपडतो ! ब्रनो फ्रँकनं हा एकंदर प्रसंग अवर्णनीय कौशल्यानं रंगविला आहे.

दुसरा प्रसंग तुम्हांला सांगायचा तो विस्तारानं छोटा, पण इतकाच मनोज्ञ आहे. लुडविगचा सुझानाशीं संबंध असावा या शंकेनं रूथ त्याची गांठभेट घेण्याचं बंद करते. पुढं लुडविग तिचं बिऱ्हाड शोधून काढतो व तिला डॉक्टरकडे नेतो. त्या पुनर्भेटीमध्यें रूथ मुकाट्यानं लुडविग जें जें म्हणेल तें ऐकते. सुझानाचा आपल्याला मत्सर वाटला, हें एका शब्दानं सुद्धां ती त्याला बोलून दाखवीत नाहीं. पण टॉन्सिलचं ऑपरेशन करायसाठीं रूथला जेव्हां टेबलावर निजविण्यांत येतं, तेव्हां आतां या ऑपरेशनमधून आपण जगूं कीं नाहीं अशा शंकेनं ती साहजिकच विव्हल होते. लुडविगचं आपल्यावर एकनिष्ठ प्रेम आहे की नाहीं हें समजण्याची इच्छा तिला अनावर होते व गुंगी घेतांघेतां लुडविगच्या कानांत ती विचारते, 'लुडविग, ती बाई कोण होती ?' या प्रसंगाचं वर्णन वाचतांना डोळ्यातनं आसवं गळल्याशिवाय राहात नाहींत !

# भाषण दुसरें

कथानक आणि स्वभावरेखाटन हीं कादंबरीचीं दोन महत्वाचीं अंगं होत. निष्णात लेखक या दोन्ही अंगांबद्दल शक्य तितकी काळजी घेत असतो व नमुनेदार कादंबरी कोणती असा जर कोणीं प्रश्न केला, तर साहजिकच असं उत्तर द्यावं लागेल, कीं ज्या कादंबरींत कथानक व व्यक्तिदर्शन हीं दोन्हींहि सरस साधलीं आहेत ती. पण हें सारं खरं असलं तरी एखादी नाणावलेली कादंबरी आपण वाचून संपविली व तिच्यापासून झालेल्या आनंदाची स्वतःशीं छाननी करूं लागलों कीं आपण चटकन् म्हणतों, या कादंबरींत ललितलेखनाचे सर्वच गुण आहेत खरे, पण हिच्यांत विशेष कांहीं असेल तर कथानकाची बहार किंवा दुसऱ्या एखाद्या कादंबरीबद्दल आपल्याला असं वाटण्याचा संभव आहे, की तिच्यांतील व्यक्तिदर्शनाच्या उत्कृष्टपणामुळं तिला रमणीयता प्राप्त झाली आहे. यासाठींच घटना-

प्रधान कादंबऱ्या आणि व्यक्तिदर्शनप्रधान कादंबऱ्या असं कादंबऱ्यांचं वर्गीकरण पुष्कळदा करण्यांत येतं. इतकंच नव्हे, तर या वर्गीकरणाप्रमाणं कादंबरीकारांचे सुद्धां दोन ठळक वर्ग कल्पून आपण पुष्कळदां असं म्हणतों, कीं अमुकअमुक कादंबरीकार कथारचनेच्या बाबतीत मोठे चतुर असून अमुकअमुक कादंबरीकारांचं सारं कौशल्य व्यक्तिदर्शनांत आढळून येतं. संगीताचं उदाहरण इथं देण्यासारखं आहे लय आणि ताल ही दोन्हीहि उत्कृष्ट संगीताचीं आवश्यक अंगं तर खरींच; परंतु कांहीं गायक लयांत तर कांहीं तालांत विशेष प्राविण्य संपादन करतात व त्यांच्या कलेचं आकर्षण त्या प्राविण्यावर अवलंबून असतं. अमुक गायक सुराचा मोठा सच्चा व अमक्याची गायकी तिच्यांतील लयकारीमुळं विशेष रंजक होते असं आपण म्हणतों. याच न्यायानं उत्कृष्ट कादंबऱ्यांच्या बाबतीतहि आपल्याला जो भेद मान्य करावा लागतो तो असा, कीं कांहीं कादंबऱ्या त्यांच्यातील कथानकाच्या कौशल्यपूर्ण गुंतागुंतीमुळं, तर कांहीं त्यांत मानवी स्वभावाचे विविध रंग ज्या हळुवार सहानुभूतीनं आणि तन्मयतेनं रंगविलेले असतात तिच्या योगानं आपल्या मनाची विलक्षण पकड घेतात. ' सायकॉलॉजिकल नॉव्हेल ' असा एक स्वतंत्र वर्ग इंग्रजी कथावाङ्मयांत मान्य झालेला आहे. या वर्गात जिचा अंतर्भाव करावा लागेल अशा एका उत्कृष्ट कादंबरीची या भाषणांत मी चर्चा करणार आहे.

तुमच्यापैकीं पुष्कळांनां ' लॉस्ट होरायझन ' नांवाचा चित्रपट पाहिला असेल. हा चित्रपट याच नांवाच्या एका कादंबरीवरून तयार करण्यांत आला. हिच्या लेखकाचं नांव ' जेम्स हिल्टन ' या कादंबरीकाराच्या 'नाइट विदाउट आर्मर,' 'दि सिल्व्हिर फ्लेम,' 'कॅथराईन हरसेल्फ,' 'कॉंटँगो,' 'अँड नाऊ गुडबाय,' 'मर्डर ॲट स्कूल' आणि 'युइ आर नॉट अलोन'–या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं शेवटची–' युइ आर नॉट अलोन ' ( ' आपण एकटींच का आहोंत ? ) ही कादंबरी मला अतिशय आवडलेली आहे. या कादंबरीचा सगळ्यांत महत्वाचा विशेष गुण मला वाटतो तो हा, कीं

ती जरी इंग्रजींत लिहिलेली आहे व तिचं कथानक जरी इंग्लंडमधील एका लहानशा परगण्याच्या गांवीं घडलेलं आहे, तरी ती वाचून हातावेगळी करतांच आपल्या मनांत येतं, हें कथानक पुण्यास, मुंबईस नागपुरांत— महाराष्ट्रांतल्या कुठल्याहि गावीं घडलं असतं— नव्हे घडत असेल ! या कादंबरीच्या कथानकांत रेखाटलेल्या प्रमुख व्यक्ती आज आपल्याभोवतींहि खचित वावरत असतील. सारांश, जेम्स हिल्टन यांनीं सांगितलेल्या गोष्टीला स्थलकालाचीं बंधनं मानणं चुकीचं होईल. अविनाशी मानवी भावनांचा विलास ज्या कादंबरींत कौशल्यानं वर्णिलेला असतो, त्या कादंबरीला अमरत्व प्राप्त होतं, असं मी अनेक वेळां प्रतिपादिलेलं आहे. त्या दृष्टीनं 'आपण एकटींच कां आहोंत ?' ही कादंबरी अक्षर वाङ्मयांत दाखल होईल याबद्दल मला शंका वाटत नाहीं. संशयग्रस्त, मूर्ख प्रेमिकांचा नमुना म्हणून शेक्सपीअरचा 'अथेल्लो' ज्याप्रमाणें वाङ्मयांत अजरामर राहील, किंवा कालिदासाची शकुंतला ज्याप्रमाणं रसिकांच्या स्मरणांत सदैव राहील, त्याप्रमाणं जेम्स हिल्टन यांच्या कादंबरींतील सात्विक वृत्तीचा, पापभीरु, परोपकारी पण व्यवहाराच्या दृष्टीनं मूर्ख डॉक्टर 'डेव्हिड न्यूकम' वाचकांच्या स्मृतींतून सहसा जाणार नाहीं.

'आपण एकटींच कां आहोंत ?' या कादंबरींत डॉक्टर डेव्हिडच्या मनोव्यापारांचं जें अत्यंत सूक्ष्म विवरण जेम्स हिल्टन यांनी केलेलं आहे, त्यांतच तिच्या साऱ्या आकर्षणाचं मर्म आहे. कादंबरीचं कथानक पाहिलं तर त्यांत गुंतागुंत नाहीं. एकामागोमाग योजलेले लहानमोठे पेचप्रसंग कोणते, असा प्रश्न आपण स्वत:ला विचारला तर त्याचं उत्तर देणं सोपं नाहीं. कादंबरीचं कथानक मी तुम्हांला थोडक्यांत सांगतों. म्हणजे तें किती साधं आहे, याविषयीं तुमची खात्री पटेल.

## मनोहरची आकाशवाणी

कॅल्डरबरी नांवाच्या लहानशा शहरीं डेव्हिड न्यूकम नांवाचा एक डॉक्टर होता. मोठा सज्जन, दयाळू आणि परोपकारी. धंद्यातली स्वार्थी दृष्टि कशी ती बिचाऱ्याला माहीतसुद्धां नव्हती. वर्तनानं इतका साधा, कीं त्याच्या साधेपणाला अन् पोषाखाच्या गबाळेपणाला गांवातले लोक हसत नसत याला एकच कारण होतं तें म्हणजे, त्याचा आपल्या कामातली हुषारी अन् लोकसेवा करण्याची तत्परता ! तो रस्त्यानं निघाला, कीं लोक एकमेकांत म्हणायचे, 'ते पाहा आमचे छोटे डॉक्टरसाहेब.' दवाखान्यांतल्या कामांत सदा मग्न असायची स्वारी. विविध प्रकारचे रोग म्हणजे मनुष्यजातीचा एक मोठा शत्रु, त्याच्याशीं निकरानं लढणं हें डॉक्टरचं खरं कर्तव्य ही कल्पना डेव्हिडच्या ठिकाणीं अगदी पूर्णत्वानं भिनलेली होती; आणि रोगनिवारणाच्या कामांत त्याच्यासारखा निरलस आणि शूर मनुष्य पाहूं जातां मिळण्यासारखा नव्हता. मात्र चमत्कार असा, कीं डेव्हिड या बाबतींत जितका शूर तितकाच पत्नीशीं वागतांना भित्रा आणि नरम होत असे. तो दवाखान्यांत असला किंवा रोग्याला पाहण्यासाठीं त्याच्या घरीं गेलेला असला, कीं त्याच्या स्वभावांतला गोडवा आणि धैर्य पूर्ण प्रगट व्हायचं; पण घरांत पाऊल टाकलं अन् पत्नीशीं बोलायची वेळ आली, कीं त्याच्या स्वभावाची ही बाजू पार लुप्त होऊन एखाद्या वरिष्ठ विरोधी शक्तीशीं प्रसंग आल्यावर माणसानं वागावं तसा तो नम्रपणानं वागायचा ! त्याला वाटे, आपली बायको श्रीमंताच्या घरची, तिच्यामुळंच आपल्या नशिबाचं दारिद्र्य टळलेलं, ती म्हणेल तसं वागणं, निदान तिला शक्य तितका कमी विरोध दर्शविणं हें आपलं कर्तव्य आहे. त्याची पत्नी जेसिका स्वतःची ही वरिष्ठता पूर्णपणें जाणून होती व नवऱ्यावर अधिकार गाजविण्यांत आनंद मानणाऱ्या स्त्रियांपैकीं ती एक होती. तिला जिराल्ड नांवाचा एकच मुलगा झाला होता व इतर अनेक गोष्टींप्रमाणं या मुलाच्या बाबतींतहि पतिपत्नींमध्यें मतभेद होण्याचे प्रसंग वरचेवर येत. कारण जिराल्ड म्हणजे हट्टी, आग्रही, हेकेखोर मुलाचा एक

नमुना होता. केवळ गंमतीसाठीं खोटं बोलण्याची त्याला पुष्कळदा लहर येई आणि कधींकधीं भीतीचे झटकेहि त्याला येत. त्याला धाक दाखवला पाहिजे असं जेसिकाचं म्हणणं. उलट डॉक्टर डेव्हिडला वाटे, अशा मुलाला चुचकारून त्याच्या तंत्रानंच थोडंसं घेऊन बेताबेतानं सुधारलं पाहिजे.

डॉक्टर डेव्हिडचा असा हा संसार होता. अशा या संसारांत त्यानं पंधरा वर्षं काढली–वरकरणी पाहतां सुखासमाधानांत काढलीं. त्याच्या आयुष्याचीं उरलेली वर्षेहि कदाचित् अशीं गेलीं असतीं; पण तशी तीं जावीं असा दैवयोग नव्हता. कोणाच्याच ध्यानींमनीं नसतां एके दिवशीं रात्रीं डॉक्टर डेव्हिडच्या संसारांत आणि जीवनांत एक नवीनच प्रवाह शिरला, हा प्रवाह शिरला. तो इतक्या क्षुल्लक प्रसंगाच्या रूपानं, कीं त्या प्रसंगांत अखेरच्या भीषण घटनेचं बीज होतं, हें त्या रात्रीं कोणाला खरंहि वाटलं नसतं.

त्या रात्रीं दवाखान्यांतलं आपलं काम आटपून विश्रांति घ्यायच्या विचारांत डेव्हिड होता, इतक्यांत त्याला निरोप आला, की थिएटरमध्यें खेळ करणाऱ्या कंपनींतल्या एका नर्तकीला अपघात झालेला आहे. डॉक्टर डेव्हिड तावडतोब तिकडे गेला. पण तिथं त्याला कळलं, की ती मुलगी आपल्या बिऱ्हाडीं गेली आहे. तिच्या बिऱ्हाडाचा पत्ता शोधून काढून तो तिच्या खोलींत गेला. त्या मुलीचं नांव लेनी. ती जातीनं जर्मन होती. तिला इंग्रजी मोडकंतोडकं बोलतां येत होतं आणि विद्यार्थीदशेंत मिळविलेलं जर्मन भाषेचं तुटपुंज ज्ञान डेव्हिड विसरून गेला होता. त्यामुळं दोघांमध्यें दहापांच वाक्यांपलीकडे संभाषण होऊं शकलं नाहीं. अपघातांत लेनीचं डावं मनगट मोडलं होतं. त्याच्यावर उपचार करून व दोन दिवसांनीं पुन्हा समाचाराला येईन असं सांगून डेव्हिडनं तिचा निरोप घेतला. पण दोन दिवसांनी तो जाऊन पाहतो तों लेनी कुठं खोलींत होती? चवकशीअंतीं त्याला कळलं, कीं तिची कंपनी दुसऱ्या गावीं गेली.

'काय चमत्कारिक हीं नाटकी माणसं ?' असा स्वतःशीं उद्गार काढून डेव्हिड परत आला. जन्मांत पुन्हा लेनी आपल्याला दिसणार नाहीं असं साहजिकच त्याला वाटलं.

पण तसं व्हायचं नव्हतं. कॅल्डरबरीपासून कांहीं अंतरावर असलेल्या सँडमथ नांवाच्या गावीं तो दर शुक्रवारीं कामानिमित्त जात असे. एकदां तो असा गेला असतांना परत कॅल्डरबरीला जायची त्याची नेहमीची संध्याकाळची साडेपांचची गाडी त्याला साधतां आली नाहीं. मग रात्रीं नऊ वाजेपर्यंत दुसरी गाडी नव्हती. मधले साडेतीन तास कसे काढावे या फिकीरींत तो असतां एका नृत्याच्या कार्यक्रमाची जाहिरात त्यानं पाहिली. त्या जाहिरातींत लेनीचं नांव त्याला दिसलं. तो थिएटरांत गेला. पण लेनीचं नृत्य न होतांच खेळ खलास झाला. कारण तिनं आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न केला होता आणि प्रेक्षकगृहांत एक डॉक्टर आहे असं पाहताच डेव्हिडला लेनीवर उपचार करण्यासाठीं आंत नेण्यांत आलं. कंपनीचे लोक लेनीवर गरम झाले होते. त्यांनीं तिला नोकरीवरून काढून टाकलं. अशा असह्याग्य परिस्थितींत बिचाऱ्या लेनीची काळजी घेण्याची सर्व जबाबदारी डेव्हिडवर अर्थातच आली. मनगट मोडलेलं असतांहि रोज रात्रीं नृत्याचे कष्ट करून करून जिवाला कंटाळून लेनीनं आत्महत्त्येचा प्रयत्न केला, असं कळल्यावर डेव्हिडला तिची अतिशय करुणा आली. त्यानं तिच्या मनगटावर उपचार केले आणि तिची राहण्यासवरण्याचीहि सोय करून दिली. दर शुक्रवारीं सँडमथला गेलं, कीं लेनीची शुश्रूषा करावी व तिला काय हवं नको विचारावं, असा डॉक्टर डेव्हिडचा पुढच्या कांहीं दिवसांत क्रमच ठरून गेला.

एकदा त्यानं आपला मुलगा जिराल्ड याला आपल्या बरोबर सँडमथला नेलं आणि त्याला लेनीजवळ ठेवून आपल्या कामावर तो गेला. काम आटोपून तो परत आला तों त्याला आढळलं, कीं जिराल्डची व लेनीची मोठी गट्टी जमली आहे. ज्या हट्टी,

लहरी जिराल्डचं कधीं कुणाशीं पटायचं नाहीं, तो अवघ्या अर्ध्या दिवसाच्या अवधींत लेनीला इतका चिकटला, की बापाबरोबर परत कॅल्डरबरीला जायला तो तयार नव्हता. डॉक्टर डेव्हिडला ही गोष्ट एक प्रकारें फार बरी वाटली. लेनीच्या सहवासांत जिराल्डचा हट्टी स्वभाव कदाचित सुधारेल, अशी आशा त्याच्या मनांत उत्पन्न झाली व त्यानं जेव्हा ही हकीकत जेसिकाला सांगितली, तेव्हां तिलाहि तसंच वाटून जिराल्डला सांभाळण्यासाठीं लेनीला आपल्या घरीं नोकरीला ठेवण्याचा तिनं बूट काढला. लेनी चांगल्या प्रतिष्ठित कुटुंबातली आहेना, असं तिनं डेव्हिडला विचारलं. डेव्हिड म्हणाला, 'मला काय माहीत ती कसल्या कुटुंबातली आहे ती!' जेसिका म्हणाली, 'तुला कधीं काय माहीत असतंय?' मग लेनी प्रतिष्ठित घराण्यातील असेलच असं जेसिकानं गृहीत धरलं आणि तिला नोकरीवर बोलावलं. लेनी कॅल्डरबरीस येऊन दाखल झाली व जिराल्डला सांभाळण्याच्या कामावर रुजू होऊन डॉक्टर डेव्हिडच्या घरांत राहूं लागली.

डेव्हिड व लेनी अशा प्रकारें एकमेकांच्या अधिक निकट सहवासांत आलीं. डेव्हिडला स्वभावतः संगीताचा षोक होता, परंतु जेसिकाच्या गृहराज्यांत त्याच्या वृत्तीला वाव मिळाला नव्हता. घरांतला पियानो बहुतेक बंद असे; पदांचीं लिखितं धूळ खात पडलेलीं असत! लेनी आल्यापासून या लिखितांवरची आणि डेव्हिडच्या संगीत प्रेमावरची धूळ उडाली. जेसिका बाहेर गेलेली असली म्हणजे लेनी पियानो वाजवी.

लेनीचं पूर्वचरित्र कांहीं दिवस गुप्त राहिलं. डेव्हिडला तर तें माहीत करून घेण्याची उत्सुकता मुळींच नव्हती. पण जेसिका कशी स्वस्थ राहणार? चौकशीअंतीं तिला कळलं, की ती पूर्वी नाटक कंपनींत होती. शाळेतून तिनं पळ काढला होता; खोटा पासपोर्ट तयार केला होता; रशियाच्या मार्गानं ती लंडनला आली

होती आणि पोलीस तिच्या शोधांत होते. हें सारं कळल्याबरोबर लेनीला ताबडतोब घराबाहेर काढण्याचं जेसिकानं ठरविलं. मोठ्या मिनतवारीनं डेव्हिडनं निदान महिना पुरा होईपर्यंत लेनीला घरांत ठेवून घेण्यास जेसिकाची संमति मिळविली. मात्र जिराल्ड लेनीच्या सहवासांत असतां कामा नये, असं ठरवून जेसिकानं त्याला आपल्या भावाकडे पाठवून दिलं. यानंतरचा लेनीचा डेव्हिडच्या घरांतील मुक्काम मोठा चमत्कारिक होता. जेसिकाला तिचं वास्तव्य उघड-उघड नको होतं. उलट तिनं पुन्हा निर्धन स्थितींत जगांत भटकं लागावं, या विचारानं डेव्हिडला तिच्याविषयीं अनुकंपा वाटत होती. अगदीं सूक्ष्म रीतीनं डेव्हिड व लेनी एकमेकांकडे आकृष्ट व्हायला लागलीं. जेसिकाच्या मनांत मत्सरहि निर्माण झाला. लेनीला एका शाळेंत नोकरी मिळण्याचा संभव आहे, असं कळल्याबरोबर तिचं पूर्वचरित्र शाळेच्या अधिकाऱ्यांना कळवून ती नोकरी तिला मिळूं नये, अशी व्यवस्था करण्यासहि तिनं कमी केलं नाही. एकीकडे जेसिका व दुसरीकडे डेव्हिड आणि लेनी असे पक्ष निर्माण होऊन त्यांमधें अस्पष्ट युद्धच सुरू झालं म्हणाना !

अशा परिस्थितींत बरोजफोर्ड नांवाच्या शहरीं भरलेल्या एका वैद्यकीय परिषदेला डेव्हिडला जावं लागलं. तिथं तो चार दिवस होता. तेवढ्या अवधींत त्यानं लेनीला एक पत्र लिहिलं. लेनीला संगीताचं अध्ययन करायला मिळण्याची त्यानं व्यवस्था केली होती व त्याबद्दल त्या पत्रांत त्यानं मजकूर लिहिला होता. जेसिकाच्या हातांत हें पत्र गेलं तरी तिला त्या मजकुराचा खरा अर्थ कळूं नये अशा हेतूनं त्यानं तो मजकूर शक्य तितक्या संदिग्ध भाषेंत लिहिला 'यांतला एक शब्दहि जेसीला कळतां कामा नये, नाहींतर ती आपला सारा बेत हाणून पाडील. पूर्वी एकदां आपलं काम फसलं, तसं आतां फसतां कामा नये' असं लिहून डेव्हिडनं तें पत्र नाहींसं करण्या बद्दलहि लेनीला सूचना दिली. पण 'प्रिय लेनी' असे डेव्हिडनं लिहिलेले शब्द त्या पत्रांत लेनीला प्रथमच वाचायला मिळाले होते

आणि असं गोड पत्र नाहींसं करण्यास ती तयार नव्हती. या साध्या-सुध्या पत्राच्या त्यांतील संदिग्ध भाषेमुळं पुढं केवढा दुष्परिणाम होणार होता, त्याची डेव्हिड अगर लेनी यांपैकीं कुणालाच कल्पना नव्हती !

परिषद आटोपून ज्या दिवशीं डेव्हिड परत आला त्या दिवशीं साऱ्या वर्तमानपत्रांत १९१४ चं महायुद्ध सुरू होण्याच्या बातम्या होत्या. त्या वाचून डेव्हिडला लेनीची विलक्षण चिंता वाटूं लागली. कारण ती जर्मन होती व युद्ध सुरू झाल्यास तिच्यावर कोणतं संकट गुदरेल त्याचा नियम नव्हता. तो घरीं येऊन पोचला तो लेनी एकटीच घरांत होती. मनाची चिंता घालवण्यासाठीं तो लेनीला म्हणाला, ' थोडा पियानो वाजवतेस का ? ' तिनं ते आनंदानं कबूल केलं, इतकंच नव्हे तर ती म्हणाली, ' माझं नृत्य तुम्ही कधींच पाहिलं नाहीं. तुम्हीं तें पाहावं अशी माझी फार इच्छा आहे.' कोणाला दिसूं नये म्हणून दोघांनीं खोलीच्या खिडक्या बंद केल्या आणि लेनीनं डेव्हिडपुढं कांहीं वेळ नृत्य केलं. एखाद्या स्वप्नसृष्टींत असल्याप्रमाणं दोघांनाहि बाह्य जगाचा कांहीं वेळ विसर पडला.

ऑगस्टच्या चार तारखेस महायुद्ध पुकारलं गेलं. ती बातमी ऐकतांच आतां काय वाटेल तें करून लेनीला जर्मनींत पोचती केली पाहिजे असं डेव्हिडनं ठरविलं. तिला घेऊन गुप्तपणानं पळून जाण्याचा त्यानं बेत केला. रात्रीं कोणाला नकळत घराबाहेर पडून सायकलवर दूर असलेल्या मार्सलंड स्टेशनपर्यंत जाऊन मध्यरात्रीची गाडी त्यांना गाठायची होती. पण अंधाऱ्या रात्रीं रानातून कशीबशी वाट काढीत असतां सायकलच्या चाकातली हवा गेली. आतां मध्यरात्रीची गाडी गाठणं अशक्य होतं. पुढची गाडी सकाळीं सहा वाजतां होती. डेव्हिड व लेनी दोघंहि विलक्षण दमलीं होतीं. रानातल्या झुडु-पांच्या आश्रयानं गवतावर दोघंहि झोपीं गेलीं. पहाटे उठून तीं स्टेशनपर्यंत गेलीं. लोकांची दृष्टि चुकवण्याच्या उद्देशानं स्टेशनच्या आवाराबाहेरील फाटकांतून आत शिरून तिकिटं न काढतांच

डेव्हिड लेनीला घेऊन गाडीच्या डब्यांत बसला. पुढं अशाच प्रकारें लपतछपत प्रवास करीत दोघं लंडनला पोचलीं. पण लंडनच्या स्टेशन-वर उतरतांच दोघांनाहि पोलिसांनीं पकडलं व तुरुंगाकडे नेलं. डेव्हिडची पत्नी जेसिका आदल्या रात्रीं घरांत मेलेली आढळली होती व तिचा खून करून डेव्हिड व लेनी पळून गेलीं असा पोलिसांना संशय होता.

डेव्हिड व लेनी यांच्यावर रीतसर खटला सुरू झाला. आपण गुप्तपणानं पळून कां जात होतों, याचा खुलासा दोघांनाहि करतां आला नाहीं. उलट दोघांच्या विरुद्ध दर्शनी पुरावा मात्र भरपूर होता. दोघांचं एकमेकांवर प्रेम होतं, आणि जेसिकाची अडचण त्यांना दूर करायची होती. ज्या क्षणीं जेसिका घरांत मेलेली आढळली, त्याच सुमारास दोघं लपतछपत घराबाहेर पडलीं, असं सांगणारा साक्षीदार निघाला. डेव्हिडच्या त्या संदिग्ध पत्राचा भलताच अर्थ झाला. दोघांनीं प्रवास केला होता, तोहि पळून जाणाऱ्या गुन्हेगारां-प्रमाणं. शिवाय लेनी एक जर्मन स्त्री होती. महायुद्धाच्या वेळीं जर्मन व्यक्तीवर हेराचा आरोप अगदीं सहजासहजीं होत असे. त्याप्रमाणं तो लेनीवरहि करण्यांत आला. सत्याला असत्य आणि असत्याला सत्य ठरविण्यासारख्याच या साऱ्या गोष्टी होत्या. डेव्हिड व लेनी या दोघांवरहि खुनाचा आरोप शाबीत झाला व त्यांना फाशीची शिक्षा सांगण्यांत आली.

पाहिलंत कथानक किती साधं आहे तें ? छोट्याछोट्या प्रसंगांनी एखादा पेचप्रसंग निर्माण व्हावा, त्यापुढं त्याहूनहि मोठा पेचप्रसंग यावा व अशा प्रसंगांचा शेवटीं कळस होऊन कथानकाची निरगाठ अकल्पित रीतीनं उकलली जावी, असा प्रकार या कादंबरीच्या कथानकांत मुळींच आढळत नाहीं. विस्मय आणि जिज्ञासा या नेहमीच्या साधनांचा लेखकानं कादंबरींत विशेष कुठं उपयोग केलेला नाहीं. कथानकांत कसलंहि रहस्य नाहीं किंवा वाचकांच्या चित्त-वृत्ति थरारून सोडण्यासारखे प्रसंगहि नाहींत. ज्या घटना वाचून

वाचकांस विलक्षण आचंबा वाटावा किंवा ज्या घटनांच्या गुंतागुंतीनं वाचकांची मति क्षणभर गुंग होऊन जावी, अशा घटनांचा मागमूस-सुद्धां या कादंबरींत कुठंहि नाहीं आणि असं असूनहि ही कादंबरी एकदां वाचायला घेतली, कीं ती पुरी केल्यावांचून राहवत नाहीं आणि ती हातावेगळी करतांच अनेक भावनांच्या संमिश्र भारानं अंतःकरण अगदीं सुंद झाल्याचा प्रत्यय येतो. मानवी संसाराचं एक चमत्कारिक, खेदकारक आणि चिंतनीय स्वरूप आपल्या अंतःचक्षूं-समोर लेखकानं मूर्तिमंत उभं केल्यासारखं आपल्याला वाटतं आणि ' जग हें असं आहे ' असा उद्गार आणि जड सुस्कारा आपल्या मुखांतून नकळत बाहेर पडतो.

याचं कारण काय बरं ? लेखकाच्या कोणत्या कौशल्यामुळं तो आपल्या मनाची अशी जबरदस्त पकड घेतो ? याचं एकच उत्तर आहे. तें हें, कीं कादंबरींतील मुख्य पात्राचं व्यक्तिदर्शन जेम्स हिल्टन यांनीं पराकाष्ठेच्या कौशल्यानं केलेलं आहे. या कादंबरींत मुख्य पात्रं अवघीं चारच आहेत. डॉक्टर डेव्हिड, लेनी, जेसिका, आणि जिराल्ड. यांपैकीं जिराल्डचा उपयोग लेखकानं दोन गोष्टींपुरतांच करून घेतलेला आहे. त्यांतली पहिली अशी, कीं हट्टी, लहरी स्वभावाचा हा मुलगा होता म्हणूनच लेनी डॉक्टरच्या घरांत नोकर म्हणून येऊन राहिली. याहून अधिक महत्त्वाची दुसरी गोष्ट अशी, कीं ज्या रात्रीं लेनीला घेऊन पळून जाण्याचा बेत डेव्हिडनं केला त्याच रात्रीं जिराल्डनं आपल्या विचित्र स्वभावानुसार एक चमत्कारिक कृत्य केलं व त्यामुळेंच त्याच्या आईला मृत्यु आला आणि त्याचा बाप खुनाच्या आरोपावरून फाशी गेला. स्वारी मामाच्या घरून आपल्या घरीं पळून आली आणि बापाच्या दवा-खान्यांत शिरून त्यानं औषधांच्या बाटल्यांशीं वाटेल तशी खटपट केली. त्यांतल्याच एका विषारी औषधांत तें पाणी आहे अशा समजुतीनं जेसिकानं झोपेच्या गोळ्या टाकून घेतल्या व त्यामुळंच तिला मृत्यु आला. म्हणजे जिराल्ड हें जरी दुय्यम पात्र असलं तरी त्याच्या

हट्टी व खोडकर स्वभावाचा लेखकानं किती सुंदर उपयोग करून घेतला आहे पाहा.

किंबहुना या कादंबरीचा एक रम्य विशेषच हा आहे, की तिच्यांतील साध्या कथानकाचे वेगवेगळे दुवे पात्रांच्या विशिष्ट मनोव्यापारांतून निर्माण झालेले आहेत. डॉक्टर डेव्हिडच्या निरलस, दयाळू व परोपकारी स्वभावामुळं लेनीची व त्याची गाठ पडते. जिराल्डच्या स्वभावांतील दोषामुळं लेनी डॉक्टरच्या घरीं येऊं शकते, जेसिकाच्या सासुरवासामुळं पंधरा वर्षांच्या अवधींत ज्या असंतोषाची गुप्त ज्वाला डेव्हिडच्या मनांत तयार झाली होती. तिच्या-योगानं लेनीविषयीं त्याला वाटणारी करुणा हळूहळू प्रेमांत रूपांतर पावते. त्याच्या स्वभावांतील व्यवहारशून्यतेमुळें अखेर लेनीबरोबर पळून जातांना तो ज्या ज्या गोष्टी मोठ्या सावधगीरीनं अन् अक्कल लढवून म्हणून करतो, त्या सगळ्या संशयास्पद ठरतात. शेवटीं खटल्याच्या वेळींहि त्याचा सरळ, भोळा, 'आपण जर पाप केलंच नाहीं, तर आपल्याला भय कशाचं ?' अशा श्रद्धेचा स्वभाव त्याचा घात करतो. सारांश, चार व्यक्तींच्या विशिष्ट स्वभावांचे एकमेकांवर आघात होत जाऊन कसकशा गोष्टी घडत गेल्या आणि शेवटीं डेव्हिड व लेनी या दोन निष्पाप, निष्कलंक, निर्मळ जीवांना जगाच्या कोत्या, आंधळ्या न्यायानुसार कसं गुन्हेगार म्हणवून घ्यावं लागलं व फासावर चढावं लागलं त्याचं अत्यंत हृदयद्रावक चित्र 'आपण एकटींच का आहोंत ?' या कादंबरींत जेम्स हिल्टन यांनीं काढलेलं आहे आणि तें इतक्या साधेपणानं, कीं कांहीं विचारूं नंका ! उपमा, उत्प्रेक्षा कुठंहि नाहींत, भाषेचा फुलोरा नाहीं, सृष्टी-वर्णनें नाहींत—किंबहुना कृत्रिम कलाकुसरीचं एकसुद्धां स्थळ या कादंबरींत आढळायचं नाहीं. लेखकाला जणूं असा जबर आत्मविश्वास असावा, कीं डेव्हिड व लेनी या दोन अभागी प्रेमिकांची साधी कहाणी सांगतांना मीं आपल्या सहानुभूतीचा गुण पूर्णांशानं ओतला, कीं तिनं वाचकांचं चित्त वेधलंच पाहिजे. बाकीच्या साजशृंगाराची

तिला काय गरज ? आणि खरंच, सौंदर्य हें वस्तुत: साधेपणांतच असतं ! अन् लेखकाच्या अंत:करणातली सहानुभूति हाच ललित-कथेच्या सौंदर्याचा खरा आत्मा ! सरस व्यक्तिदर्शनाच्या कौशल्यानं अन् अंत:करणाच्या खोल कळकळीनं सांगितलेल्या साध्या कहाणींत वाचकांचीं अंत:करणं हालवून सोडण्याची केवढी शक्ति असते, ते पाह्यचं असेल तर जेम्स हिल्टनची ही कादंबरी वाचावी !

या कादंबरीचा आणखी एक विशेष गुण असा, की तिचा विषय पुढं मांडतांना लेखकानं कमालीचा संयम राखला आहे. गोष्ट आपण जसजशी वाचीत जातों, तसतशी डेव्हिड व लेनी यांच्या अंत:-करणांत परस्परांविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला आहे, अशी आपली अधिकाधिक खात्री होत जाते. पण 'डेव्हिडचं लेनीवर प्रेम बसलं' किंवा 'लेनीचं डेव्हिडवर प्रेम बसलं' असं लेखक कुठंहि चुकूनसुद्धा सांगत नाहीं. त्या दोघांच्या संभाषणांत प्रीतीचा शब्द एकादासुद्धां उच्चारला जात नाहीं. ज्या वेळी लेनी डेव्हिडला एकान्तांत आपलं नृत्य दाखविते, त्या वेळींसुद्धां 'I love yon' असं ती एकदां म्हणते, पण मनाच्या अस्वस्थ स्थितींत डेव्हिडला तें वाक्य धड ऐकूंहि जात नाहीं, असं लेखकानं वर्णन केलं आहे. इतकंच काय, कॅल्डरबरीहून पळून जातांना सायकल नादुरुस्त होऊन डेव्हिड व लेनी जेव्हां रात्रभर रानांत निजतात, तेव्हांसुद्धां दोन उत्कट प्रेमिकांऐवजी धास्तावलेलीं दोन लहान मुग्ध बालकं एकमेकांच्या कुशींत निजलीं असल्याचं वर्णन आपण वाचीत आहोंत, असा भास वाचकांस व्हावा, अशा नाजुक कौशल्यानं कादंबरीकारानं तो एकंदर प्रसंग वर्णिला आहे. डेव्हिड व लेनी यांना फाशी देण्याच्यापूर्वी तुरुंगाचे अधिकारी त्यांना एकमेकांची भेट घेऊं देतात, त्या वेळींच काय ती त्यांच्या परस्पर प्रेमाला वाचा फुटते. ज्या या दोन प्रेमिकांनीं कधीं प्रणयाची उत्तान भाषा केली नाहीं, आलिंगनाचं किंवा चुंबनाचंदेखील सुख कधीं अनुभवलं नाहीं, त्यांनी मृत्यूच्या दारांत उभं राहून एकमेकांना अखेर डोळे भरून पाहण्याच्या वेळींच काय

तें आपापलं प्रेम शब्दांनीं व्यक्त करावं या घटनेंत जें कारुण्य भरलेलं आहे, त्याची कलेच्या दृष्टीनं केवढी थोरवी !

नायक व नायिका यांच्या अनुरक्तीचं चित्र काढतांना जो संयमगुण लेखकानं दाखवलेला आहे, त्याचा प्रत्यय आणखीहि एका प्रकारें वाचकाला आल्यावांचून राहात नाहीं. माझ्या म्हणण्याचा आशय असा, कीं गोष्ट लिहितांना लेखक स्वतः कधींहि प्रगट होत नाहीं. कादंबरीचा विषय पाहिला तर तो उघडच असा, कीं विषमवृत्तीच्या व्यक्तींचा विवाहित संसार वरून कितीहि टिकाऊ दिसला तरी कुठल्या क्षुल्लक योगायोगाचं निमित्त कारण होऊन त्या व्यक्तींमधील गुप्त असंतोष प्रगट होऊन त्या संसाराचा विच्छेद करील त्याचा नियम नाहीं. म्हणजे ही कादंबरी लग्नसंस्थेवर टीका आहे. परंतु आपल्या कल्पनेचा प्रचार करण्यासाठीं लेखकानं एकाहि स्थळीं व्याख्यान झोडलेलं नाहीं; इतकंच नव्हे, तर कथानकांतील एखाद्या प्रसंगाचा फायदा घेऊन विवाहसंस्थेविषयीं टीकात्मक सामान्य विधान करण्याचा मोह स्वतःला होऊं दिलेला नाहीं. हा संयम फार अवघड आहे. तो साधायचा झाल्यास लेखकाचा मुख्य मुद्देमाल शंभर नंबरी असायला लागतो आणि आपल्याला जें तत्त्व लोकांच्या गळीं उतरवायचं आहे, त्याचा आपण उच्चारहि न करतां आपलं कार्य साध्य होईल अशी प्रबल खात्री असावी लागते.

'आपण एकटींच का आहोंत ?' या कादंबरीच्या विषयाला एखाद्या हिऱ्याप्रमाणं अनेक पैलू आहेत व उंची खडा हातीं धरून प्रकाशांत चाळवला, कीं प्रत्येक बाजूनं त्याची कांहीं नवीनच शोभा दिसावी तशी या विषयाची गंमत आहे. मघाशीं मीं तुम्हांला सांगितलं, कीं भिन्न स्वभावांच्या व्यक्तींच्या संसाराच्या तकलुखीपणावर प्रकाश पाडण्याचा या कादंबरीचा हेतु दिसतो. परंतु कादंबरीच्या कथानकाशीं आपण जरा गमतीनं खेळूं लागलों, कीं त्याची दुसरी एक मनोहर बाजू ध्यानांत आल्यावांचून राहात नाहीं. ही बाजू

अशी, कीं जग सत्याला सत्य म्हणून ओळखायला अनेक वेळा कबूल नसतं; सत्य सांगणारा खोटा ठरतो; मानवी व्यवहाराच्या सोयीसाठीं असत्य सत्य समजलं जातं आणि निष्कलंकाला जीवाला मुकावं लागतं. या कादंबरीच्या वाचकाला हें पक्कं माहित असतं, कीं डेव्हिड व लेनी यांनी यत्किंचितहि अपराध केलेला नाहीं आणि असं असूनहि दोघांची विटंबना आणि दोघांच्या जीविताची शोककारक अखेरी त्याच्या डोळ्यांपुढें होत असलेली त्याला पाहावी लागते.

तुरुंगांत जेव्हा लेनी व डेव्हिड यांची अखेरची भेट होते, तेव्हां ती रडतरडत त्याला विचारते, 'आपण कसलाच गुन्हा केला नसतांना हे लोक आपल्याला सुळावर कां देतात ?' तेव्हा डेव्हिड म्हणतो, 'लेनी, या जगांत हें असंच चालायचं ! आपण कितीहि घसा फोडून सत्य सांगितलं तरी जग आपल्यावर विश्वास ठेवणार नाहीं. कुणाला तरी पकडून फाशी देणं येवढंच जगाला माहीत. तसं करतांना सत्य सुळावर चढलं तरी जगाला त्याचं दु:ख नाहीं. जगाच्या या व्यवहाराला असे कित्येक निरपराधी जीव आजपर्यंत बळी पडलेले आहेत. आपण एकटींच का आहोंत ? त्या सर्व आत्म्यांची आपल्याला सोबत आहे. आपल्या अंत:करणांत प्रेमाची ज्योति असतांना आपल्याला मरणाचं तरी भय कशाला ? लेनी धीर सोडूं नको.'

सत्य आणि व्यवहार यातील विरोधावर याहून अधिक कठोर टीका कोणती असूं शकेल ?

ही टीका प्रखर करण्यासाठीं जेम्स हिल्टन यांनी आपल्या नायकाचा स्वभावविशेष कल्पितांना मोठं कसब दाखविलेलं आहे. डॉक्टर डेव्हिड वाचकांपुढं प्रथम येतो तो अत्यंत सालस आणि दयाळू गृहस्थ म्हणून. परोकाराच्या बाबतींत तो कधी आळस करीत नाहीं. स्वार्थाचा विचार त्याला कधी शिवत नाहीं. लोक अज्ञानानं दुखणींबाणीं आपल्या अंगावर ओढवून घेतात आणि मृत्युमुखीं

पडतात अशी अनुभवानं त्याची खात्री झालेली, आणि मृत्यूशीं झगडणं, लोकांचे प्राण वांचविणं, त्यांच्या यातना कमी करणं हेंच या आयुष्यातलं आपलं पवित्र कर्तव्य होय अशी वृत्ति त्याच्या अंतःकरणांत उद्भवलेली महायुद्ध सुरू झालेलं ऐकतांच त्याच्या मनांत पहिला विचार आला तो हा, कीं स्वदेशासाठीं का होईना, एकमेकांचे प्राण घेण्याइतके लोक निर्दय, कठोर होऊं शकतात तरी कसे ? आणि अशा मृदु अंतःकरणाच्या माणसावर आरोप आला आणि सिद्ध झाला तो कसला ? तर आपल्या स्वतःच्या पत्नीचा राक्षसी वध करण्याचा ! या विचित्र घटनेपुढं वाचकांची मति घटकाभर कुंठित झाल्यावांचून राहात नाही, आणि एक ललितकथा नव्हे, तर तत्त्वज्ञानाचा एक अमोल धडा आपल्यापुढं लेखकानं ठेवला असा विचार त्याच्या मनांत येतो. उत्कृष्ट ललितकथेचं याहून दुसरं कोणतं लक्षण असूं शकेल ?

ही कादंबरी ज्या इतर अनेक गुणांनीं रमणीय झालेली आहे, त्यांचा उल्लेख सोडून देतांना मला खेद होतो. कथानक जरी साधं असलं, तरी तें खुबीदार रीतीनं वाचकांपुढं मांडण्यासाठीं मुख्य गोष्टीच्या प्रारंभीं उपक्रम अथवा प्रस्तावना आणि शेवटीं उपसंहार अशीं दोन छोटीं प्रकरणं लेखकानं घातलीं आहेत. ज्या घरांत डॉक्टर डेव्हिड राहात असे, तें त्याच्या मृत्यूनंतर कित्येक वर्षं ओसाड पडून राहिलं व एका व्यापारी कंपनीनं तीं जागा विकत घेतल्यावर त्याची पाडापाड सुरू झाली, तेव्हां गांवच्या लोकांना डॉक्टर डेव्हिडच्या चरित्राची व शोककारक अंताची आठवण झाली, अशी कल्पना करून उपक्रम लिहिलेला आहे, आणि उपक्रमांतली हकीकत सांगणारीच व्यक्ति उपसंहारांत पुन्हा प्रगट होते. मोठा झालेला जिराल्ड तिला अकस्मात् भेटतो व जोसिकाच्या रहस्यमय मृत्यूमागच्या खऱ्या घटना तिला त्याच्या तोंडून कळून लेनी व डेव्हिड कशीं निष्कलंक होतीं, त्याबद्दल तीची खात्री पटते, असं दाखविलं आहे. निवेदनाला हिल्टन यांनीं घातलेली ही मुरड मोठी चित्ताकर्षक आहे. शिवाय

स्वभावपरिपोषांत रंग भरण्यासाठीं मारलेले नाजुक हात, वर्णनाच्या ओघांत आलेलीं एकदा वाचलीं की स्मृतीला कायमचीं चिकटावीं अशीं सुभाषितं, साधे पण मोठे हृदयस्पर्शी संवाद आणि ओघवती प्रासादिक भाषा अशी कितीतरी मौज 'आपण एकटेच का आहोंत ?' या कादंबरींत भरलेली आहे.

ही कादंबरी वाचून पुरी करतांना माझ्या मनांत आलं, या जगाचा व्यवहार म्हणजे एका डोळ्यानं आंधळ्या असलेल्या एकाक्षा-सारखा आहे. त्याच्या दृष्टीला जें दिसतं तेंच तो खरं मानतो. सत्य निरखून पाहण्याची बुद्धि अन् शक्ति त्याच्या ठिकाणीं नाहीं. जें उघडउघड दिसतं, तें सत्य समजून समाजाचे निग्रह व अनु-ग्रह चालू असतात. सत्य व प्रीति यांचा छळ आपल्याकडून होत आहे, यांची समाजाला दादहि नसते !

अशा विचारांनीं वाचकांचं मन किंचित् विव्हल, किंचित् गंभीर करणाऱ्या कादंबरीच्या बाबतींत स्थलकालाचीं बंधनं मानतां येतील काय ? जें कॅल्डरबरी शहरांत डॉक्टर डेव्हिडच्या जीवितांत घडलं, तें कुठंहि, केव्हांहि, कुठल्याहि समाजांत घडेल असं आहे आणि म्हणून जेम्स हिल्टन यांच्या या कादंबरीचं मराठी भाषांतर वाचकांसहि अतिशय प्रिय होईल अशी माझी खात्री आहे. हें भाषांतर तयार करून घेऊन मराठी वाचकवर्गास सादर करण्याच्या प्रयत्नांतच सध्या मी आहें.

# भाषण तिसरें

"अमुक अमुक राजाचा एका कटवाल्या क्रांतिकारकानं गोळी झाडून खून केला" अशी बातमी वर्तमानपत्रांत वाचल्याबरोबर तुम्हीं हजार हिश्श्यांनीं पहिला प्रश्न कराल तो हा, कीं "मग त्या खुनी इसमाला पकडलं कीं नाहीं?" तो इसम पसार झाला कीं पकडला गेला, त्याला तात्पुरत्या बंदींत ठेवलं आहे कीं नाहीं, त्याच्यावरचा खटला सुरू झाला कीं नाहीं, अखेरीस त्याला फांशीची शिक्षा दिली गेली कीं हद्दपारीची, या व असल्याच गोष्टीबद्दल तुम्हांला क्रमाक्रमानं जिज्ञासा वाटत जाईल. किंवा फार झालं तर त्या अत्याचाराच्या राजकीय परिणामांविषयीं उत्सुकता ठेवून राजाच्या त्या खुनामुळें देशांतील लोकांना अधिक चांगले दिवस आले, कीं कसे तें जाणून घेण्यासाठीं तुम्ही नंतरच्या बातम्या वाचीत रहाल. ज्या इसमानं राजावर गोळी झाडली, त्याच्या मनांत

अत्याचाराचा निश्चय कसा दृढ होत गेला, निश्चय पक्का झाल्यापासून तों हातून कृत्य घडेपर्यंत त्याची मनःस्थिति कशा प्रकारची होती, पिस्तुल झाडण्याच्या ऐन क्षणीं त्याच्या मनांत कसलेकसले अनंत विचार भरकन् येऊन गेले आणि अत्याचार केल्यानंतर त्याच्या मनाचीं कशींकशीं आंदोलनं सुरू झालीं—इत्यादि प्रश्न तुमच्यापैकीं, एखाद्याला सुचतील आणि ज्याला सुचतील त्याच्या ठिकाणीं कादंबरीकाराचा गुण अल्पांशानं तरी आहे असं मी म्हणेन,

याचं कारण असं, कीं चटकन् नजरेंत भरण्यासारख्या, स्थूल, बाह्य जगांतल्या घटनापेक्षां मानवी मनाच्या अदृश्य सृष्टींतल्या सूक्ष्म घडामोडींविषयीं अधिक उत्सुकता व चौकसबुद्धि ठेवल्यावांचून कादं-बरीकाराला आपल्या कलेंत नैपुण्य मिळवतां येत नाहीं; आणि जे ललितलेखक बाह्य सृष्टींतल्या चमत्कृतिजन्य घटनेहूनहि त्या घटने-मागच्या व्यक्तीव्यक्तींचे मनोव्यापार अधिक रहस्यमय व चित्तवेधक असल्याची कबुली वाचकांकडून घेतात त्यांचीच कला असामान्य कोटींतली ठरते. कटवाल्या क्रांतिकारकांचे अत्याचार काय स्वतंत्र, परतंत्र, सर्वच देशांत वारंवार घडत असतात ! कादंबरीरूपानं त्यांचीं वर्णनं होतातहि अन् लोक तीं कमीअधिक आवडीनं वाचतातहि. परंतु समजा, एखाद्या लेखनपटु व्यक्तीनं असं ठरवलं. कीं एखाद्या खुनाचं विशेष वर्णन करण्याऐवजीं त्या खुनास उद्युक्त झालेल्या माणसाच्या मनोव्यापारांतला अगदीं धागान् धागा उकलून दाख-वावयाचा. मग जी कादंबरी निर्माण होईल तिची गोडी कांहीं विशेष असणार हें तुम्ही सहज मान्य कराल. ज्या कादंबरीस अनुलक्षून मीं येथपर्यंतचं विवेचन केलं त्या मूळ जर्मन भाषेंतील कादंबरीचं इंग्रजी नांव 'Secret Sentence' ( गुप्त प्रायश्चित्त ) आणि या अप्रतिम ललितकृतीच्या जर्मन लेखिकेचं नांव Vicki Baum ( व्हिकि बाउम ) !

## मनोहरची आकाशवाणी

'ग्रँड हॉटेल' हा चित्रपट तुमच्यापैकीं कांहींजणांनीं पाहिला असेल. माझी आवडती नटी 'जोन क्रॉफर्ड' हिचं काम त्यांत होतं, त्यामुळं तो वाईट होता असं मला एकदम म्हणवत नाहीं; पण तिचं सुंदर काम वजा केलं तर त्या चित्रपटापेक्षां त्याच नांवाची व्हिकि बाउमची मूळ कादंबरी कितीतरी चित्तवेधक होती. मला ती फार आवडली आणि नंतर त्या लेखिकेच्या कादंबऱ्यांच्या प्रकाशनाकडे मी अगदीं अधीर नजर लावून बसूं लागलों. ही लेखिका कथालेखनांत अत्यंत चतुर आहे अशी तिच्या कादंबऱ्यांचा मला जों जों अधिक परिचय झाला तों तों माझी खात्री झाली आहे आणि कादंबरी लिहिण्याच्या बाबतींत तिनं खास आपली म्हणून जी शैली प्रयत्नपूर्वक बनविली आहे, तिचा अभ्यास नव्याच नव्हे तर अगदीं मुरलेल्या लेखकांसहि फार फायदेशीर होईल असं मला वाटतं. तिच्या कादं-बऱ्यांपैकीं 'हेलेन,' 'रिझल्टस् ऑफ ॲन ॲक्सिडंट,' 'मेन नेव्हर नो,' 'मार्टिन्स समर' आणि 'सीक्रेट सेंटेन्स' (गुप्त प्रायश्चित्त) या मला अतिशय नमुनेदार वाटतात. त्यांपैकीं शेवटच्या कादंबरीबद्दल मी आज बोलणार आहें.

प्रथम 'गुप्त प्रायश्चित्त' या कादंबरीचं कथानक थोडक्यांत सांगतों तें ऐका.

महायुद्ध संपलं होतं. जर्मन देशाचं पूर्ण एकीकरण अजून झालं नव्हतं. या संधिकालांत जिकडेतिकडे सुबत्ता असावी आणि लोक पूर्णपणें सुखासमाधानांत असावेत असा संभव अर्थातच नव्हता. देशाची स्थिति सुधारण्यासाठीं सत्ताधारी माणसं आपल्या बुद्धीप्रमाणं आटोकाट प्रयत्न करीत होतीं; पण त्यांच्या प्रयत्नांवर व आश्वास-नांवर सर्वांचा विश्वास कसा बसणार? क्रांतिकारक मतांच्या माणसांना वाटत होतं, यांची सत्ता उलथून पाडल्याशिवाय देशाचं नष्ट-चर्य संपणार नाहीं. त्यांनीं मुख्य प्रधानाचा खून करायचं ठरविलं.

या क्रांतिकारकार्नी एका वेगडी विमा कंपनीचं नांव धारण करून राजधानींत आपलं केंद्र थाटलं होतं. या सर्व हालचालींचीं सूत्रं ज्याच्या हातीं होतीं तो मोठा शूर व साहसी होता. त्यानं स्वतःच मुख्य प्रधानावर बॉम्ब टाकण्याचा प्रयत्न दोनचारदां केला होता. तो देशाच्या स्वातंत्र्यासाठीं कोणतंहि दिव्य करील अशी सर्वांची खात्री होती. त्याचं नांव ' आस्केनिअस. '

कटवाल्या गुप्त मंडळाच्या सर्वच सभासदांची आस्केनिअसवर भक्ति होती हें तर खरंच; पण त्यांतल्या त्यांत त्या मंडळांतील एक तरुण असा होता कीं त्याच्या आस्केनिअसविषयींच्या भावना विलक्षण उत्कट होत्या. आस्केनिअस आपला नेता, आपला गुरु, आपलं स्फूर्तिदैवत, पराक्रम व देशभक्ति यांची प्रत्यक्ष मूर्ति असं त्याला वाटे. या तरुणाचं नांव ' ज्योआकिम बूर्थ. ' आस्केनिअसचीं सारीं भाषणं त्याला मुखोद्गत झालीं होतीं व घरीं किंवा स्नेह्यां-सोबत्यांत क्रांतीचं तत्त्व प्रतिपादन करतांना त्यांतलींच वाक्यं त्याच्या तोंडून बाहेर पडत. मुख्य प्रधानाचा खून केल्यावांचून देशाची दुःस्थिति संपणार नाही या कल्पनेचं बीज त्याच्या संस्कारसुलभ कोंवळ्या मनांत अगदीं खोलवर रुजलं होतं. देशाच्या प्रत्यक्ष स्थितीचा अगर प्रधानाच्या राज्यव्यवहाराचा नीट अभ्यास करून त्यानं हा सिद्धान्त ठरविला नव्हता. तसं म्हटलं तर त्यानं मुख्य प्रधानाचं भाषण कधीं ऐकलं नव्हतं; इतकंच नव्हे, त्याला धड कधीं पाहिलंहि नव्हतं. पण आस्केनिअस म्हणत असे, ' मुख्य प्रधानाला गारद केल्याखेरीज देशाला चागले दिवस यायचे नाहींत ' आणि तेंच खरं असलं पाहिजे अशी ज्योआकीमची अढळ श्रद्धा होती.

मुख्य प्रधानाचा प्राण घेण्याचा बेत दोनचारदां फसला हें त्याला बरं वाटलं नाहीं. त्यानं विचार केला, कीं ज्यानं प्राण घ्यायचा, तो सुरक्षितपणें निसटला पाहिजे अशा बेतानं हे व्यूह रचले गेले म्हणून फसले. मुख्य प्रधानावर गोळी झाडल्याबरोबर स्वतःच्या

मस्तकावर पिस्तुल उडविण्याच्या निकराच्या तयारीनं जो प्रयत्न करील तो खचित यशस्वी होईल. आणि हे विचार करतांकरतां त्याला वाटूं लागलं, कीं कोणीहि न सांगतां आपणच हें दिव्य कां करूं नये ? घरींदारीं लोक ज्योआकीमच्या कोवळ्या वयाची थट्टा करीत. आस्केनिअसदेखील त्याला एखादे वेळीं म्हणे, ' तूं बच्चा आहेस अजून; लहान पोरांनीं जास्त चवकशा करूं नयेत ! ' ज्योआकीमला वाटूं लागलं—' जग मला बच्चा समजतं आहे काय ! ठीक आहे. माझ्या मनांत आलेलं दिव्य करून दाखविल्यावर समजेल जगाला माझा मोठेपणा. आस्केनिअससुद्धां मग म्हणेल, ज्योआकीम निधड्या छातीचा वीरपुरुष होता. आस्केनिअसची शाबासकी मिळविण्यासाठीं तरी हें विलक्षण साहस केलंच पाहिजे मला. '

या साहसाची गुप्त कल्पना दिवसेंदिवस ज्योआकीमच्या मनांत दृढ होऊं लागली व त्याचं आपल्या अभ्यासावरचं लक्ष उडालं. त्याला खाणंपिणं सुचेना; लोकांशीं बोलतांचालतांनाहि तो भानावर नसे. त्याला आपला बेत अगदीं गुप्त राखावयाचा होता. आस्केनिअसला-सुद्धां तो आधीं कळावा अशी त्याची इच्छा नव्हती किंवा आस्केनि-असच्या प्रेमपाशांत सापडलेली आपली बहीण ' शार्लोटि ' हिच्याजवळ त्याचा उच्चार करावासं त्याला वाटत नव्हतं. आपल्या मनांतल्या मनांत रात्रंदिवस तो बेत घोळवून त्यांतला एकएक अवघड दुवा पक्का करण्यांत तो मग्न झाला. या एकलकोंड्या, भेसूर विचारांचं ओझं एखादे वेळीं त्याला अगदीं असह्य होई व तसं झालं म्हणजे तो ' माईकोवा ' नांवाच्या एका रशियन गणिकेकडे जाई व तिच्या सहवासाच्या निषिद्ध उन्मादांत आपल्या चित्ताचा क्षोभ शांत करण्याचा यत्न करी.

अखेर एके दिवशीं मुख्य प्रधानाचा खून झाला. त्याचं शव एका बगीचांत आढळलं. खुनी इसम पळून गेला होता. तो कोण असावा याबद्दल सामान्य लोकांची कांहींच कल्पना चालेना. कटवाल्या

गुप्त मंडळाच्या साऱ्या सभासदांची मात्र खात्री होती, कीं धाडशी आस्कोनिअसनंच चारदां फसलेला डाव अखेर साधला असला पाहिजे. आस्कोनिअस त्यांना कुठं भेटेनाहि; त्यामुळं तर त्यांच्या या समजुतीला चांगलीच बळकटी आली. पण एके दिवशीं आस्कोनिअसच प्रकट झाला व खुनाच्या वेळी तो सरहद्दीपलीकडे होता असं उघड झालं. मग मात्र सामान्य जनतेप्रमाणं कटवाले तरुणहि कोणी खून केला असावा ह्याबद्दल बुचकळ्यांत पडले. मात्र लोक जरी याप्रमाणं अज्ञानांत व विस्मयांत होते, तरी सरकारी गुप्त पोलिस धाग्याला धागा जोडीत चालले होते आणि ज्योआकीमविषयीं त्यांना अधिकाधिक संशय येऊं लागला होता. खून केल्याक्षणापासून ज्योआकीमची अवस्था भ्रमिष्टासारखी झाली होती. एकीकडे त्याला वाटे, देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपण एक अपूर्व शूर कृत्य केलेलं आहे. तेव्हां साऱ्या लोकांना ओरडून सांगावं, कीं 'अरे मी—मी मारलं मुख्य प्रधानाला !' परंतु लगेच त्याला वाटे, नको, आपण खून केला हें कळल्याबरोबर आपल्याला धरतील अन् फासावर चढवतील ! तेव्हा आपलं कृत्य आपल्याला लपवलंच पाहिजे. मनाच्या या चमत्कारिक आंदोलनाचा शीण त्याला सोसवेना, तेव्हां तो माइकोवाकडे गेला. तिच्या बाहुपाशांत पडल्यावर येणाऱ्या गुंगीनं साऱ्या जगाचा आपल्याला एक रात्र तरी विसर पडेल अशी त्याला आशा होती. पण पोलीस त्याच्या पाळतीवर होते. त्यांनी माईकोवाच्या शृंगारमंदिरांतच त्याला पकडलं असतं; पण त्या चतुर सहृदय स्त्रीनं पोलिसांची दिशाभूल केली अन् ज्योआकीमला पळून जायला संधि मिळाली.

ज्योआकीम पळाला; पण सरकारी पोलिसखात्याची नजर आपल्यावर असणार हें त्याला विसरतां येत नव्हतं. रानोमाळ भटकावं, जंगलांत चार दिवस काढावे, भुकेनं व्याकुळ केलं कीं एखाद्या शेतावर हमाली करावी, चार पैसे मिळाले कीं पुढें प्रवास करावा, खाणींत मजुरी करावी, तिथं संप झाला कीं दुसरं गांव गाठावं, तिथंहि

आपल्या पाळतीवर कुणी तरी आहे असा संशय येतांच तिथून रातोरात जीव घेऊन पळावं—अशा अनन्वित शारीरिक व मानसिक अपेष्टा सोशीत बिचारा दीड वर्ष हिंडला. या गुप्त प्रायश्चित्तापेक्षां आपण पकडले जाऊन फासावर लटकलों असतों तर तें अधिक सुसह्य झालं असतं असं बिचाऱ्याला अखेर वाटूं लागलं. मग त्यानं मनाशी ठरवलं, कीं घरीं परत जावं, डोळे भरून आईला पाहावं, पोटभर जेवावं, दीड वर्षाच्या भ्रमणानं थकलेली आपली कुडी एक रात्र का होईना मृदु शय्येवर टाकावी—मग आपलं पुढं काय व्हायचं असेल तें होईल ’

पण तो घरी जाऊन पाहतो तों त्याची आई मृत्युवश झाली होती, बापहि पक्षघातानं अंथरुणाला खिळला होता, त्याची बहीण शार्लोटि हिचा आस्केनिअसनं विश्वासघात केला होता. तिला एक मुलगा झाला होता आणि ती मोठ्या धैर्यानं काबाडकष्ट करून दिवस कंठीत होती. आस्केनिअस कुठं आहे तें तिला माहीत नव्हतं. तिला आपल्या भावाची करुणा आली. पण त्याला रात्रभर घरांत राहूं द्यायला तयार होईना. ती त्याला म्हणाली, ‘तुझ्या त्या मूर्ख कृत्याचे परिणाम आम्हांला आजपर्यंत भोगावे लागले तेवढे पुरे! आता तुझ्या संपर्कानं आणखी हाल सोसायचा त्राण नाहीं राहिला आमच्या अंगांत!’ ज्योआकीमला अतिशय खेद झाला. त्याचं शूर कृत्य त्याच्या आप्तेष्टांच्या व देशबांधवांच्याहि दृष्टीनं मूर्खपणाचं ठरलं होतं! तो घरांतून पुन्हा बाहेर पडला. माइकोवाची त्याला आठवण झाली; पण ती स्वदेशीं परत गेली होती.

मग त्यानं एका वेड्याच्या इस्पितळांत माळ्याची नोकरी मिळविली. पण कांहीं दिवसांनंतर त्याला शंका आली, कीं पोलिसांना आपला सुगावा लागला आहे. म्हणून एके दिवशी तो तिथून पळाला व अरण्यांत लपला. त्याच वेळी इस्पितळांतला एक वेडाहि पळाला व त्याच अरण्यांत शिरला. ज्योआकीम

अरण्यांत लपला आहे हें पाहून सरकारी शिपायांनीं वेढा घालून त्याला पकडण्याचा प्रयत्न केला. झटापट झाली. शिपायांनीं गोळ्या झाडल्या. त्यांच्या हातीं जें प्रेत लागलं तें ज्योआकीमचंच असलं पाहिजे याबद्दल त्यांना शंका यायचं कारणच नव्हतं. दुसऱ्या दिवशीं सर्व वृत्तपत्रांनीं बातमी छापली, कीं मुख्य प्रधानाचा खून करणाऱ्या इसमाचा पोलिसांच्या हल्ल्यांत अंत झाला. खुनी इसम दीड वर्ष झालं तरी पकडला जाऊं नये याबद्दल प्रक्षुब्ध झालेलं लोकमत शांत झालं!

परंतु ज्योआकीम मेला नव्हता. तो फक्त जखमी झाला होता. इस्पितळावरचे मुख्य डॉक्टर लेन्झबर्ग यांनी त्याची उत्तम प्रकारें शुश्रुषा तर केलीच; पण त्याचं नांवहि गुप्त राखून त्याला वांचविलं. त्याच्या प्रक्षुब्ध व पश्चात्तप्त चित्ताला शांति मिळावी अशा प्रकारें त्यांनीं त्याच्याशीं त्याच्या कृत्याची चर्चाहि केली. 'जे जे अनन्वित भोग तूं भोगलेस त्यामुळं तूं आतां मुक्त झाला आहेस, आतां तूं आपलं कृत्य मनांत ठेवूंच नकोस, देशांतर कर आणि सुखानं राहा.' असा त्यांनी त्याला उपदेश केला व धीर दिला. प्रकृति सदृढ होतांच ज्योआकीम अमेरिकेस गेला.

तिकडे नीट उद्योगधंदा मिळवून तो दहा वर्ष चांगल्या प्रकारें राहिला. पण मग मायभूमीस परत गेल्यावांचून त्याच्या जिवाला राहावेना. तो परत जर्मनीस आला. मात्र मोठ्या शहरीं जाण्याऐवजीं समुद्रकाठच्या एका शांत गांवढ्यांतच रहायचं त्यानं ठरविलं. मच्छी-मारी अन् शेती हे या गांवढ्यांतल्या लोकांचे मुख्य धंदे होते. लोक अडाणी पण सुखी होते. त्यांच्या साध्या निष्कपट राहणींत मिसळून जावंसं ज्योआकीमला वाटलं. गांवातला एक कोळी नुक्ताच मेला होता. त्याच्यामागं राहिलेल्या विधवेला कोणी पुरुष माणूस मदतनीस म्हणून मिळाला तर हवा होता. तिच्या घरीं ज्योआकीम राहूं लागला व मच्छी-मारीच्या कामांत रात्रंदिवस मनःपूर्वक खपूं लागला.

ज्योआकीमनं माइकोवाच्या सहवासांत विषयसुख अनुभवलं असलं तरी स्त्रीप्रेमाचा अनुभव त्याला नव्हता. स्त्रीच्या शुद्ध प्रेमांत सांपडायला त्याला फुरसतच झाली नव्हती, एक धाडसी दिव्य करण्यांत अन् त्या कृत्याचे परिणाम भोगण्यांत त्याचं सारं तारुण्य खर्च झालं होतं; पण आतां मध्यवयांत आणि या साध्या अडाणी गांवढ्यांत त्याच्या आयुष्यांत उन्मत्त प्रेमानं एकाएकीं प्रवेश केला ! त्यानं जेव्हां एके दिवशीं सूर्यास्ताच्या सुमारास त्या खेड्यांत प्रथम पाऊल टाकलं तेव्हां त्याची तृषा शांत करण्यासाठीं एका तरुण गोपीनं त्याला धारोष्ण दूध प्राशन करायला दिलं होतं. हिचं नांव ' स्टाइन. ' हिचा व ज्योआकीमचा सहवास जसजसा वाढला, तसतशीं दोघंहि परस्परांवर अनुरक्त झालीं. स्टाइनशीं लग्न करून आपल्या मालकीच्या छोट्याशा शेतवाडींत सुखानं कालक्रमणा करण्याचीं स्वप्नं ज्योआकीम रचूं लागला. परंतु बिचाऱ्याचं आयुष्य सुखासाठीं कुठं होतं ? एके दिवशीं स्टाइननं त्याचीं सारीं सुखस्वप्नं भग्न करून टाकलीं ! तिचं त्याच्यावर अतिशय प्रेम होतं; पण त्याच्या पत्नीपदावर तिला आरूढ होणं अशक्य होतं. तिचा वाङ्निश्चय आधींच झालेला होता. तिचा नियोजित वर एका गलबताबरोबर दूर देशीं गेला होता. तो परत आला कीं त्याच्याशीं तिचं लग्न होणार हें निश्चित होतं. तिनं ज्योआकीमला विनवलं. ' माझं तुझ्यावर फारफार प्रेम आहे; पण तूं मला विसरलं पाहिजेस ! '

हाहि असह्य आघात ज्योआकीमनं सहन केला. मच्छीमारीचं अन् शेतीचं काम अंगातून घामाच्या धारा येऊं लागेपर्यंत करावं अन् श्रमानंतर येणाऱ्या निद्रेंत साऱ्या गोष्टी विसरून जाव्या अशी त्यानं सवय केली. कांहीं वर्षांनी ज्या विधवेच्या घरीं तो प्रथमपासून राहिला होता तिच्याशीं त्यानं लग्न केलं. त्या बाईच्या पहिल्या नवऱ्याचं नांव 'व्हॉस' असं होतं. ज्योआकीम तिच्याकडे राहूं लागला त्या दिवसापासूनच त्या गांवढ्याचे लोक त्याला 'व्हॉस' या नांवानं ओळखूं व हाक मारूं लागले होते.

अशा प्रकारें पांच वर्षं गेल्यानंतर एके दिवशीं फिरतीवर असलेले एक बडे सरकारी अंमलदार त्या गांवढ्यांत आले. गावकामगारांची त्यांची बरदास्त ठेवण्याची मोठी धांदल उडाली. माशांची शिकार पाहुण्यांना आवडण्यासारखी होती. तेव्हां तो कार्यक्रम ठेवण्यांत आला आणि त्या शिकारींत निष्णात असलेल्या व्हॉसला त्यांच्या दिमतीस देण्यांत आलं. ते अंमलदार व व्हॉस दोघंच मिळून शिकारीस निघाले. कांहीं अंतर चालून गेल्यावर व परस्परसंभाषण झाल्यावर दोघांनीहि एकमेकांस ओळखलं. तो बडा अंमलदार म्हणजे दुसरा कोणी नसून कटवाल्या गुप्त मंडळाचा प्राण आणि ज्योआकीमचा परमप्रिय स्फूर्तिदाता मित्र आस्केनिअस होता ! तो पुन्हा भेटेल अशी ज्योआकीमची कल्पना नव्हती आणि अशा बड्या अंमलदाराच्या वेषांत भेटेल अशी तर मुळींच नव्हती ! तो अतिशय चकित झाला—विषण्णहि झाला ! आपली ध्येयमूर्ति भग्न होऊन तिची छकलं कशींतरी जोडून तयार केलेली विचित्र मूर्ति आपल्या दृष्टीस पडली असं त्याला वाटलं असल्यास नवल काय ! तो आस्केनिअसकडे पाहातच राहिला ! आस्केनिअसच्याहि ध्यानींमनींसुद्धां नव्हतं, की ज्योआकीम—मेलेला ज्योआकीम समुद्रकांठच्या या कुग्रामांत आपल्याला भेटेल ! त्याला विलक्षण आश्चर्य वाटलं. आनंदहि झाला. ज्योआकीमनं आपली कहाणी थोडक्यांत सांगितली. तेव्हां आस्केनिअस त्याला म्हणाला, ‘ पूर्वीच्या राजकीय अपराध्यांना केव्हांच माफी मिळाली आहे. त्या गोष्टी आतां कुणाच्या लक्षांतहि नाहींत. आपल्या गुप्त मंडळांतले कितीतरी लोक आतां मोठमोठ्या सरकारी हुद्यांवर आहेत. ज्योआकीम, व्यर्थ या गांवढ्यांत आपलं जिणं दवडूं नकोस. माझ्याबरोबर राजधानीला परत चल. मी तुला मोठ्या पगाराची व इतमामाची नोकरी देववितों. इथं कुठं मरतोस *या अडाणी लोकांत ? माझ्याबरोबर चल !* ’ पण ज्योआकीम *म्हणाला, ‘ नको. इथं मी सुखांत आहे. ’ आणि मग आस्केनिअसनं* त्याचीं परोपरींनं आर्जवं केलीं तरी उत्तरादाखल तेवढं एकच तुटक

वाक्य तो उच्चारीत राहिला. आस्केनिअसचा नाइलाज झाला. त्या गांवांतला मुक्काम आटपल्यावर तो पुढं निघून गेला. ज्योआकिम त्या गांवव्याशीं एकनिष्ठ राहिला.

पण फार दिवस नाहीं !

तो समुद्रांत बुडून मेल्याची बातमी एके दिवशीं गावकामगाराकडे आली. कोणी म्हणत, त्यानं मुद्दाम पाण्यांत उडी घेतली !

एखादी कादंबरी वाचून संपविली, कीं सामान्य वाचक मनाशीं म्हणतो, 'अस्सं, एकूण या कादंबरीच्या द्वारें लेखकाला अमुक-अमुक गोष्ट सांगायची होती तर ! समजलों.' आणि असं म्हणून त्या कादंबरीबद्दलचा विचार तो आपल्या मनावेगळा करतो. पण तुम्हांला जर कथालेखनाचा अभ्यास करायचा असेल तर असं करून भागायचं नाहीं. कादंबरींतली मध्यवर्ति कल्पना तुमच्या लक्षांत आल्यावर तुम्हीं पुन्हा एकदा तिच्या कथानकावरून नजर टाकली पाहिजे आणि त्या कल्पनेच्या परिपोषासाठीं कथानकाच्या विविध अंगांचा उपगोग करण्यांत लेखकानं जी योजकता व चतुराई दाखविलेली असते ती शक्य तितकी समजून घेतली पाहिजे. आतां या 'गुप्त प्रायश्चित्त' कादंबरीचाच अशा प्रकारें जरा विचार करा बरं.

या कादंबरीच्या द्वारें लेखिकेला काय सांगायचं आहे ? तिला मुख्यतः सुचवायचं आहे तें हें, कीं अंध, अविचारी देशभक्तीनं प्रेरित होऊन केवळ भावनेच्या भरांत केलेल्या अत्याचारानं देशाचा खरा उद्धार होऊं शकत नाहीं. जी व्यक्ति अशा प्रकारचा अत्याचार करते ती रीतसर कायद्याच्या शासनांतून सुटली तरी तिला अंतर्यामीं जें गुप्त प्रायश्चित्त भोगावं लागतं तें भयंकर असतं आणि एखादे वेळीं अखेर त्या व्यक्तीला असंहि कळून येतं, कीं ज्यांच्या त्यागाचं अन् शौर्याचं उदाहरण आपण डोळ्यांसमोर ठेवलं,

ज्यांच्या प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष प्रोत्साहनानं आपण आपल्या प्राणांवर उदार होऊन पराकाष्ठेचं साहस केलं, ती माणसं कालांतरानं बदललीं, ध्येयच्युत झालीं, सत्तेशीं समरस झालीं आणि आपण ध्येयाच्या ज्योतीवर झडप घालून आपल्या जीविताचा सर्वनाश करून घेतला तरी जगाच्या व्यवहारी दृष्टीनं आपण मात्र मूर्ख ठरलों! किती कठोर व करुण कल्पना आहे ही! पण किती सत्य! जर्मनीच्याच कशाला, आपल्या देशाच्याहि इतिहासांत या सिद्धान्ताचे दाखले काय थोडे सांपडतील? अगदीं आज घटकेला कॉंग्रेसनं अधिकारग्रहण केल्यानंतर निस्सीम देशसेवकांच्या नशिबाला जे हाल आले व येत आहेत त्यावरून हाच सिद्धान्त उघड होत नाहीं काय? म्हणजे व्हिकी बाउमनं कादंबरीसाठीं विषय निवडतांनाच असं कौशल्य दाखविलं आहे, की ती शोककथा कुठल्याहि देशांतल्या कुठल्याहि वाचकाच्या हृदयाला जाऊन भिडावी आणि कादंबरींतील मध्यवर्ति कल्पना याप्रमाणं ठरविल्यानंतर ती कथारूपानं सजविण्यांत लेखिकेनं ज्या योजना केल्या आहेत त्या तर फारच मनोहर असून तुम्हीं त्यांचाच विशेष लक्षपूर्वक अभ्यास केला पाहिजे.

प्रथम हें पाहा, की या 'गुप्त प्रायश्चित्त' कादंबरींत विस्मयजनक घटनांचं महत्त्व असलं तरी त्यांची संख्या अगदींच कमी आहे. कादंबरींत गुप्त मंडळ आहे, खून आहे, पाठलाग आहे, धरपकड आहे—अखेर आत्महत्याहि आहे; परंतु या चित्रविचित्र घटनांचा उपयोग लेखिकेनं केवळ पार्श्वभूमीदाखल केलेला आहे. त्यांस प्राधान्य देण्याचा तिचा हेतु नाहीं, त्या घटनांच्या भाषेंत कादंबरीचा सारांश सांगायचा झाला, तर चार वाक्यंदेखील लागायचीं नाहींत. 'ज्योआकीम नांवाचा एक तरुण प्रधानाचा खून करून पळाला. दीड वर्षानं पोलिसांनी त्याला एका अरण्यांत गाठलं. झटापट झाली. तींत तो मेला असं पोलिसांना वाटलं. पण तो जखमी होऊन निसटला, अमेरिकेस गेला, दहा वर्षांनीं परत येऊन समुद्रकाठच्या एका खेड्यांत राहूं लागला आणि तिथंच एके दिवशीं समुद्रांत

बुडून त्याचा अंत झाला ! ' कादंबरीचं कथानक पाहिलं तर यापलीकडे काय आहे ? कांहीं नाही. पण लेखिकेला मुळी बाह्य सृष्टींतल्या घटनांवर फारसा भर द्यावयाचाच नाहीं. तिला जें कांहीं सांगायचं आहे तें माणसांच्या अंतःसृष्टीचीं वेधक चित्रं काढल्यानंच उत्तम प्रकारें साधण्यासारखं आहे आणि यासाठीं तिनं काय केलं आहे ? तिनं पात्रांची जुळणी फार मार्मिकपणानं केलेली आहे.

व्हिकी बाउमनं आधी मनाशीं असा विचार केला असला पाहिजे, कीं जी कल्पना आपल्याला विशेष कटाक्षानं सांगायची आहे ती एका व्यक्तीच्या चरित्राच्या रूपानं सांगितली तरच परिणामकारक होईल. हें ठरल्याबरोबर कादंबरीची निवेदनपद्धति ठरली, हे तुम्ही नीट लक्षांत घ्या. कारण एका व्यक्तीचं चरित्र वाचकांच्या मनावर ठरवायचं म्हटल्याबरोबर हें उघडच झालं, कीं कादंबरींत सतत त्या व्यक्तीचीच हकीकत दिली पाहिजे. त्या व्यक्तीच्याच अनुभवांचीं व सुखदुःखांचींच वर्णनं करीत गेलं पाहिजे. त्या व्यक्तीचा जीवितप्रवाह कोणकोणत्या वळणांनीं वाहत गेला व त्याचे त्याच्या वृत्तीवर कोणकोणते बरेवाईट परिणाम झाले तेंच सारखं सांगत राहिलं पाहिजे.. अशी निवेदनपद्धति स्वीकारली तरच कादंबरी वाचून संपवितांच वाचक मनाशीं म्हणेल, ' अरे...अरे ! बिचाऱ्या ध्येयप्रेरित शूर ज्योआकीमची काय विचित्र हृदयस्पर्शी कथा ही ! ' वाचकांच्या तोंडून हा उद्गार आपण काढला तरच आपल्या लेखनचातुर्याचा विजय होय हें व्हिकी बाउमला समजत होतं अन् म्हणूनच या कादंबरीला ललितचरित्राचं स्वरूप द्यायचं तिनं ठरवलं असलं पाहिजे. लघुकथेच्या वाचनानं वाचकांच्या चित्तावर एकच एक आघात व्हावा असं म्हणतात. कादंबरीच्या वाचनानंहि वाचकांच्या मनावर प्रमाणानं मोठा पण एकच एक आघात करतां आल्यास ती एक ललितलेखनांतली विशेष गंमत म्हणतां येईल. ही अवघड गंमत साधायची असल्यास कादंबरीला एकाच व्यक्तीच्या चरित्राचं

स्वरूप यावं हें पाश्चात्य लेखकांनीं आतां पुरतं ओळखलं आहे. अलीकडे प्रसिद्ध होणाऱ्या यशस्वी कादंबऱ्यांपैकीं बहुतेकांत याच तंत्राचा अवलंब केलेला तुम्हांला दिसेल. व्हिकी बाउमच्या 'गुप्त प्रायश्चित्त' या कथेला तर हें तंत्र अतिशयच अनुकूल होतं. तिनं या कादंबरींत ज्योआकीमचं काल्पनिक चरित्र रंगवायचं ठरविलं यांत आश्चर्य नाहीं.

ज्योआकीमचं चरित्र सांगायचं ठरलं, पण त्यासाठीं त्याच्या विशिष्ट स्वभावाची एक रूपरेखा आंखून घेऊन त्याच्या अंगच्या गुणदोषांना उठाव देण्यासाठीं भिन्नभिन्न स्वभावांचीं तीनचार पात्रं त्याच्याभोंवतीं उभीं करणं व्हिकी बाउमला आवश्यक होतं आणि ही गोष्ट करतांना तिनं जी मार्मिकता व चतुराई दाखविली आहे तिचा अभ्यास करावा तितका उपयुक्त ठरेल. या बाबतींत व्हिकी बाउम नेहमीच विशेष कौशल्य लढवीत असते. आतषबाजीच्या वेळीं 'आंट' उडवितात. तो पेटल्याबरोबर निघतो तोच पोटांत असा मालमसाला घेऊन कीं आभाळांत उंच चढल्याबरोबर त्याचा स्फोट होऊन विविध रंगचमत्कार बाहेर पडावेत. व्हिकी बाउमच्या कादंबऱ्यांचं असंच आहे. तिची कादंबरी सुरू होते तीच अशा परस्पर-विरोधी चमत्कृतिपूर्ण स्वभावांच्या पात्रांनिशीं कीं त्यांच्या घर्षणांतून एकाहून एक अधिक मनोहर फवारे फुटून बाहेर पडावेत. तिच्या कादंबऱ्यांची सारी रंगत याच कौशल्यावर अवलंबून आहे. 'गुप्त प्रायश्चित्त' कादंबरींत तर तिनं हें आपलं कौशल्य विशेषच प्रगट केलं आहे. कसं तें पाहा.

तिनं कादंबरीच्या नायकाचा स्वभाव कसा कल्पिला आहे? तो एक विद्यार्थीदशेतला पोरसवदा तरुण आहे. देशाच्या दुःस्थितीचा व तीवरील उपायांचा त्यानं सशास्त्र पद्धतीनं, चिकित्सक बुद्धीनं अगर शान्त मनानं कधीं विचार केलेला नाहीं पण आपले देशबांधव स्वतंत्र व सुखी व्हावेत अशी अमर्याद तळमळ त्याच्या अंतःकरणांत

आहे. त्याचं मन अतिशय संस्कारसुलभ आहे. तो भावनाप्रधान आहे. अत्याचारावर त्याची श्रद्धा आहे. साहसाशिवाय कांहीं साधायचं नाहीं असं त्याला वाटतं आणि तें साहस स्वत: करायची त्याची तयारी आहे. सारांश, हा स्वभाव म्हणजे एक भयंकर स्फोटक द्रव्य म्हटलं पाहिजे. या द्रव्याला काडी लागायला हवी होती, तें साधण्यासाठीं लेखिकेनं आस्केनिअसचं पात्र निर्माण केलं. आस्केनिअसविषयीं ज्योआकीमच्या मनांत अमर्याद आदराच्या, श्रद्धेच्या व प्रीतीच्या भावना होत्या असं दाखविलं. आस्केनिअस निश्चयी तर ज्योआकीम कांहींसा घाबरट; एक पट्टीचा वक्ता तर दुसरा मुखदुर्बळ; एक आपल्या गंभीर विचारांचं ओझं सहज वागवून जीविताशीं रंगेल वृत्तीनं खेळणारा तर दुसरा त्या ओझ्याखालीं दडपून जाऊन चिडणारा; अशा अनेक विरोधांची त्या दोन चित्रांत लेखिकेनं योजना केली. आणि या दोन मित्रांच्या गूढ स्नेहांत एक गमतीची मोहक छटा उत्पन्न करण्यासाठीं तिनं जी एक छोटीशी पण मोठी हृदयंगम युक्ति केली ती तुमच्या लक्षांत आली कीं नाहीं ?

तिनं ज्योआकीमची एक बहीण निर्माण केली आणि आस्केनिअसच्या कर्तृत्वाची व वक्तृत्वाची जशी ज्योआकीमवर विलक्षण मोहिनी पडली होती तशीच त्याची बहीण शार्लोटि आस्केनिअसच्या प्रेमपाशांत सापडली होती असं दाखविलं. हें करतांच या तीन व्यक्तींच्या समूहाला एकदम किती नीटनेटकेपणा, सुटसुटीतपणा, एकत्व आणि सौंदर्य आलं तें मनन करण्यासारखं आहे. चित्रकलेंतला एक न्याय सांगतात तो असा, कीं चित्रांतल्या वस्तूंच्या मांडणींत वादित्व-संवादित्व असलं पाहिजे, सूत्र दिसलं पाहिजे, परस्परपोषकत्व व्यक्त झालं पाहिजे. व्हिकी बाउमनं निर्माण केलेलं ज्योआकीम, आस्केनिअस व शार्लोटि या तिघांचं चित्र या कसोटीला खचित पुरेपूर उतरेल.

पण ही गंमत कांहींच नव्हे, अशी पात्रनिर्मितीच्या बाबतींतली दुसरी एक गंमत लेखिकेनं केली आहे आणि एका अविचारी

तरुणाच्या मूर्ख सत्कृत्याच्या कटु परिणामांची ही शोककथा वाचतांना हृदय द्रवत असेल तर त्याचं अर्धं श्रेय या दुसऱ्या युक्तीला दिलं पाहिजे. ही युक्ति म्हणजे ज्या मुख्य प्रधानाचा ज्योआकीमनं खून केला त्याचं स्वभावचित्र रंगवितांना व्हिकी बाउमनं दाखविलेली कल्पकता.

कादंबरीचं एकच लहानसं प्रकरण या पात्राच्या वर्णनासाठीं खर्ची घातलेलं आहे. पण तें वाचतांच मुख्य प्रधानाविषयीं वाचकाच्या मनांत विलक्षण सहानुभूति निर्माण झालीच पाहिजे अशा हमखास कौशल्यानं तें लिहिलं गेलेलं आहे. आपलं काम आटोपून दमूनभागून मुख्य प्रधान घरीं आला, आपल्या बहिणीशीं चार गोष्टी बोलला आणि थोडा चहा पिऊन एक ग्रंथ वांचतांवाचतां अंशतः श्रमांनीं, अंशतः चिंतनासाठीं त्यानं त्या ग्रंथाच्या पानावर आपलं मस्तक टेकलं—एवढंच वर्णन आहे त्या प्रकरणांत. परंतु तें वाचल्याबरोबर आपल्या लक्षांत येतं, कीं तो मुख्य प्रधान नुसता एक सद्धेतूंनीं प्रेरित झालेला मुत्सद्दीच नव्हे, तर एक ज्ञानयोगी तत्त्वज्ञ होता ! आपल्या बुद्धीप्रमाणं देशहित करतांना कर्तव्यापासून ढळायचं नाहीं हें त्याचं धोरण होतं. सामान्य जनतेला अशक्याच्या व अप्राप्याच्या वल्गनांचा नाद मोहक वाटतो, त्यांना इतर गोष्टींचं हितकारित्व कळत नाहीं हा मनुष्यस्वभाव होय, हें तो ओळखून होता. त्यामुळं विरोधकांचीसुद्धां कींव करावी–द्वेष नव्हे–अशी त्याची उदार वृत्ति होती, आणि आपल्या अंगीकृत कार्यांत मरण आलं तर तीं एकप्रकारें एका अवघड कामगिरींतून आपली सुटकाच होईल म्हणायची अशी त्याची वेतान्ती भूमिका होती ! ज्योआकीमनं जेव्हां त्याच्यावर गोळी झाडली व त्याचा कोसळणारा देह सावरून त्याचं मस्तक आपल्या मांडीवर घेतलं, तेव्हां ग्लानीनं मिटलेले डोळे काळनिद्रेनं अखेर कायमचे झाकण्यापूर्वी त्यानं एकदां उघडले व ज्योआकीमच्या चेहऱ्याकडे पाहून तो दोनदा म्हणाला—'मित्रा, मोठे उपकार केलेस !'

किती उदात्त, धीरगंभीर चित्र हें ! अन् त्यायोगानं ज्योआकीमच्या प्रमादाला व नंतरच्या पश्चात्तापाला केवढा उठाव येतो ! कादंबरीचा मुख्य विषय सजविण्यासाठीं भिन्नभिन्न स्वभावांच्या पात्रांची इतक्या कौशल्यानं केलेली मांडणी तुम्हांला खरोखर फार थोड्या कादंबऱ्यांत आढळून येईल. आणि या साऱ्या पार्श्वभूमीवर ज्योआकीमच्या मानसिक अवस्थांचीं जीं चित्रं लेखिकेनं रेखाटलीं आहेत त्यांचा तर जों जों सूक्ष्म अभ्यास करावा तों तों लेखिकेच्या अवलोकनशक्तीबद्दल व वर्णनशैलीबद्दल अधिकाधिक आदर वाटूं लागतो. प्रधानाचा खून आपण करावा या कल्पनेचं बीज ज्योआकीमच्या मनांत अंकुरित झाल्यापासून तों कादंबरीच्या अखेर आस्केनिअसची व त्याची अकल्पित रीतीनं भेट होतांच त्याच्या मनाला एक विचित्र मुका आघात होतो तेथपर्यंत निरनिळ्या प्रसंगीं व निरनिराळ्या अवस्थेंत त्या दुर्दैवी जीवाच्या मनोव्यापारांचं जें विवरण या कादंबरीत वाचायला मिळतं त्याची अपूर्व गोडी मी तुम्हांला कोणत्या शब्दांनी सांगूं ? प्रत्यक्ष पुस्तक वाचूनच ती तुम्हांला अनुभवली पाहिजे !

या कादंबरीतले सगळेच प्रसंग लेखिकेच्या निवेदनशैलीची साक्ष देतील असे आहेत. परंतु त्यांतल्या त्यांत जे तीन प्रसंग माझ्या स्मृतीपुढं पुन:पुन्हां तरंगत राहातात त्यांचा उल्लेख करून हें भाषण मी संपविणार आहें.

अमेरिकेंत दहा वर्षं राहून ज्योआकीम स्वदेशीं परत आला तो एका खेड्यांत राहिला व तिथं स्टाइन नांवाच्या एका तरुण गवळणीवर त्याचं मन बसलं. आयुष्यांत प्रणयाचा अनुभव प्रथमच घेणाऱ्या ज्योआकीमचा त्या दिवसांतली मन:स्थिति वर्णितांना लेखिका लिहिते,

‘ अंत:करणांत प्रीति उत्पन्न होतांच जगाचं स्वरूप एका क्षणांत बदलल्यासारखं ज्योआकीमला वाटूं लागलं. आजपर्यंत जगांतल्या दु:खांचे चटकेच त्याला सोसावे लागले होते; पण आतां स्टाइनच्या

प्रेमांत सांपडलेल्या ज्योआकीमनं पाहिलं तों जग किती नवं उज्ज्वल दिसत होतं ! वस्तुमात्रावर कसल्या तरी गूढ प्रकाशाचा उजळा चढला होता ! किती अवर्णनीय शोभा या विस्तीर्ण कुरणांत माजलेल्या रानफुलांची, दरवळलेल्या उग्र गंधाची आणि तरुणीच्या पदाघाताबरोबर वाकणाऱ्या व ताठ होणाऱ्या गवतपात्यांची ! अशा सुंदरसुंदर रहस्यमय गर्द राई त्यानं कधी पाहिल्या होत्या का ? वृक्षशाखांवर पर्णराजीनं केलेली इतकी गोड सळसळ त्यानं कधी ऐकली होती का ? नुसती एखाद्या भव्य वृक्षाची विस्तीर्ण छाया दिसली तरी त्याचा ऊर कसल्याशा अतुरतेनं भरून येई, झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याचं संगीत घटकान् घटका ऐकत राहावंसं त्याला वाटे आणि पिठूर चांदणं पडलं की तें पाहातांच त्याला वाटे, आपलं हृदय कुणीतरी आपल्या शरिरातून ओढून घेत आहे ! हवेंत कांहीं निराळाच गुण आला होता अन् आपल्या नसानसातून साधं रक्त नव्हे तर कसलातरी उष्ण, उन्मत्त उल्हास रात्रंदिवस वाहत आहेसं ज्योआकीमला वाटत होतं. सुखाच्या व आनंदाच्या सुगंधी फुलांनी काठोकाठ भरलेल्या परड्या हातीं घेऊन नाचाचा फेर धरणाऱ्या हसऱ्या पोरींप्रमाणं दिवसांमागून दिवस येऊन जात होते !...'

परंतु आपल्या प्रेमाचा स्टाइनकडून स्वीकार होणं शक्य नाहीं, हे ज्योआकीमला कळलं, स्टाइनला विसरून जाणं कठीण होतं; पण तेंच आपलं कर्तव्य आहे हें त्यानं ओळखलं. तिची गाठच पडूं नये अशा धोरणानं तो वागूं लागला. तिचं मनसोक्त चिंतन करायला तो मोकळा होता आणि तें तो सदा करी. एखाद्या रात्रीं तो गवताच्या ढिगावर पडे अन् आकाशातल्या ताऱ्यांकडे बघत स्टाइनविषयीं विचार करी आणि मग रात्र संपून दिशा उजळल्या कीं तो भानावर येई. एकदा तो असाच पडला असतांना त्याला कुणाचीशी चाहूल ऐकूं आली.

'कोण, स्टाइन ?' त्यानं हळूच विचारलं. त्याचा आवाज कांपत होता, हृदय वर येऊन त्यानं जणू कंठ दाबून टाकला होता.

स्टाइन म्हणाली, ' होय, मी. '

' तूं माझ्या भेटीला आलीस ? '

' हो, मी तुझ्या भेटीला आलें. पण तूं कांहीं करतां कामा नये. '

' छे, छे ! भिऊं नकोस. पण इथं माझ्याजवळ तर बसशील ? मला भेटायला आलीस. स्टाइन, किती उपकार झाले तुझे माझ्यावर, तुझा हात धरूं का ? '

' हूं '

' किती रसरशीत बोटं आहेत तुझीं ! खचित तूं मोठी करारी गृहिणी होशील. खूप काम करशील, नवऱ्याला खूष ठेवशील !–हें काय ? स्टाइन, तूं रडतेस काय म्हणून ! अं हं, रडायचं नाहीं. बघ, मी कांहीं करीत नाहींना बरं ! तुझं म्हणणं बरोबर आहे. स्टाइन, किती झालं तरी भटकत भटकत इथं येऊन राहिलेला एक परका इसम मी ! तूं माझी व्हावीस हें कसं शक्य आहे ? माझ्या एकेक गोष्टी तुला कळल्या तर—छे छे, नकोच तें. पण स्टाइन, एकदाच सांग, तुझं माझ्यावर प्रेम आहे का ? '

' फार फार आहे रे. '

' पण तुझं लग्न ठरलं आहे, तसं व्हावं हेंच उत्तम. मात्र मनांत पुनःपुन्हा येतं, त्या दिवशीं तूं गायीचं ताजं दूध देऊन माझी तहान भागवलीस अन् आज तूं माझ्या भेटीला इथं आलीस ! हें बघ स्टाइन, या जगांत माझं असं मला कोण आहे अन् सुख तरी कशांत मानायचं मीं ? पण या क्षणीं मी अगदी आनंदांत आहें. माझा आनंद समजून सांगतां यायचा नाहीं तुला. पण मी फार फार आनंदांत आहें बघ या वेळीं. किती शान्त, एकान्ताची जागा आहे ही......'

ज्योआकीमनं आपले हात तिच्या वक्षभागावर ठेवले अन् किंचित् वाकून त्यानं आपलं मस्तकहि तिच्या स्तनद्वयाच्या मधल्या जागीं ठेकलं. तिच्या अंतःकरणाच्या धडधडीनं स्फुरणाऱ्या आणि कंप पावणाऱ्या दोन ग्रीष्मपक्षांचा उष्ण स्पर्शच आपल्याला झालासं त्याला वाटलं !

त्याचा जीव एका छोट्या निळसर चंदेरी मेघखंडावर आरूढ होऊन अंतराळांत उडाला आणि चंद्रबिंब ओलांडून त्यानं स्वर्गमंडळांत भरारी मारली !

त्यागी, संयमी प्रणयाचं हें वर्णन किती बहारीचें आहे ! असलीं काव्यमय, हृदयस्पर्शी वर्णनं या लेखिकेनंच करावींत !

याप्रमाणंच ज्योआकीम व आस्केनिअस यांची कथानकाच्या शेवटीं जेव्हां अकस्मात् पुन्हा भेट होते तेव्हांचा प्रसंग व्हिकी बाउमनं मोठ्या चातुर्यानं रंगविला आहे. आस्केनिअस ज्योआकीमला परोपरीनं आग्रह करतो, कीं ' इथं आयुष्याचं मातेरं करून घेऊं नकोस, माझ्याबरोबर राजधानीला चल. ' पण ज्योआकीमचं उत्तर एकच– ' इथं मी सुखांत आहें. ' हा संवाद जेव्हां बंद पडला, तेव्हाचं वर्णन पाहा—

' मग आस्केनिअस अधिक बोलला नाहीं. बोलून काहीं उपयोग नव्हता. ज्योआकीमची व त्याची अवस्था दोन ध्रुवांसारखी झाली होती. त्यांच्यांत समान धर्म उरला नव्हता. आस्केनिअस आपल्या जीवनांत स्थिर राहिला होता, मोठ्या हुद्यावर चढला होता, त्यानं कीर्ति मिळविली होती. उलट पाप, प्रायश्चित आणि दुःखभोग यांच्या योगानं ज्योआकीमनं नाना अवस्था भोगल्या होत्या, दूरदूरचे देश पाहिले होते, आणि कित्येकदां यमलोकाच्या सरहद्दीवरचं वारं त्याच्या अंतरात्म्याला लागलं होतं ! एके काळीं एकाच कार्यासाठीं ज्यांनीं खांद्याला खांदा लावला होता, एकदां

जे गाढ स्नेहानं बद्ध झाले होते, ते दोघे या घटकेला शेजारीं शेजारीं बसले होते खरे, पण काय बोलावं तेंहि त्यांना सुचत नव्हतं ! शतसहस्र योजनांचं अंतर त्यांच्यांत पडलं होतं !...'

आणि या प्रसंगाहूनहि हृदयाचा अधिक ठाव घेणारा कादंबरीतला प्रसंग कोणता म्हणाल, तर दीड वर्ष रानोमाळ भटकल्यावर ज्योआकीम थकून, विटून घरीं परत येतो व त्याची बहीण शार्लोटि त्याला खाऊं घालते पण घरांत राहूं देत नाहीं त्या वेळचा ! या वेळचे बहीणभावातले सारे संवाद पुनःपुन्हा वाचावे व अभ्यासावे असे झाले आहेत. वाक्यावाक्यांत मानवी स्वभावाची एकेक मृदु अगर कठोर लकेर स्पष्ट केलेली आहे. करुणा व काठिण्य, आर्जव आणि निर्धार यांची झटापट दाखविली आहे आणि इथूनतिथून प्रसाद भरलेला आहे, आस्केनिअस शार्लोटिला टाकून गेला. पण त्याच्यापासून तिला मूल झालं आहे हें कळतांच ज्योआकीम स्तिमित होतो. पण ती म्हणते,

'जाईना आस्केनिअस गेला तर ! तो गेला म्हणून मी रडत बसूं कीं कांय ? छे ! मला वाटतं, हक्क नसतां ज्या माता होतात, त्या माझ्यासारख्या स्त्रियांना त्या अपत्यामुळं एक प्रकारचं विलक्षण धैर्य येतं. त्यांच्या जीवातल्या साऱ्या शक्ति एकवटून उचंबळून येतात आपल्या बाळाचं रक्षण करण्यासाठीं ! मी फार सुखांत आहें. माझा मुलगा—'

'मला दाखवतेस तुझा मुलगा ?' ज्योआकीमनं भीतभीत विचारलं.

त्या प्रश्नानं शार्लोटीला विलक्षण आनंद झाला. ती आतांपर्यंत भावाशीं कठोरपणानं वागली होती, पण आतां ती एकदम मृदु झाली. तिनं त्याला आनंदभरानं मुलाच्या खोलींत नेलं अन् पाळण्याकडे बोट दाखवून म्हटलं, 'पाहिलंस ?'

आणि अखेर जेव्हां तिनं भावाला निरोप दिला, तेव्हां तिचं अंतःकरण एकीकडे मायेच्या पुरानं भरून आलं होतं. ती एक शब्दहि बोलली नाहीं. आपण बोलायचा प्रयत्न केला तर एकदम त्याच्या गळ्याला मिठी मारून रडूं लागूं असं तिला भय वाटत होतं.

‘ अखेर घराच्या पुढच्या दारांत दोघं आलीं तेव्हां तिनं एकदम जवळ सरकून त्याचं चुंबन घेतलं आणि आपल्या संकटमय अनिश्चित मार्गाचा प्रवास पुन्हा करायला निघालेल्या त्या दुर्दैवी जीवाला रस्त्यातल्या दिव्यांच्या अपुऱ्या प्रकाशात लोटून ती परत वळली !’

बहिणभावांच्या अखेरच्या भेटीचं अन् निरोपाचं हें करुणरम्य चित्र माझ्या डोळ्यांपुढून कांहीं केल्या हालत नाहीं ! अशीं शब्द-चित्रं ज्या कादंबरींत मुक्तहस्तानं काढलीं आहेत तिची तुमच्या-जवळ याहून अधिक शिफारस मीं केली पाहिजे काय ?

# भाषण चवथें

मनोहरच्या आकाशवाणींतील माझ्या गेल्या तीन भाषणां-नंतर मला जीं अनेक पत्रें आलीं, त्यांपैकीं कित्येकांत मला अशी विनंती केली गेली, कीं "आपण केवळ कादंबऱ्यांबद्दलच विवेचन करायचं ठरवलं आहे काय? आपण तसं ठरवलं असलं, तरी आमची एक नम्र सूचना आपण लक्षांत घ्यावी. ती ही, कीं उत्तमोत्तम कादंबऱ्यांप्रमाणेच एखाद्या दुसऱ्या तरी आधुनिक उत्कृष्ट इंग्रजी नाटकाचं आपण विवेचन करावं. नवीन लेखकांना गोष्टी अगर कादंबऱ्यांप्रमाणेच नाटकंहि लिहिण्याची साहजिकच इच्छा होत असते. वाचकांच्या दृष्टीनं पाहातांदेखील उत्कृष्ट कादंबरीप्रमाणेच उत्कृष्ट नाटकाचंहि रसग्रहण कसं करावं तें त्याला समजल्यास त्याच्या वाचनांतील मार्मिकता अधिक व्यापक झाल्यावांचून खचित् राहाणार नाहीं. एखादी कादंबरी उत्कृष्ट आहे, असं नुसतं वाटणं निराळं व

लेखकानं ती उत्कृष्ट करण्यासाठीं कोणतं कसब वापरलं आहे व कायकाय युक्त्या लढवल्या आहेत, त्यांबद्दलची स्पष्ट समजूत असणं निराळं. लेखकांस व वाचकांस ही समजूत करून देण्याच्या दृष्टीनं आपलीं भाषणं अत्यंत उपयुक्त ठरतील. परंतु आपलीं भाषणं कादंबऱ्यांपुरतींच मर्यादित कां करतां? मधूनमधून एखादं सुंदर नाटकहि आपण चर्चेला घेतलंत, तर आपले आमच्यावर मोठे उपकार होतील."

अशा मजकुराचीं बरींच पत्रं आल्यानंतर मला त्यांतील मुद्दा पटूं लागला व म्हणून आजच्या भाषणांत एका नमुनेदार इंग्रजी नाटकाची चर्चा करण्याचं मीं ठरविलं आहे.

कादंबरी आणि नाटक यांच्या रचनेच्या तंत्रांत पुष्कळच भेद आहेत. कादंबरी केवळ वाचली जाते, उलट नाटक हें मुख्यतः रंगभूमीवरील प्रयोगासाठीं लिहिलं जातं. या मूलभेदामुळं या दोन वाङ्मय-प्रकारांच्या तंत्रांत अनेक प्रकारची भिन्नता निर्माण होते. परंतु ही भिन्नता कितीहि महत्वाची असली तरी कांहीं गोष्टी कादंबरी व नाटक या दोन्ही वाङ्मय-प्रकारांत सारख्याच आवश्यक आणि महत्त्वाच्या मानाव्या लागतात आणि नाट्यलेखकानं त्यांकडे दक्षतेनं लक्ष देणं अगत्याचं असतं. कादंबरीप्रमाणेंच नाटकांतहि मध्यवर्ति समरप्रसंग असावा लागतो. त्यांतहि एकाहून एक अधिक बिकट असे पेच-प्रसंग असावे लागतात. या सर्व पेच-प्रसंगांचे दुवे बेमालूम साधलेले असावे लागतात. विविध पात्रांच्या स्वभावभिन्नतेतून अनेक प्रकारचे विरोध व तज्जन्य नाट्यपूर्ण प्रसंगांची निर्मिति झालेली असावी लागते. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही, कीं संभाव्यतेच्या नियमांचं परिपालन अतिशय काळजीपूर्वक केलेलं असावं लागतं.

इंग्रजी नाटकांचं जुनं तंत्र पार बदलून नवं तंत्र प्रचारांत येऊं लागलं आहे, असं आपण पुष्कळ वेळां ऐकतों आणि तसं आहेहि. परंतु रंगभूमीच्या आधुनिक प्रकृतीमुळें, परिस्थितीमुळें व गरजेमुळें

नाटकाचं तंत्र कितीहि पालटलं, तरी त्या तंत्राचीं जीं मूलतत्त्वं मीं सांगितलीं, तीं नेहमीं अबाधितच राहतील. आधुनिक इंग्रज नाटककारांपैकीं ज्यांनीं हीं तत्त्वं अत्यंत कसोशीनं पाळलीं आहेत व त्यामुळेंच ज्यांना आज श्रेष्ठ पद प्राप्त झालं आहे, त्यांपैकीं सॉमरसेट मॉम् याचं नांव अग्रस्थानीं आहे. या लेखकानं जवळजवळ दोन डझन नाटकं लिहिलीं आहेत. तीं सर्व Heinemann कंपनीनं प्रसिद्ध केलीं आहेत. हीं सर्वच नाटकं आपापल्यापरी वाचनीय आहेत. परंतु त्यांत एक नाटक इतकं सरस व उत्कृष्ट वठलेलं आहे, की सॉमरसेट मॉम्नं हें एकच नाटक जरी लिहिलं असतं तरी नाट्यवाङ्मयांत त्याचं नांव अमर झाल्यावांचून राहिलं नसतं. रचना-कौशल्य, स्वभाव-परिपोष, विषय-प्रतिपादन, संवाद इत्यादि सर्व दृष्टींनीं हें नाटक इतकं नमुनेदार झालं आहे, कीं नाट्यलेखन करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक लेखकानं व नाट्यवाङ्मयाचं मार्मिक रसग्रहण करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक वाचकानं याचीं अभ्यासपूर्वक पारायणं अवश्य करावींत. हें नाटक Heinemann कंपनीनं प्रकाशित केलेल्या व्हॉल्यूम्सपैकीं पांचव्या व्हॉल्यूममधें आहे. या नाटकाचं नांव The Sacred Flame ( पवित्र ज्योति ) असं आहे.

अशी कल्पना करा, कीं एका घरंदाज सुखवस्तु इंग्रज कुटुंबांत मिसेस टॅब्रेट नांवाची एक वृद्ध विधवा स्त्री, तिचे मॉरिस व कॉलिन नांवाचे दोन कर्तेसवर्ते तरुण मुलगे व थोरला मुलगा मॉरिस याची स्टेला नांवाची अतिशय सुंदर तरुण पत्नी अशी मंडळी आहेत. अशा या कुटुंबाच्या जीवनांत नाट्यप्रसंग कसा निर्माण करावा असं जर तुम्हांला कुणी विचारलं, तर साहजिकपणेंच तुम्हांला चटकन् उत्तर देतां येणार नाहीं. किंबहुना लेखनांत बरीचशी सरावलेली अशी जी तुमच्यापैकीं मंडळी असतील, ती म्हणतील, " हें कुटुंब इतकं सुखी अन् समाधानी आहे, कीं त्याचा नाट्यलेखनाच्या कामीं कांहींएक उपयोग नाहीं. " आणि हें उत्तर खरोखरच फार मार्मिक ठरेल. कारण

कादंबरीलेखकाला काय किंवा नाटककर्त्याला काय, जें जीवन पूर्ण सुखानं व समाधानानं भरलेलं आहे त्याचा विशेष उपयोग नसतो. ज्या ठिकाणीं सुख पूर्णांशानं आहे, त्या ठिकाणीं समरप्रसंग उत्पन्न होण्याचा संभव नसतो. असा समरप्रसंग उत्पन्न होण्यास सुखांत कांहींतरी न्यून तरी असावं लागतं किंवा त्या सुखावर अकल्पितपणें एखादं संकट तरी कोसळावं लागतं. या दृष्टीनं विचार केल्यास मघाशीं ज्या कुटुंबाचं वर्णन मी केलं आहे त्या कुटुंबाच्या पूर्ण सौख्यावर कोणतं बरं संकट आपल्यास आणतां येईल, याचा सॉमरसेट मॉम्‌नं मोठा सूक्ष्म व मार्मिक विचार केला असला पाहिजे व त्या विचारांतून 'पवित्र ज्योति' हें त्याचं सुंदर नाटक निर्माण झालं असलं पाहिजे.

या नाटकाचे एकंदर तीन अंक आहेत. नाट्यतंत्राचा एक महत्त्वाचा सामान्य नियम असा समजतात, कीं त्याच्या पहिल्या अंकांत सर्व प्रमुख पात्रांची ओळख झाली पाहिजे व पहिल्या अंकाच्या अखेर पहिला विलक्षण पेचप्रसंग निर्माण झाला पाहिजे. एवढं कार्य पहिल्या अंकांत झालं, कीं पेंचप्रसंगांची वाढती गुंतागुंत, चमत्कृतिजन्य घटना व त्यायोगें वाचकांच्या जिज्ञासेची वाढ, निरगांठ व अखेर उकल इत्यादि गोष्टी बाकींच्या अंकांत लेखकानं साधल्या पाहिजेत. हा नियम सॉमरसेट मॉम्‌नं आपल्या पवित्र ज्योति या नाटकांत किती कमालीच्या कौशल्यानं पाळला आहे, तें मी आतां तुम्हाला सांगतों.

पहिला अंक सुरू होण्यासाठीं पडदा वर जातो त्या वेळीं रंगभूमीवर मिसेस टॅब्रेट व तिचा थोरला मुलगा मॉरिस दिसतात. हळूहळू प्रेक्षकाला असं कळतं, कीं मॉरिस हा मोठा धाडसी वैमानिक होता, महायुद्धांत त्यानं मोठी अपूर्व कामगिरी केली होती, पण नंतर एकदा उड्डाण करीत असतां दुर्दैवानं त्याचं विमान कोसळून, त्या भयंकर अपघातांत त्याच्या कमरेच्या खालचा भाग निकामी होऊन तो अंथरुणाला कायमचा खिळून गेला होता. अपघाताच्या

आधी एकच वर्ष त्याचं स्टेला नांवाच्या एका सुंदर, सद्गुणी मुलीशीं लग्न झालं होतं. त्या अवधींत स्टेलाला मूल झालं नव्हतं व आतां तर त्याबद्दल यत्किंचितहि आशा उरली नव्हती. पाठीचा कणा मोडल्यामुळं मॉरिसला अंथरुणावर पडून मृत्यूची वाट पाहाण्यापलीकडे आयुष्यच उरलं नव्हतं. अशा स्थितींत मॉरिसनं सहा वर्षं काढलेलीं असतात. अंकाच्या प्रारंभीं मॉरिस प्रेक्षकांना दिसतो तो चाकं लावलेल्या बिछान्यावर पडलेलाच दिसतो. मिसेस टॅब्रेट विणकाम करीत बसलेली दिसते. मॉरिसच्या शुश्रूषेसाठीं टॅब्रेट कुटुंबांत राहिलेली वेलंड नांवाची नर्स एक पुस्तक वाचीत बसलेली दिसते. स्वतः मॉरिस अंथरुणावर पडल्यापडल्या ज्या डॉक्टराच्या देखरेखीखालीं तो आज सहा वर्षं आहे त्या डॉक्टर हार्वेस्टरशीं बुद्धिबळाचा डाव खेळत असतो. खेळतांखेळतां तो डॉक्टरशीं अतिशय विनोदानं व आनंदभरानं बोलत असतो. त्या दोघांतल्या संभाषणावरून प्रेक्षकांची खात्री पटते, कीं मॉरिस हा एक मोठ्या धीराचा पुरुष आहे. त्याचं दुखणं वास्तविक असं, कीं मृत्यु ही एकच त्यांतून सुटका व मृत्यु केव्हां येईल त्याचा नियम नाहीं. परिस्थिति अशी, कीं स्टेलासारखी असामान्य सुंदर पत्नी त्याला मिळालेली, परंतु तिच्यांतलं व त्याच्यांतलं पती-पत्नीचं नातं कायमचं नष्ट झालेलं! असं असूनहि मॉरिसनं आपला धीर खचूं दिलेला नाहीं. उलट आपल्या प्रेमळ आप्तांना व मित्रांना आपलं दुःख यत्किंचित्हि दिसूं नये, आपण अगदीं आनंदांत आहों अशीच त्यांची समजूत व्हावी अशा तऱ्हेनं तो वागत असतो. त्याचा चेहरा सदा प्रफुल्लित, भाषण सदा गोड, उत्साहपूर्ण आणि विनोदी असतं.

हें सगळं ऐकून तुम्ही पुन्हा म्हणाल, यांतून नाट्यप्रसंग कसा निर्माण होतो त्याची अजून कल्पना होत नाहीं. तुमचं म्हणणं अगदीं बरोबर आहे. परंतु सॉमरसेट मॉम् यांच्या हातांतले साधे पत्तेच आतांपर्यंत तुम्हांला दिसले आहेत. पहिला अंक अर्धाअधिक संपेपर्यंत आपल्या हातातलीं हुकमी पानं ते दाखवीत नाहींत आणि तीं ज्या

वेळीं ते दाखवितात, त्या वेळी प्रत्येक प्रेक्षकाच्या अगर वाचकाच्या तोंडून एकदम उद्गार निघतो, "अरे बापरे! किती करुणास्पद आणि भयंकर घटना आहे ही!"

सॉमरसेट मॉमच्या हातांतलीं हीं हुकुमी पानं कोणतीं तें आतां नीट बघा.

मॉरिसचा धाकटा भाऊ कॉलिन हा आपल्या बापाच्या मृत्यू-नंतर अमेरिकेस जाऊन तिथंच शेतीभाती करून राहिलेला असतो. आपल्या आईला व वडील भावाला भेटण्यासाठीं तो एक वर्षापूर्वी परत घरीं आलेला असतो व आतां लौकरच अमेरिकेस परत जायचा असतो. त्याचं लग्न अजून झालेलं नसतं.

मीं इतकं सांगितलं तरी कॉलिन हें पात्र म्हणजे नाटक-कर्त्याच्या हातांतलं हुकुमी पान कसं, असाच प्रश्न तुम्ही आपल्या मनाशीं करीत असाल. पण समजा, कॉलिन व स्टेला एकमेकांच्या प्रेमांत सापडलीं, इतकंच नव्हे, तर कॉलिनपासून तिला गर्भ राहिला, तर! हें ऐकतांच तुमच्या अंगावर शहारे आले कीं नाहीं आणि परस्परांवर अत्यंत प्रेम करणाऱ्या या कुटुंबीयांवर केवढं हें भयंकर संकट आलं अन् या संकटांत आता कुणाकुणाच्या सुखाचा चुराडा होणार या कल्पनांनी हतबुद्ध झाल्यासारखं वाटून तुम्हीं आपल्या हातांवर कपाळ टेकलंत की नाही आणि तुमच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले कीं नाहीं? हें झालं, कीं नाटककर्त्यानं अर्धी लढाई जिंकली. हातांतलीं हुकुमी पानं खालीं टाकून मॉमनं विस्मयाचा आणि दुःखाचा पहिला धक्का प्रेक्षकांना दिला आहे व त्या ठिकाणींच त्यानं आपला पहिला अंक पूर्ण केला आहे.

पहिल्या अंकाच्या अखेरीस नाटककर्त्यानं प्रेक्षकांना हा जो विलक्षण धक्का दिला आहे, त्यांतलं खरं मर्म समजण्यासाठीं या अंकाची जरा अधिक विस्तारानं छाननी केली पाहिजे. अंकाच्या

अखेरीस जें विलक्षण, गंभीर, भयकारक आणि कारुण्यपूर्ण वातावरण रंगभूमीवर पसरतं, त्याला उठाव देण्यासाठीं अंकाचा प्रारंभ नाटककर्त्यानं किती उल्हासमय आणि आनंदी वातावरणांत केला आहे, तें लक्षपूर्वक पाहाण्यासारखं आहे. मॉरिस आणि डॉ. हार्वेस्टर यांच्यांतील विनोदी संवाद ऐकतांऐकतां प्रेक्षकाला मनांतल्या मनांत वाटतं, असेल हा मॉरिस आजारी परंतु त्याच्या दुखण्यानं कुटुंबांतील आनंदाचा सूर्यप्रकाश कमी झालेला नाही. मॉरिस, डॉ. हार्वेस्टर व मिसेस टॅब्रेट यांच्या संभाषणांवरून प्रेक्षकाला असं कळतं, कीं आपल्या बिछान्याशेजारीं बसून राहूनराहून कंटाळलेल्या आपल्या तरुण पत्नीनं जरा तरी बाहेर हिंडावंसवरावं, स्वतःच्या मनाची करमणूक करून घ्यावी आणि आनंदानं मजेंत थोडा तरी काळ घालवावा, अशी मॉरिसची नेहमी इच्छा असते.

आपला धाकटा भाऊ कॉलिन घरीं परत आल्यापासून आपल्या प्रिय स्टेलाचा थोडा तरी वेळ हसण्याखेळण्यांत व हिंडण्याफिरण्यांत जात आहे, हें पाहून त्याला मनःपूर्वक समाधान वाटत असतं व ज्या रात्रीं प्रत्यक्ष नाटकाला आरंभ होतो, त्या रात्रीं मॉरिसच्या अत्याग्रहावरून नवा सुंदर पोषाख करून स्टेला कॉलिनबरोबर एका नाटकाला गेलेली असते. या नाटकाला स्टेलानं गेलंच पाहिजे असा मॉरिसनं आग्रह करावा याचं कारण असं असतं, की पूर्वी हेंच नाटक पाहिल्यानंतर त्यानं स्टेलाजवळ आपलं प्रेम बोलून दाखविलं होतं व तिनं त्याच्या प्रेमाचा स्वीकार केला होता. कॉलिन व स्टेला त्या नाटकाला गेलेलीं असतात आणि तीं दोघं परत येण्याची वाट पाहात मॉरिस, मिसेस टॅब्रेट वगैरे मंडळी बसलेली असतात.

स्टेला आणि कॉलिन परत आल्याबरोबर केवढं प्रसन्न आणि आनंदमय वातावरण रंगभूमीवर पसरतं! आपली स्टेला अत्यंत सुंदर आहे व नव्या पोषाखांत ती अतिशय मोहक दिसत आहे, अशा अभिमानानं ती परत येतांच मॉरिस सगळ्यांना म्हणतो— "बघा

बघा माझी स्टेला ! डॉ. हार्वेस्टर, नीट बघा तिच्याकडे अन् सांगा, अशी असामान्य रूपवती स्त्री तुम्हीं कुठं पाहिली आहे का ? हा नवा झगा माझ्या लाडक्या स्टेलाला किती शोभतो बघा !" आणि त्याच्या अंथरुणाच्या कडेवर टेकून बसलेल्या स्टेलाला तो म्हणतो, "किती वेडी ग तूं ? या नव्या झग्यांत तूं खूप मिरवावंस अशी माझी इच्छा ! नाटक संपल्यानंतर तूं व कॉलिन मिळून कुठल्या तरी मोठ्या थाटाच्या हॉटेलांत जेवायला जाल किंवा एखाद्या नृत्यगृहांत जाल अन् मग तिथले सारे पुरुष माझ्या स्टेलाकडे पाहून स्तिमित होतील व म्हणतील, स्वर्गातली ही अप्सरा भूलोकावर कां बरं आली अशी माझी अपेक्षा ! पण स्टेला, तूं किती मूर्ख ? माझ्यापासून तुला फार वेळ दूर राहवेना म्हणून लौकर परत आलीस ! खुळी रे खुळी ! पण आता निदान उठून अशी नीट उभी राहा पाहूं ! अंगावरची ती शाल टाकून दे. तुझे गोंडस हात आणि तुझा कंठ-प्रदेश आणि वक्षभाग या नव्या पोषाखांत किती मनोहर दिसतो तें मला आणि डॉ. हार्वेस्टर यांना डोळेभर पाहूं द्या ! ऊठ, ऊठ, कशी ग साऱ्या मुलुखाची लाजरी तूं ! हं, ऊठ, राहा उभी आमच्या-समोर ! डॉ. हार्वेस्टर, नीट बघा आता माझ्या स्टेलाकडे !"

पति–पत्नींतील आत्यंतिक प्रेमाच्या प्रदर्शनाचा हा क्षण किती मनोहर ! परंतु नाटककर्त्याच्या रचनाकौशल्याची गंमत अशी, की या आनंदपूर्ण क्षणांतच पुढच्या साऱ्या शोकमय घटनेचीं बीजं त्यानं पेरलेलीं आहेत. कारण मॉरिसच्या लडिवाळ आग्रहावरून स्टेला जेव्हा अंगावरची शाल दूर टाकून उभी राहाते, तेव्हा ती क्षणभरच उभी राहून एकदम घेरी येऊन खाली बसते, आणि तिच्या त्या अकल्पित मूर्च्छेचं गुप्त कारण तिच्या सासूच्या लक्षांत ताबडतोब येतं. मॉरिसच्याहि लक्षांत येतं की काय कोण जाणे ! आणि आपली खरी अवस्था आपल्या सासूच्या व पतीच्या लक्षांत आली की काय, अशी दुःखप्रद शंका स्वतः स्टेलाच्याहि मनांत आल्यावांचून राहात नाहीं. हें झाल्याबरोबर अर्थातच एकदम क्षणापूर्वीच्या अत्यानंदाचं

आणि उल्हासाचं दुःखांत आणि चिंतेंत रूपांतर होतं आणि येथून पुढं रंगभूमीवरचा सूर्यप्रकाश पार नाहीसा होऊन, आकाशांत शंका-कुशंकांचे ढग जमलेले दिसतात, दुःखाचा अंधार हळूहळू पसरत चालल्यासारखं वाटतं आणि पुढं होणाऱ्या शोककारक घटनांची सूचना देणारा अस्पष्ट मेघदान प्रेक्षकाला ऐकूं आल्यावांचून राहात नाहीं !

यानंतर नाटककर्त्यानं तीन निरनिराळे संवाद मोठ्या कौशल्यानं घडवून आणले आहेत आणि त्या संवादांत पुढच्या घटनांची सूचना मोठ्या मार्मिकपणानं केली आहे. यांपैकीं एक संवाद मॉरिस व स्टेला यांमधला, दुसरा स्टेला व तिची सासू यांच्यांतला आणि तिसरा स्टेला व तिचा प्रियकर कॉलिन या दोघांतला.

मॉरिस व स्टेला यांच्यांतला संवाद अतिशय कारुण्यपूर्ण आहे. तो तिला म्हणतो–" लाडके, मीं खरोखर तुझ्या जीविताचा नाश केला आहे. ही जाणीव मला कांहीं केल्या विसरतां येत नाहीं. तूं ऐन तारुण्यांत असतांना–आयुष्यांतलीं सारीं सुखं मनसोक्त लुटावीं अशी ज्या अवस्थेंत स्त्रीची स्वाभाविक इच्छा असावी, त्या अवस्थेंत तूं असतांना–माझ्यासारख्या दुर्बल अन् पंगू दुखणाइताशीं केवळ एका लग्नबंधनानं तूं जखडली जावीस, याचं मला फारफार दुःख होतं. तूं माझ्यावर अनन्यसाधारण प्रेम केलंस, माझ्याशीं एकनिष्ठेनं वागलीस, अपूर्व त्याग केलास ! तुझे मी किती आभार मानूं ? तुझ्या सद्गुणाला, चारित्र्याला आणि प्रेमाला या जगांत कशाची तरी उपमा असेल का ? "

असं भाषण करतांना मॉरिसला अपल्या भावना अनावर होतात आणि तिच्या कुशींत मस्तक टेकून एखाद्या असहाय्य अर्भकासारखा तो स्फुंदून रडूं लागतो ! त्याचं तें रुदन आणि त्यानं मुग्धपणानं केलेलं तिच्या एकनिष्ठेचं आणि चारित्र्याचं वर्णन स्टेलाला सहन होत नाहीं. आपण पातिव्रत्याचं उल्लंघन केलं असतांना

पतीच्या प्रेमाशीं निंद्य प्रतारणा केलेली असतांना, धडधडीत दुराचार केलेला असतांना त्यानं भोळेपणानं आपल्याला सद्‌गुणी आणि सुचरिता समजावें, हें पाहून स्टेलाची सद्सद्विवेकबुद्धि तिला असह्य दंश करूं लागते ! इतकंच नव्हे, तर आपल्या शीलभ्रष्टतेचा आपल्या पतीला संशय तर आलेला नाहीं, अशा विलक्षण कटु शंकेची धार तिच्या कोमल हृदयांतून आरपार निघून जाते. ती त्याला पुनः पुन्हा म्हणते, " मॉरिस, कधीं बोलला नाहींस असं आजच कां रे बोलतोस ? माझ्या सद्‌गुणाचं अन् एकनिष्ठेचं वर्णन उगाच कशाला करतोस ? मी एक दुर्बल स्त्री आहें. तूं इतकं अपरंपार प्रेम माझ्यावर करावंस अशी माझी योग्यता नाहीं. तुझ्या या बोलण्यानं माझ्या अंतःकरणाचं पाणीपाणी होतं आहे. तुला कसं अन् काय सांगूं ? मी अतिशय स्वार्थी आहे, अविचारी आहें, पापी आहे ! छे, छे ! लज्जेनं माझं तोंड कुठं लपवूं असं मला झालं आहे ! "

मॉरिसला आपल्या मातृपदाची शंका आली की काय, या जाणिवेनं विव्हल झालेली स्टेला त्या दुःखकारक विस्मयाच्या आघातांतून आपला तोल पुन्हा सावरते न सावरते तोंच तिचं व तिच्या सासूचं संभाषण घडून येतं, आणि त्या संभाषणांत आपल्या गुप्त रहस्याचा संशय सासूला आला असावा असं तिला वाटूं लागून ती अधिकच शोकाकुल होते. ती अशा अवस्थेंत असतांना अंकाच्या शेवटीं ती व तिचा प्रियकर कॉलिन हीं दोघंच रंगभूमीवर उरतात आणि मग त्या दोघांचा जो संवाद होतो, त्यांत शोक, कारुण्य, भीति, निराशा, पश्चात्ताप इत्यादि अनेक भावनांचा जो खळखळाट होतो, त्यानं प्रेक्षकांचीं अंतःकरणं सद्‌गदित झाल्यावांचून राहात नाहींत !

हा संवाद नाटककर्त्यानं फारच कौशल्यानं रचला आहे. त्या संवादांत पुरतीं दहासुद्धां वाक्यं नसतील; परंतु तीं थोडीं वाक्यं इतकीं वेचक व अर्थपूर्ण आहेत, कीं तीं कोणत्याहि सहृदय प्रेक्षकाच्या अंतःकरणाचा ठाव घेतल्यावांचून राहाणार नाहींत. तुम्हांला

त्या संवादाची बहार पूर्णपणें कळावी यासाठी तो सबंध संवाद मी तुम्हाला ऐकवतों.

कल्पना करा कीं मॉरिस, डॉ. हार्वेस्टर, नर्स वेलंड आणि मिसेस टॅब्रेट हीं सर्व पात्रं रंगभूमीवरून गेलीं आहेत. कॉलिन व स्टेला हीं दोघंच आतां दिवाणखान्यांत राहिलीं आहेत. कॉलिन खिडक्या बंद करीत आहे व पडदे ओढीत आहे. रंगभूमीवर जवळ जवळ अंधार पडला आहे. हतबुद्ध व शोकविव्हल झालेली स्टेला अंतराळांत कुठंतरी पाहात उभी आहे. साऱ्या खिडक्या लावून झाल्यावर कॉलिन स्टेलाकडे वळतो व तिला बाहुपाशांत घेण्यासाठी दोन पावलं टाकून तिच्याजवळ जात प्रेमभरानं म्हणतो—

" स्टेला ! स्टेला ! "

ती लडिवाळ हांक ऐकतांच स्टेलाला आपले हुंदके अनावर होतात. ती त्याच्याकडे पाहात राहते. तिच्या डोळ्यांतलं सारं हास्य नाहीसं झालेलं असतं आणि त्या ठिकाणीं दुःख अन् गाढ भीति स्पष्ट दिसत असतात. ती म्हणते,

" कॉलिन, हें आतां सहन करवत नाहीं ! "

**कॉलिन**–( तिच्याजवळ जाऊन ) अरेरे !

**स्टेला**–दूर हो, मला स्पर्श करूं नकोस ! आता मी करूं तरी काय ? कॉलिन, हें आपण काय रे करून बसलों ?

**कॉलिन**–लाडके !

**स्टेला**–मॉरिस मघाशी कांहीं चमत्कारिकच बोलत होता ! त्याच्या बोलण्याचा नीट अर्थच मला कळेना ! आपल्या प्रेमाची त्याला शंका तर आली नसेल ?

**कॉलिन**—छे, छे ! तें शक्य नाहीं.

**स्टेला**—आपलं दोघांचं प्रेम त्याला कधींसुद्धां कळतां कामा नये ! कधींसुद्धां ! तें त्याला कळूं नये म्हणून मी काय वाटेल तें करीन.

**कॉलिन**—मला किती दुःख होतं म्हणून तुला सांगूं ?

**स्टेला**—केवढं बिनतोड संकट आलं हें आपल्यावर ! यांतून कांहीं एक मार्ग निघणं शक्य नाहीं ! कॉलिन, कशाला माझ्यावर प्रेम केलंस ? आणि मी तरी कशाला तुझ्यावर प्रेम केलं ?

**कॉलिन**—स्टेला !

[ तो तिला जवळ घेण्यासाठीं हात पुढें करतो, पण ती दूर होते. ]

**स्टेला**—हाय हाय ! कोण लाजिरवाणी अवस्था ही !

( आपल्या दोन्हीं हातांनी ती आपलं तोंड झांकते. )

या ठिकाणीं पहिल्या अंकाचा पडदा पडतो. त्या दोन हतबुद्ध व दुःखित प्रेमिकांचे निराशेचे शब्द प्रेक्षकांच्या कानांत रेंगाळत राहतात आणि 'कोण लाजिरवाणी अवस्था ही !' असा उद्गार काढून आपल्या हातांत तोंड लपविणाऱ्या स्टेलाचं चित्र प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढून दुसऱ्या अंकाला प्रारंभ होईपर्यंत हालत नाहीं !

पहिल्या अंकाच्या अखेरचं कॉलिन व स्टेला यांच्यामधील संभाषण तुम्हीं नीट ऐकलंत ना ? एखाद्या सामान्य नाटककारानं या प्रसंगीं भाषणाचं केवढं आकांडतांडव माजविलं असतं अन् उपमा-उत्प्रेक्षांची केवढी आतषबाजी केली असती ! पण मॉमनं सातआठ छोटया उत्तर-प्रत्युत्तरांतच हा संवाद पूर्ण केला आहे. पण संवाद छोटा असला, तरी किती प्रभावी ! आणि विशेष म्हणजे, त्या संवादांतच सहजगत्या पुढच्या अंकांतील घटनेची सूचना त्यानं पेरून ठेवली आहे. या संवादांत स्टेला

एकदां म्हणते, "आपलं दोघांचं प्रेम मॉरिसला कळूं नये म्हणून मी काय वाटेल तें करीन." हें तिचं वाक्य ऐकतांना "काय वाटेल तें करीन" या शब्दांचा पूर्ण अभिप्राय प्रेक्षकांच्या लक्षांत येत नाहीं. परन्तु दुसऱ्या अंकांत जी अकल्पित घटना रंगभूमीवर घडून येते, ती पाहतांच प्रेक्षकांना स्टेलाच्या या उद्गारांची एकदम आठवण होते आणि ते स्वतःशीं म्हणतात, "असं काय ! हिच्या त्या शब्दांचा असा अर्थ होता तर !" प्रेक्षकांना असं वाटावं याचं कारण असं, कीं दुसऱ्या अंकासाठीं पडदा वर गेल्यानंतर पांचदहा मिनिटांच्या अवकाशांत त्यांना कळतं, कीं मॉरिस आदल्या दिवशीं रात्रीं जो निजला तो आज सकाळीं आपल्या बिछान्यांत मेलेला आढळला ! आणि अंक जसजसा पुढं जातो तसतशी त्यांना अशीहि शंका येऊं लागते, कीं आपली अवस्था मॉरिसला कळूं नये म्हणून स्टेलानंच त्याला झोपेच्या औषधाचा मोठा डोस देऊन मारलं असावं.

रंगभूमीवरील पात्रांच्या व त्यांच्या द्वारें सर्व प्रेक्षकांच्या मनांत ही भयंकर शंका निर्माण व्हावी, यासाठीं नाटककर्त्यानं मॉरिसच्या मृत्यूभोंवती जी परिस्थिति चतुराईनं गुंफलेली आहे, ती तुम्हांला विस्तरानं सांगण्याइतका आवकाश नाहीं. थोडक्यांत एवढंच सांगतों, कीं मॉरिस कांहीं सहजगत्या मेला नाहीं, त्याला कुणीतरी झोंपेच्या औषधाची एक वडी देण्याऐवजीं सहा वड्या दिल्या आणि त्यामुळेंच त्याला कालनिद्रा आली, ही गोष्ट नाटककर्त्यानं दुसऱ्या अंकाच्या आरंभींच्या संवादांत अगदीं स्पष्ट केली आहे; आणि त्यामुळें मॉरिसच्या दुःखकारक मृत्यूवर एक नवीनच प्रकाश पडून रंगभूमीवरील सर्व पात्रं अन् त्यांच्याबरोबर सारे प्रेक्षक आपापल्या मनांशीं विस्मय करूं लागतात, "पण मॉरिसचा असा घात करील असं या घरांत आहे तरी कोण ? त्याच्यावर अनन्यसाधारण वात्सल्याचा वर्षाव करणारी त्याची आई ? पराकाष्ठेच्या कोमल अंतःकरणाची स्टेला ? त्याच्यावर निःसीम बंधुप्रेम करणारा त्याचा भाऊ कॉलिन ? भक्तानं

जशी परमेश्वराची सेवा करावी तशी त्याची मनोभावानं सेवा करणारी नर्स वेलंड ? छे छे ! यांपैकीं प्रत्येक व्यक्ति अशी, कीं जी मॉरिसच्या सुखासाठीं आपले पंचप्राण द्यायला आनंदानं तयार झाली असती ! पण मग मॉरिसला कालनिद्रेचं औषध देणारी व्यक्ति तरी कोण ! ”

या गूढ प्रश्नानं सर्वजण स्तिमित झाले असतां नर्स वेलंड एकदम पुढें येऊन म्हणते,

“ मॉरिसला तें घातकी औषध देणारी व्यक्ति कोण तें मला माहीत आहे ! मॉरिसच्या पत्नीनं–या स्टेलानं त्याचा खून केला आहे ! ”

तिचे हे शब्द ऐकतांच सर्वजण स्तिमित होतात ! त्यांना आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसतो ! डॉ. हार्वेस्टर नर्स वेलंडला विचारतात.

“ तुला वेड तर लागलं नाहीं ? स्टेलानं मॉरिसचा खून केला ? वाताच्या लहरींत कांहींतरी बडबडत तर नाहींस ना तूं ? स्टेला कशाला हें अघोर कृत्य करील ? ”

नर्स वेलंड उत्तर देते—

“ कशाला ? तुम्हांला माहीत नाहीं. स्टेला गर्भवती आहे. आपलं पाप झांकण्यासाठीं तिनं नवऱ्याचा खून केला हें अगदीं स्पष्ट आहे. ”

नर्स वेलंडनं केलेल्या या भयंकर आरोपाचे शब्द ऐकायला कितीहि कठोर वाटले, तरी तिच्या आरोपाची सत्यता कोणालाच नाकारतां येत नाहीं. स्टेलालासुद्धां. कारण रात्रीं अखेर मॉरिस झोपीं जाण्यापूर्वी त्याच्या खोलींत स्टेला गेली होती आणि तिच्यानंतर त्या खोलींत दुसरं कुणीहि गेलं नव्हतं इत्यादि अनेक गोष्टी इतक्या स्पष्ट होत्या, कीं स्टेलाला आपल्यावरच्या आरोपाचं निवारण करतां येत नाहीं. ती पुनःपुन्हा सर्वांना एवढेंच सांगते, “ नाहीं, नाहीं ! हें

दुष्कृत्य मीं केलेलं नाहीं. माझं व कॉलिनचं प्रेम होतं, मला दिवस गेले होते हें मी कबूल करतें. हें कबूल करतांना मला विषाद अगर लज्जा मुळींच वाटत नाहीं. कारण जनदृष्टीनं माझं व कॉलिनचं प्रेम कितीहि निंद्य ठरत असलं तरी मी त्याला स्वर्गीय प्रेमच समजतें. पण माझं प्रेम मीं कॉलिनना दिलं असलं, तरी मॉरिसवर माझी भक्ति होती. तो मला अत्यंत प्रिय होता. तो मला टाकून गेला याबद्दलच्या शोकावेगानं माझ्या आंतड्यांना जो पीळ पडतो, तो तुम्हां कुणालाच कधीं समजायचा नाहीं! असं असतांना मॉरिसचा प्राणघात करण्यासाठीं माझा हात धजला असं तुम्हांला वाटतं? वाटत असेल तर वाटो बापडं! मी एवढंच पुनःपुन्हां सांगतें, माझा हात निष्कलंक आहे. मी निरपराधी आहें. मीं मॉरिसला तें घातकी औषध दिलं नाहीं."

पण स्टेलानं जीव तोडून कितीहि सांगितलं, तरी तिच्यावरच्या आरोपाची सकृद्दर्शनीं सत्यता कमी होण्यासारखी नसते. नर्स वेल्स तर या साऱ्या प्रकारावर गुपचूपपणाचं पांघरूण घालून टॅब्रेट कुटुंबाची बेअब्रू आणि न्यायमंदिरांत होणारे स्टेलाचे धिंडवडे वाचविण्यास मुळींच तयार नसते; आणि आतां बिचारी स्टेला फासावर चढणार कीं काय अशा दारुण शंकेनं प्रेक्षक अस्वस्थ झाले असतांनाच दुसरा अंक समाप्त होतो.

नाटककर्त्याच्या नाट्यरचनेचं कौशल्य हें, कीं वास्तविक 'आतां कथानक संपलं, आतां बाकी एवढंच उरलं, कीं स्टेलाची रीतसर चौकशी होऊन तिला देहान्त शासन मिळायचं. पण हा प्रकार आतां रंगभूमीवर दाखविलाच का पाहिजे? तो आम्ही मनांतल्या मनांत समजलों आहोंत, तेव्हां आतां तिसऱ्या अंकाला विषयच कुठं उरला! नाटक संपलंच कीं." असं प्रेक्षकांना वाटत असतांनाच तिसऱ्या अंकाचा पडदा वर जातो. "आतां या अंकात मॉम् सांगणार तरी काय? त्याच्यासारखा कसलेला नाटककार प्रेक्षक जें मनांतल्या

मनांत समजले तें उघड करून रंगभूमीवर दाखविण्याचा वेडेपणा तर खचित करणार नाहीं. पण मग आम्हांला आतां नाटककार सांगणार तरी काय ? या अंकांत नवीन असं विशेष घडणार तरी काय ?" इत्यादि प्रश्नांनीं जिज्ञासा कमालीची ताणली जाऊन प्रेक्षक तिसऱ्या अंकांतले संवाद ऐकूं लागतात, तों त्यांना अखेरचा कमालीच्या विस्मयाचा धक्का बसतो !

तुम्हीं आपली कल्पनाशक्ति कितीहि ताणली, तरी या धक्क्याचा अदमास तुम्हांला करतां येणार नाहीं ! कारण अचानक मॉरिसची आई सर्वांना सांगते, "स्टेलानं मॉरिसला तें औषध दिलं नाहीं. ती पूर्णपणें निर्दोषी आहे. स्टेलानं हें कृत्य केलं नाहीं, तर मग कुणीं केलं अशी तुम्हां सर्वांना शंका येणं अगदीं साहजिकच आहे. पण मी काय सांगतें तें नीट लक्ष देऊन ऐका, म्हणजे तुमची शंका निवारण होईल ! मी मॉरिसला ते औषध दिलं ! मीं त्याचा खून केला !"

त्या वृद्ध स्त्रीचे हे शब्द ऐकतांच साऱ्या प्रेक्षकांच्या अंगांवर एकदम कसे शहारे येत असतील याची कल्पना करा. आतां माझ्या तोंडून मिसेस टॅब्रेटचं भाषण ऐकतांना तुमच्या अंगांतून तीव्र असह्य विस्मयाच्या लहरी खचित गेल्या असतील आणि तुम्ही आप-आपल्या मनाशीं खचित असं म्हणत असाल, "छे छे ! मिसेस टॅब्रेट खोटं बोलत असली पाहिजे. आपल्या सुनेला वाचविण्यासाठीं ही प्रेमळ आई खुनाचा आरोप खुशाल आपल्यावर ओढून घेत असली पाहिजे. तिच्या असामान्य धीरापुढें आणि अलौकिक त्यागापुढें आम्ही मस्तक वाकवूं; पण तिचं म्हणणं खरं मानायला आम्ही तयार नाहीं."

प्रेक्षकांच्या या शंकेला उत्तर म्हणून मिसेस टॅब्रेट सांगते. "स्टेला मॉरिसचा निरोप घेऊन गेल्यानंतर त्याच्या खोलींत कुणी

गेलं नाहीं ही तुमची कल्पना चुकीची आहे. त्यानंतर मीं त्याच्या खोलींत गेलें होतें. तो अस्वस्थपणें बिछान्यावर पडला होता. त्याला कांहीं केल्या झोंप येत नव्हती. तो मला म्हणाला, ‘ आई, मला झोप येत नाहीं ग. डॉक्टरनीं झोपेच्या औषधाची एक वडी घेण्याची परवानगी मला दिलेली आहे. देतेस का मला औषध ? ’ मी ‘ हो ’ म्हटलं अन् एका वडीऐवजीं सहा वड्या पाण्यांत घालून त्याला तें औषध प्यायला दिलं. मी माझ्या मुलाला मारलं ! मी त्याला जन्म दिला होता, मींच त्याचे प्राण घेतले ! ”

मिसेस टॅब्रेटचं हें भाषण ऐकतांच प्रेक्षकांच्या मनोवृत्तींना निराळीच कलाटणी मिळाल्यावांचून राहात नाहीं. आतां त्यांना तिचं म्हणणं खरं वाटतं; परंतु तिच्या हातून घडलेल्या कृत्याची संगति त्यांना लावतां येत नाहीं. त्यांच्या अगदीं ओठाशीं प्रश्न येतो, “ बाई तूं आज कित्येक वर्षं मॉरिसवर अपरंपार प्रेम केलंस, त्याच्या दुखण्यांत त्याची परोपरीनं सेवा केलीस, आणि आतां स्वतःच्या हातानं त्या आपल्या पोटच्या प्रिय पुत्राला तूं विषाचा प्याला दिलास ! तो देतांना तुझा हात क्षणमात्रदेखील कंपित झाला नाहीं ? आपल्या लाडक्या मॉरिसच्या जीवाचा तूं अंत केलास याला काय तुझं वात्सल्य म्हणायचं, का शहाणपणा म्हणायचा कीं म्हणायचं तरी काय ? ”

तुम्हीसुद्धां खचित हेच उद्गार या क्षणीं स्वतःशीं काढीत असाल. पण क्षणभर थांबा आणि मिसेस टॅब्रेट आपल्या कृत्याचं समर्थन करतें तें ऐका. आपण मॉरिसला विष कां दिलं त्याचीं कारणं सांगतांना मिसेस टॅब्रेट जी विचारसरणी बोलून दाखवते व आपल्या कृत्याच्या समर्थनार्थ ज्या गोष्टी स्पष्टपणें सांगते, त्या ऐकतांच तुम्ही देखील घटकाभर स्तिमित होऊन बसाल ! नाटककर्त्यानं या प्रसंगीं मिसेस टॅब्रेटच्या तोंडीं जीं भाषणं घातलीं आहेत, तीं कमालीचीं विचारप्रवर्तक, सनातनी विचारपरंपरेला निर्घृण धक्के देणारीं

आणि बिनतोड अशीं वठलेलीं आहेत. या भाषणांतील सौंदर्य आणि त्यांत स्फुरणारी एक विलक्षण विचारशक्ति तुमच्या ध्यानांत पूर्णपणें यावींत अशी तुमची इच्छा असेल, तर रंगभूमीवरचा त्या वेळचा देखावा स्वतःच्या कल्पनाचक्षूंपुढें आणण्याचा थोडा प्रयत्न करा.

मॉरिसच्या अकल्पित मृत्यूमुळें टॅब्रेट कुटुंबाच्या घरांत सुतकी कृष्णछाया पसरलेली आहे, आणि आतां मॉरिसची आई फाशीं जाणार कीं काय या भयाची त्या अमंगल दुःखांत एक भर पडलेली आहे. मॉरिसच्या मृत्यूचा जसजसा उलगडा झाला तसतशीं अधिकाधिक स्तिमित झालेलीं कुटुंबांतील सारीं माणसं आणि डॉ. हार्वेस्टर व नर्स वेलंड रंगभूमीवर निश्चल पुतळ्याप्रमाणें जागच्या-जागीं खिळून राहिलीं आहेत. मॉरिसच्या प्रत्यक्ष आईनं त्याला विषाचा पेला दिला हें समजतांच आपण सारा स्वप्नांत तर नाहीं अशा बुद्धीनं त्या सर्वांचे श्वास निरोधित झालेले आहेत. त्यांना आवंढासुद्धां नीट गिळतां येत नाहीं! अशा त्या सर्वांना उद्देशून मिसेस टॅब्रेट म्हणते, "अपघातानंतर अंथरुणाला खिळलेला माझा प्रिय पुत्र मॉरिस केवळ एकाच कल्पनेवर जगला होता. ती कल्पना म्हणजे स्टेलाचं आपल्यावर निस्सीम प्रेम आहे ही. या जाणिवेची एकच संजीवनी त्याचा प्राण आणि त्याचा आनंद कायम ठेवूं शकत होती. काल रात्रीं ज्या क्षणीं स्टेलाला दिवस गेले आहेत अशी मला पक्की शंका आली, त्याच वेळीं मी माझ्या मनांत समजलें, कीं आतां मॉरिसचं जीवितच संपलं! कॉलिन घरीं आल्यापासून तो व स्टेला एकमेकांकडे आकर्षित होत चाललीं होतीं हें मला समजत होतं. त्यांचं दिवसेंदिवस वाढत जाणारं परस्परांवरचं प्रेम माझ्या डोळ्यांना स्पष्ट दिसत होतं. पण स्टेलाच्या हातून दुराचार होत आहे असं मला कधींच वाटलं नाहीं. कारण मला माहीत आहे, कीं मानवी स्वभावांतील सद्वृत्तींना आणि सहनशीलतेला मर्यादा ही असतेच. बिचाऱ्या स्टेलानं आज थोडीथोडकीं नव्हे तर सहा वर्षं पातिव्रत्याचा परिपाळ केला. ज्या वयांत साहजिकपणें कोणतीहि

तरुण स्त्री पुरुषाच्या प्रेमासाठीं भुकेलेली असते, त्या वयांत तिनं आपलं शील निष्कलंक राखलं आणि पतीशीं इमान ठेवलं. पण तिची ही सहनशीलता आणखी किती काळ कायम टिकेल अशी शंका मला पुन:पुन्हा येत असे. ती कोणाच्या तरी प्रेमपाशांत सापडली आणि मॉरिसचा त्याग करून आमच्या घरांतून निघून गेली तर मॉरिस कसा जगणार, असं मला नेहमी वाटे. त्यामुळें माझ्याच धाकट्या मुलावर स्टेलाचं प्रेम जडलेलं पाहून त्यांत कांहीं वावगं आहे असं वाटण्याऐवजीं, उलट मी एक सुटकेचा नि:श्वास टाकला. मी मनाशीं विचार केला, कीं आतां निदान स्टेला घर सोडून जाणार नाहीं. मॉरिसवरचं तिचं प्रेम उडालं असलं तरी ती निदान इथंच राहील, घरांतच इकडेतिकडे वावरेल, मॉरिसजवळ रोज घटकाभर तरी बसेल, तिच्या सहवासाच्या सौख्याला मॉरिस मुकणार नाहीं. असं मला वाटलं, म्हणून मीं त्या दोन तरुण जीवांच्या प्रीतीला विरोध केला नाहीं !

" पण स्टेला गर्भवती आहे हें ज्या क्षणीं माझ्या ध्यानांत आलं, त्या क्षणीं मात्र माझा सारा धीर खचला. ही गोष्ट मॉरिसच्या लक्षांत आली तर मृत्यूच्या वेदनेपेक्षांहि अधिक दारुण आणि असह्य यातना त्याच्या अंत:करणाला होतील हें कांहीं मला कुणीं शिकवायला नको होतं. आतां मॉरिस अधिक जगतां कामा नये असं मला वाटलं. अपघातांत कायमचा दुबळा होऊन मॉरिस जेव्हां प्रथम घरीं आला, तेव्हां एकान्तांतल्या पहिल्या संभाषणांत त्याचं मस्तक हृदयाशीं धरून मीं त्याला वचन दिलं होतं, कीं ज्या क्षणीं हें जीवित तुला असह्य होईल, त्या क्षणीं मी माझ्या हातानं तुझी या इहलोकाच्या पाशांतून सुटका करीन ! त्यानंतर अनेक वेळां मॉरिसनं मला विचारावं, ' आई, तुझं वचन कायम आहे ना ? आणि मीं त्याला म्हणावं, ' होय बाळ, कायम आहे. तूं चिंता करूं नकोस ! "

त्या वृद्ध स्त्रीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच तुम्हांला काय वाटलं ? तिच्या विचारसरणीला कांही उलट उत्तर तुम्हांला सुचतं ? तिला दोष द्यावा असं तुम्हांला वाटतं ? स्टेलाबद्दल दुसऱ्या अंकांत तुमच्या मनांत जी किंचित् तिरस्काराची आणि धिक्काराची अढी उत्पन्न झाली, ती आतां तुमच्या मनांत कायम आहे काय ? मिसेस टॅब्रेटनं रूढ नीतिकल्पनांना जो धक्का दिला ती तुम्हांला पटल्यावांचून राहातो काय ? तिनं मॉरिसला विष दिलं, हें ऐकल्याबरोबर विस्मयाच्या आणि त्या वृद्ध स्त्रीच्या अविचाराबद्दलच्या अनुकंपेच्या ज्या लहरी तुमच्या मनांत उसळल्या, त्या आतां कायम आहेत का ? पाहा, पाहा, आपापलं अंतःकरण नीट तपासून पाहा, म्हणजे तुम्हांला कबुली द्यावी लागेल, कीं मिसेस टॅब्रेटविषयीं धिक्काराचा शब्द तर तुमच्या ओठाबाहेर पडणं शक्य नाहींच; उलट त्या स्त्रीच्या असामान्य तत्त्वज्ञानी वृत्तीबद्दल, औदार्याबद्दल, सहानुभूतीबद्दल आणि कर्तव्यतत्परतेबद्दल आदराच्या भावनांनी तुमचं अंतःकरण उचंबळून आलेलं आहे !

आणि नाटककाराचं कसब हें, कीं तुमच्या अंतःकरणांत जें हें विलक्षण परिवर्तन झालं, तेंच नर्स वेलंड हिच्या मनोवृत्तींत घडून आलेलं नाटककर्त्याला दाखवायचं होतं ! मॉरिसच्या मृत्यूची शोककारक घटना सहस्रपट अधिक शोककारक करणारी व्यक्ति म्हणजे ही नर्स वेलंड. कारण, तीच हट्ट धरते, कीं मॉरिस सहजगत्या मेला असं सर्टिफिकेट डॉ. हार्वेस्टरनं लिहून देतां कामा नये. त्याचा खून झालेला आहे आणि ज्या व्यक्तीनं तो केला, तिला कायद्याचं पूर्ण शासन मिळालंच पाहिजे. म्हणजे नाटकाची अगदीं निर्भेळ ट्रॅजेडी करणारं पात्र म्हणजे नर्स वेलंड ! ही ट्रॅजेडी टाळायची असेल व नाटकाचं पर्यवसान थोडं तरी आनंददायक करायचं असेल, तर नर्स वेलंडची मनोवृत्ति बदलली पाहिजे हें नाटककर्ता पूर्ण ओळखून होता, आणि हें अवघड कार्य त्यानं मिसेस टॅब्रेटच्या अखेरच्या हृदयस्पर्शी भाषणानं फारच कौशल्यानं साधलं आहे.

मिसेस टॅब्रेटचं बोलणं ऐकतांच नर्स वेलंड एकदम तिच्या पाया-जवळ खाली वाकून आपले दोन्ही हात तिच्या भोंवती टाकून म्हणते, " मी केवढा भयंकर हट्टीपणा करीत होतें ! मला आतां त्याची शरम वाटते. मॉरिसचा खून झाला हें मी आता कुठेहि बोलणार नाहीं. तो सहजगत्या मरण पावला असाच जगाचा अन् आपणां सर्वांचा समज असावा, यांतच सगळ्यांचं हित आहे ! मिसेस टॅब्रेट, मला क्षमा कराल का ? "

यावर ती वृद्ध स्त्री तिला उचलून हृदयाशीं धरून म्हणते, " वेडे, उगाच अशी भावनावश होऊं नको. डोळे पूस. बघ, तूं आणि मी दोघीहि आतां या जगांत एकट्या आहोंत. आता आप-ल्याला एकमेकींचाच काय तो आधार ! जोंपर्यंत मॉरिसबद्दलची प्रीति आपण आपल्या हृदयांत सदा कायम ठेवूं, तोंपर्यंत मॉरिस एका दृष्टीनं अमरच राहील ! "

# भाषण पांचवें

कादंबऱ्यांचं सामाजिक आणि ऐतिहासिक असं वर्गीकरण आपण नेहमी करतों. हें वर्गीकरण मान्य करूनच आपण असं म्हणतों, कीं मराठी वाङ्मयांत एके काळीं ऐतिहासिक कादंबऱ्यांची प्रथा जोरांत होती आणि अलीकडे सामाजिक कादंबऱ्याच मुख्यत्वेंकरून लिहिल्या जातात. किंवा या वर्गीकरणाच्या कल्पनेनंच आपण असंहि म्हणतों, कीं हरिभाऊ आपट्यांच्या अमुक कादंबऱ्या ऐतिहासिक असून अमुक सामाजिक आहेत. परंतु माझ्या मनांत पुष्कळदा शंका येते, कीं हें वर्गीकरण वाटतं तितकं तर्कशुद्ध नाहीं. निदान कादंबऱ्यांचे हे दोन वर्ग वाटतात तितके परस्परांहून भिन्न नाहींत. 'उषःकाल' ही ऐतिहासिक कादंबरी मानली जाते; पण त्या कादंबरींत सतराव्या शतकांतील हिंदु व मुसलमान समाजांच्या आकांक्षा व भावना चित्रित केलेल्या आहेत हें लक्षांत घेतां तिला

सामाजिक कादंबरी म्हणतां येणार नाहीं काय ? किंवा 'पण लक्षांत कोण घेतो ?' या कादंबरींत विसाव्या शतकांतील महाराष्ट्रीय समाजाच्या आचारविचारांचा इतिहास ग्रंथित झालेला आहे या कारणासाठीं तिला ऐतिहासिक समजायला काय हरकत आहे ? कोणतीहि ऐतिहासिक कादंबरी घेतली तरी तिच्यांत विवक्षित काळांतल्या समाजस्थितीचं थोडंफार चित्र असतंच व त्या दृष्टीनं ती सामाजिक कादंबरी असते. आणि त्याचप्रमाणें कोणत्याहि सामाजिक कादंबरींत त्या त्या काळांतला इतिहास कमीअधिक प्रतिबिंबित होणं अपरिहार्य असल्यामुळं तिला ऐतिहासिक समजायला हरकत नसावी. किंबहुना या प्रश्नाचा अधिक विचार करतां असं वाटूं लागतं, कीं जुन्या काळांत घडलेल्या गोष्टी जिच्यांत सांगितल्या जातात ती ऐतिहासिक कादंबरी व चालू काळांतील ताज्या घडामोडींचं चित्र जिच्यांत असतं ती सामाजिक कादंबरी यापलीकडे ऐतिहासिक व सामाजिक या वर्गीकरणांत फारसा अर्थ नाहीं. साऱ्याच कादंबऱ्या एका दृष्टीनं सामाजिक असतात. सगळ्याच दुसऱ्या एका दृष्टीनं ऐतिहासिक असतात—जुना इतिहास की नवा चालू इतिहास कथानकासाठीं घेतला आहे येवढाच काय तो भिन्नत्व दर्शविणारा मुद्दा !

गेल्या महायुद्धाच्या वेळीं व त्यानंतर इंग्रजी वाङ्मयांत युद्धविषयक कादंबऱ्यांचं भरगच्च पीक आलं. या कादंबऱ्यांत प्रणयादि ठराविक भावनांचा विषय तर होताच आणि इंग्रजांच्या सामाजिक आचारविचारांचीं वर्णनं तर होतींच; पण महायुद्धांतल्या प्रत्यक्ष घटनांची, रणक्षेत्रावरच्या हकीकतींची, सैन्याच्या हालचालींची, मुत्सद्द्यांच्या मसलतींची आणि गुप्त हेरांच्या कारवायांची तारीखवार सुसंगत हकीकतहि दिलेली असे. असल्या कादंबऱ्यांना तुम्ही कोणत्या वर्गांत घालाल ? त्यांना सामाजिक कादंबऱ्या न म्हणावं तर त्यांत समाजस्थितीचीं कितीतरी महत्त्वाचीं व उद्बोधक चित्रं असत. उलट, त्यांना ऐतिहासिक न म्हणावं तर त्यांत चालू, ताज्या, वर्तमानकालीन

इतिहासाचा केवढा तरी भाग असे ! या कादंबऱ्यांना सामाजिक व ऐतिहासिक हीं दोन्ही वर्णनं सारखींच शोभण्यासारखीं होतीं.

आणि मला असं वाटतं, की चालू राजकारणाशीं आपल्या कथानकाचे धागे थोडेफार गुंतवून कादंबरी लिहिण्याकडे ललित-लेखकांचा कल जसजसा अधिक होईल, तसतसा ऐतिहासिक व सामाजिक अशा कादंबऱ्यांच्या दोन भिन्न जाति मानतांना अधिकाधिक अडचण भासूं लागेल आणि दोन्ही जातींचा मिलाफ करणारी संमिश्र स्वरूपाची कादंबरी अधिकाधिक प्रचारांत येईल. महायुद्ध-विषयक कादंबऱ्या अशा संमिश्र स्वरूपाच्या होत्या. त्या कादंबऱ्यांचा मोसम दहापंधरा वर्षं टिकला. पण लोकांच्या मनांतली त्याबद्दलची गोडी ओसरते न ओसरते तोंच रशियांत सोव्हिएट राज्य सुरू झालं, जर्मनी व इटली या देशांत फासिस्ट अंमल सुरू झाला, आणि चालू राजकारणावर कादंबऱ्या लिहिण्याची ज्या ललितलेखकांना हौस होती त्यांना आपल्या लेखणीच्या तोलाचे व वाचकांचं लक्ष खेचतील असे नवे विषय मिळून तीसपस्तीस वर्षांपूर्वी कादंबरीची जी एक संमिश्र जाति इंग्रजींत विशेष उदयास आली तिचा प्रचार अव्याहत चालू राहिला.

मनोहरच्या आकावाणींतल्या माझ्या पहिल्या भाषणांत ज्या कादंबरीवर मी बोललों ती 'नाकेबंदी' कादंबरी या संमिश्र जातींतलीच आहे. फासिस्ट सत्तेनं चालविलेल्या ज्यू लोकांच्या छळाचं वर्णन करणाऱ्या इतर कांहीं कादंबऱ्यांचा नामनिर्देश मी त्या भाषणांत केला तो तुम्हांला आठवत असेलच. चीन देशांत जपाननं जो निर्दय संहार चालविला आहे त्याचं चित्र काढणाऱ्या कादंबऱ्याहि प्रसिद्ध झाल्या आहेत. Carl Crow यांची 'I Speak for the Chinese' ही कादंबरी तुम्हाला मिळाली तर वाचून पाहा. जर्मनीनं ऑस्ट्रिया घशांत टाकला त्या वेळच्या घटनांचं वर्णन करणाऱ्या कादंबऱ्याहि ताबडतोब प्रसिद्ध झाल्या. Eugene Lennhoff यांची 'The

Last Five Hours in Austria' ही कादंबरी त्यांपैकीच होय. स्पेन देशांतील लोकसत्ताक राज्यपद्धति उलथून पाडण्यासाठीं फासिस्टांच्या चिथावणीनं ज्या बंडाची उचल झाली आणि ज्याला थोड्याच अवधींत युद्धाचं उग्र स्वरूप प्राप्त झालं त्या बंडाचा विषयहि कादंबरीकारांनीं सोडला नाहीं. Ronold Fraser यांच्या 'Bird Under Glass' या कादंबरींत या युद्धाची बरीचशी हकीकत आलेली आहे. मात्र स्पेन देशांतील युद्धाच्या विषयावर लिहिलेली एक कादंबरी अशी आहे, की तिच्यांतील कलात्मकता व इतिहासदिग्दर्शन यांच्या सुंदर मिलाफाची सर दुसऱ्या कुठल्याहि कादंबरींत तुम्हांला क्वचितच आढळेल. त्या कादंबरीचाच या भाषणांत मी तुम्हांला परिचय करून देणार आहे. ही कादंबरी प्रसिद्ध झाल्याबरोबर लोकांवर तिची एवढी जबरदस्त छाप पडली, की जर्मन फ्रेंच, इटालियन, हंगेरिअन इत्यादि दहा भाषांत तिच्या आवृत्त्या भराभर निघाल्या आणि बार्सिलोना येथील सरकारनं तर स्वतःच्या खर्चानं तिचं पुरस्कृत भाषांतर प्रसिद्ध केलं !

या कादंबरीचं नांव 'No Pasaran' असं आहे. स्पेन देशांतील लोकसत्ताक सैन्याची 'No Pasaran' ही एक स्पॅनिश भाषेंतील रणगर्जना आहे. तिचं मराठींत शब्दशः भाषांतर केलं तर त्यांत मूळचा जोर आणि वीररस व्यक्त होणार नाहीं. कादंबरीच्या मलपृष्ठावर 'They shall not pass' असं इंग्रजी भाषांतर कंसांत दिलं आहे. पण हें भाषांतरदेखील वीरगर्जनेसारखं वाटत नाहीं. तेव्हां 'मराठी भाषांतराची खटपट आपण सोडून देऊं. 'शत्रु आमच्या हद्दीवर येऊन उभा राहिला आहे खरा; पण आम्ही त्याला धूळ चारून परतविल्याखेरीज राहणार नाहीं !' अशी प्रतिज्ञा मूळ स्पॅनिश नांवांत आभिप्रेत आहे, येवढा खुलासा इंग्रजी न समजणाऱ्या श्रोत्यांसाठीं केला म्हणजे पुरे असं मला वाटतं.

अप्टन सिंक्लेर यांनीं ही कादंबरी लिहिली आहे. कामकरी वर्गाची सद्यःस्थिति, त्यांच्या आकांक्षा व त्यांच्या चळवळी यांबद्दल

कैवारानं व कळवळ्यानं लिहिणारे अग्रेसर अमेरिकन लेखक म्हणून अप्टन सिंक्लेर याचं नांव जगभर प्रसिद्ध आहे. त्यांचे दहापंधरा प्रबंधात्मक ग्रंथ व सुमारे वीस कादंबऱ्या जिथें जिथें इंग्रजी भाषा समजते तिथल्या तिथल्या ग्रंथालयांत सापडतील. त्यांची साहित्य-विषयक व लोकजागृतिकारक कामगिरी इतकी महत्त्वाची मानली जाते, कीं Floyd Dell यांनीं ' Upton Sinclair ' या नांवाचं पुस्तकच प्रसिद्ध केलं आहे.

अप्टन सिंक्लेर यांच्या कादंबऱ्या प्रचारात्मक असल्यामुळं त्या जातीच्या कादंबऱ्यांची आवड बाळगणाऱ्या वाचकांस त्या सर्वच प्रिय आहेत. ' जंगल ' व ' ऑईल ' या त्यांच्या कादंबऱ्यांकडे नमुनेदार म्हणून ते बोट दाखवितात. मला मात्र ' No Pasaran ' ही त्यांची सर्वोत्कृष्ट कादंबरी वाटते. इतकंच नव्हे, तर ललितलेखनाच्या कसोटीनं पाहिलं तर हीच त्यांच्या हातची खरीखुरी सुंदर कादंबरी होय असंहि मी म्हणेन. तसं पहिलं तर त्यांच्या पूर्वीच्या कादंबऱ्यांच्या मानानं ' No Pasaran ' ( प्रकाशक– Werner Laurie Ltd., किंमत – सात शिलिंग सहा पेन्स ) कितीतरी छोटी—जाड टाइपाच्या अवघ्या २३९ पानांची आहे. परंतु तिचा हा छोटेपणाच कदाचित् तिचा एक प्रमुख गुण म्हणावा लागेल. कारण ' जंगल '-सारख्या त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्यांचा माझ्या दृष्टींत सलणारा मोठा दोष त्यांचा फाजील विस्तार व कलावंताला कधीं न शोभणारा फापटपसारा. ' No Pasaran ' कादंबरींत पसारा यत्किंचितहि नाहीं. मांडणीच्या आटोपशीरपणामुळं तिला गोंडस स्वरूप आलं आहे. कथानकाचा काल अगदी अल्प आहे. एकाच मुख्य पात्राच्या हाल-चालींच्या अनुरोधानं सारं कथानक पुढं मांडलेलं आहे आणि ऐति-हासिक दिग्दर्शनासाठीं भोवतालच्या परिस्थितींची वर्णनं करतांना स्पृहणीय संयम राखलेला आहे. या सर्व कारणांनी कादंबरीची लोक-जागृतिकारक शक्ति कमी न होतां तिला असा आकर्षक घाट आला आहे, कीं ललितलेखनाचा एक नमुना म्हणून तिच्याकडे कोणींहि

अंगुलिनिर्देश करावा आणि तिचा सूक्ष्म अभ्यास कोणालाहि हितकारक व्हावा !

या कादंबरीचा विषय काय असा तुम्हीं प्रश्न केला, तर 'रूडी मेसर' नांवाच्या एका श्रीमंत, ख्यालीखुशींत वाढलेल्या तरुणाच्या मनांत झालेली क्रांति व ती क्रांति झाल्यावर कामगारांच्या कैवारानं त्यानं रणक्षेत्रावर जाऊन गाजविलेला पराक्रम असं उत्तर द्यावं लागेल. म्हणजे एका विशिष्ट व्यक्तीच्या स्वभावांतील घडामोड चित्रित करणारी ही कादंबरी आहे. अर्थात् घटनाप्रधान कादंबरी असं हिचं वर्णन करतां येणार नाहीं. इतकंच नव्हे, तर एकामागोमाग येणारे अधिकाधिक गुंतागुंतीचे प्रसंग, त्यानंतरची निरगाठ व शेवटची कौशल्यपूर्ण उकल इत्यादि युक्त्या वापरण्याची बुद्धि लेखकानं ही कादंबरी लिहितांना फार थोडी ठेवलेली दिसते. पण असं असूनहि कादंबरी वाचायला सुरवात केली कीं संपविल्याशिवाय खालीं ठेववत नाहीं अशी विलक्षण ओढ तिच्यांत निर्माण झाली आहे. या ओढीचं थोडेसं कारण हे असेल, की ज्या स्पॅनिश युद्धाच्या उलटसुलट बातम्या आपण वाचतों त्यांच्या कारणांवर व सत्यस्वरूपावर लेखक प्रकाश पाडीत आहे असं आपल्याला सारखं वाटत राहतं. पण याहूनहि मोठं कारण हेंच, की सबंध कथानक 'रूडी मेसर' या एकाच पात्राभोवती खेळविलेलं आहे अन् तें सुद्धां कसलेहि मोहक विक्षेप न करतां अगदीं साध्या सरळपणानं ! अलंकारिक विक्षेपांच्या अभावामुळंच कधीकधी ललितकथेस अकृत्रिम मुग्धपणाचं सौंदर्य कसं प्राप्त होतं त्याचा 'No Pasaran' ही कादंबरी नमुना समजायला हरकत नाहीं.

रूडी मेसर हा एक पंचविशीच्या आंतला कॉलेजांत अभ्यास करणारा तरुण विद्यार्थी होता. त्याचे आईबाप हयात नव्हते; पण त्याच्या चुलत्याच्या मोठ्या कारखान्यांत त्याच्या बापाचे थोडे शेअर्स होते व कारखान्यासाठीं विक्रेत्याचं काम करून रूडीला आपला अभ्यास व त्याच्या वयांतले तरुण करीत तेवढा चंगीभंगीपणा सहज

करतां येत असे. कॉलेजचा अभ्यासक्रम संपविल्यावर चुलत्याच्या बड्या कारखान्यांत एखादी हुद्याची नोकरी त्याला मिळायची हें जवळजवळ ठरल्यासारखंच होतं. बेताचा अभ्यास करावा, कार-खान्याचा माल खपवून कमिशनचे पैसे मिळवावे, फुटबॉल मनसोक्त खेळावा, खिशांत बरेच पैसे खुळखुळत असले कीं बड्या राजविलासी हॉटेलांत खाना झोडावा अन् एखादी छानछबेलीं गाठून अनंगविला-सांत रात्र काढावी असा त्याचा चरित्रक्रम होता. सारांश, मध्यम श्रीमंत वर्गांतील, चैनबाज अमेरिकन तरुणांचा रूडी हा एक नमुना होता. पैसे मिळवावे, पैशाच्या बळावर मोठं व्हावं आणि उपभोगतां येतील तेवढे विलास उपभोगांत आयुष्य काढावं अशी त्याची वृत्ति होती आणि अशीच त्याची वृत्ति अखेरपर्यंत बहुधा राहिलीहि असती—

पण एकदा काय झालं, एका छोकरीनं त्याला चांगलंच ठक-विलं! तिच्या मोहजालांत तो चांगलाच सांपडला होता. श्रीमंती हॉटेलांत व नृत्यमंदिरांत तिला नेऊन खूष करण्यांत खिसा रिकामा होईतों त्यानं पैसे उधळले होतं. तिच्या सुंदर बाहुपाशांत शय्यासुख घ्यायला मिळेल अशी त्याची खात्री होती; पण आयत्या वेळीं तिनं रूडीला नकार दिला अन् दुसऱ्याच एका प्रियकराचा स्वीकार केला. तिच्या दारांतून परततांना रूडीच्या अंतःकरणाला मोठा धक्का बसला. त्याचं मन त्या मुलीवर बसलं होतं. तिला मागणी घालायचे बेत त्यानं मनाशीं केले होते. तिच्या चुंबनालिंगनांनीं त्याला वाटूं लागलं होतं, कीं तिचंहि आपल्यावर प्रेम जडलेलं आहे. पण तिनं जेव्हां एखाद्या बाजारबसवीसारखं वर्तन केलं, तेव्हां त्याला एकदम चीड अन् शिसारी आली. स्त्रीप्रेमावरचा त्याचा विश्वास एकदम उडाला. पैशाच्या मोलानं विकलं जाणारं स्त्रीसौंदर्य त्याला किळसवाणं वाटायला लागलं. अपमान व निराशा यांच्या योगानं अंतःकरणांत उत्पन्न झालेली असह्य व्यथा विसरण्यासाठीं तो पहाटेच्या त्या शांत प्रहरीं न्यूयॉर्क

शहराच्या कुठल्या भागांतून भटकत फिरला तें त्याचं त्यालाच कळलं नाहीं. आपण फिरत आहोंत तरी कुठं तें पाहावं असं त्याला वाटलं तेव्हां तो नदीकाठच्या एका मोठ्या गोदींच्या आवारांत होता. त्यानं पाहिलं तों धक्क्याला लागून एक मोठी आगबोट उभी होती व तिच्यांत माल भरायचं काम चालू होतं.

आतां पुढें जाण्याऐवजीं उजव्या किंवा डाव्या बाजूच्या रस्त्याकडे वळलं पाहिजे अशा विचारानं रूडी क्षणभर रेंगाळला तोंच मोठमोठ्या आरोळ्या त्याच्या कानीं आल्या. धक्क्याच्या बाजूला कसलीतरी धामधूम उडाली होती. आर्त स्वरांतल्या किंकाळ्याहि त्याला ऐकूं आल्या. त्याच्या मनांत आलं, आग लागली असेल किंवा अपघात झाला असेल. काय आहे तें पाहावं म्हणून तो पुढं गेला आणि पाहतो तों हातांत निशाणं व पताका उंच धरून तोंडानं आरोळ्या ठोकीत जाणाऱ्या लोकांची एक लहानशी मिरवणूक समोरून येत होती. त्या गर्दीच्या जवळ जाण्यासाठीं त्यानं चारपांच पावलं टाकलीं नसतील तोंच त्या लोकांची एकदम पांगापांग झाली. पोलिसांनी त्यांच्यावर हल्ला केला होता व जो सापडेल त्याला ते दंडुक्यांनी बडवीत होते. त्या प्रकाराचा कांहींच उलगडा न झाल्यामुळं रूडी स्तिमित होऊन पाहात होता तोंच एका गलेल्ठ पोलिसानं लगावलेल्या तडाख्यानं कानशील फुटून एक किडकिडीत पोरसवदा तरुण झोकांड्या खात त्याच्या पायाशींच जमिनीवर पडला!

मिरवणूकवाल्यांची व त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या पोलिसांची वावटळ जशी वेगानं आली तशी गेली. ती गेल्याबरोबर रूडीनं त्या मुलाला उठविलं, त्याच्या डोक्याची जखम बांधण्यासाठीं आपला हात रुमाल अपुरा पडतोसा पाहतांच अंगांतला सदरा फाडून त्यानं पट्टी बांधली आणि त्याला अर्धवट उचलून रस्त्यापलीकडे नेऊन एका घराच्या पायरीवर बसवलं. मघाची गडबड कशाबद्दल होती म्हणून रूडीनं त्या मुलाला विचारलं तेव्हां तो म्हणाला,

‘ बोटींवर माल भरला जाऊं नये असा आमचा प्रयत्न होता. ’

रूडीनं विचारलं, ‘ कां ? संप ? ’

“ नाहीं; पण बोटींवरच्या मजुरांना आम्हीं म्हणत होतों, माल चढवूं नका, खाली या ! स्पॅनिश बंडखोरांना दारूगोळा पाठवताहेत या बोटींतनं ! ’

‘ स्पेन कुठं अन् तुम्हीं कुठं ! तुमचा काय रे संबंध त्या बंडखोरांकडे जाणारा दारूगोळा अडविण्याचा ? ’

‘ आम्हांला स्पेनच्या लोकसत्ताक सरकारला मदत करायची आहे ! ’

‘ तूं आपलं डोकं इथं न्यूयॉर्क शहरांत फोडून घेतल्यानं स्पेनमधल्या सरकारला कसं सहाय्य होणार कुणास ठाऊक ! ’

‘ कां नाहीं ? अवश्य होणार. ’

परंतु रूडीच्या डोक्यांत नीट प्रकाश पडला नाहीं. असल्या गोष्टी तो जन्मांत प्रथमच ऐकत होता !

रूडीनं ज्याची जखम बांधली त्या मुलाचं नांव ‘ इझि ’ असं होतं. तो जातीय ज्यू होता. त्याच्या बापानं कामगारांच्या चळवळींत स्वार्थत्यागपूर्वक काम केलेलं होतं. तो आतां म्हातारा झाला होता अन् अंथरुणावरच पडून असे. इझीला कुठं नोकरी नव्हती. एका गलिच्छ चाळींतल्या दोन खोल्यांत बापलेक राहात असत. तें सारं ऐकून रूडीनं इझीला म्हटलं,

‘ तुझी ही अवस्था अन् जगाचा इतिहास बदलणं आपलं कर्तव्य मानण्याची तुझी धाव ! छान ! ’

पण त्यावर इझि चटकन् म्हणाला,

‘ हें पाहा, माणसाला ध्येय म्हणून कांहींतरी पाहिजेच ! ’

इझीचं तें उत्तर ऐकतांच रूडीच्या मनांत आलं, 'माझं ध्येय मला कांही ध्येय आहे का? जगांतल्या सुखदु:खांचा, वैषम्याच न्यायान्यायांचा, घडामोडींचा मीं विचार केला आहे कां?'

आणि त्या क्षणीं रूडीच्या मानसिक क्रांतीला प्रारंभ झाला.

इझीशीं त्याचा जसजसा परिचय वाढत गेला तसतसं कामकऱ्यांच्य चळवळींचं स्थूल स्वरूप रूडीला अधिकाधिक कळूं लागलं आणि समाजसत्तावादाचीं तत्त्वं नीट समजून घेण्याची त्याची उत्सुकता वा लागली. कामकऱ्यांच्या सभांना तो इझीबरोबर हजर राहूं लागला अशा एका सभेंत 'डॅनिएल ज्यूसेप' नांवाच्या एका अराजक तरुणाशं त्याचा परिचय झाला. या तरुणाच्या बौद्धिक तेजस्वितेची त्याच्या वर मोठी छाप पडली. साऱ्या जगभर चाललेला मिरासदार व कामगार यांमधील झटापट स्पेनमधील युद्धाच्या मुळाशीं कशी आ व या युद्धांत जगांतल्या साऱ्याच लहानमोठ्या राष्ट्रांचं भवितव्य कसं गुंतलेलं आहे इत्यादि गोष्टी रूडीला आतां बऱ्याचशा स्पष्टप कळून आल्या व न्यूयॉर्क शहरांतील कामकरी लोकांच्या संघटनेश तो समरस होऊं लागला.

परंतु या मार्गाकडे वळलेले त्याचे पाय मागं ओढणारी ए शक्ति होती. त्याचा चुलता एक बडा कारखानदार होता आणि त्या चुलतभाऊ या कारखान्यांतले बडे हुद्देदार होते. आपल्या कुटुंबांतल रूडी कामकऱ्यांचा कैवारी बनत चालला आहे हें पाहतांच प्रथ गोडीगुलाबीनं अन् तीं चालेना तेव्हां धाकदपटशानं त्याला पराङ्मु केल्यावांचून ही मंडळी राहतील हें शक्यच नव्हतं. हें मेसर घरा रक्तानं जर्मन होतं व ही सारी मंडळी हिटलरच्या नाझी तत्त्वाच मोठी अभिमानी होती. रूडीचा एक चुलतभाऊ 'अर्नी' म्हण नाझी तत्त्वाच्या मस्तीनं झिंगलेला एक नमुनेदार तरुण होता. त्या रूडीचीं आर्जवं केलीं, हुज्जत घातली, अमेरिकेंतल्या जर्मन लोकां भांडवली सत्तेचं संरक्षण करण्यासाठीं केवढी लष्करी तयारी केल

आहे तें रूडीच्या मनावर ठसविण्यासाठी आपल्या सशस्त्र सैनिकांच्या कवायती दाखविल्या, कामकऱ्यांच्या अत्याचारांची भडक वर्णनं केली, ज्यू लोकांना शिव्यांची लाखोली वाहिली—पण सारं व्यर्थ गेलं! त्यामुळे नाझी पक्षाविषयीं रूडीला तिटकारा मात्र वाटूं लागला व उलट, इर्न्नाच्या बरोबर हिंडल्यानं ज्या ज्या कार्यकर्त्यांशीं त्याची ओळख झाली त्यांच्या कळकळीबद्दल आणि चिकाटीबद्दल त्याला अधिकाधिक आदर वाटूं लागला; आणि विशेष म्हणजे त्यांच्या विचार-सरणींत आणि धोरणांत फार मोठा सत्यांश आहे अशी त्याची खात्री होऊं लागली.

ज्यूसेपशीं होणाऱ्या संभाषणावरून रूडीला आंतरराष्ट्रीय घडामोडींचं स्वरूप स्पष्ट समजूं लागलं व मानवी जीवनाचा इतिहास ठरीव क्रमानं कसा बनत चालला आहे, भांडवली समाजपद्धति नष्ट होऊन एकजिनसी कामकरी समाज अस्तित्वांत येणं कसं इष्ट आणि अनिवार्य आहे याचा उमज त्याला पडूं लागला. ज्यूसेपचीं हीं संभाषणं त्याला फार प्रिय वाटत. तो त्याच्या बिऱ्हाडीं वारंवार जाई व तो गेला कीं ज्यूसेप, त्याची बायको 'टेरेसा' व मेव्हणी 'पोर्शा' त्याला अतिशय अगत्यानं वागवीत. एकदा कामकरी-चळवळीच्या मदतीसाठीं नाच होता त्याचीं तिकिटं काढून रूडीनं या मंडळींना नेलं. पण नृत्यमंदिरावर नाझी गुंडांनी हल्ला केला आणि मारपीट करून खुर्च्याटेबलांची नासधूस केली. या झटापटींत ज्यूसेपला जखम झाली व गमतीनं नृत्य करण्यासाठीं हौसेनं गेलेली ही मंडळी तशीच परत आली.

नाझींच्या या बेशरम गुंडगिरीची रूडीला मनस्वी चीड आली. मानवी जीवितांतल्या साऱ्या उदात्त भावनांचा आणि न्यायनीतींचा संहार करायला उद्युक्त झालेल्या फासिस्ट सत्तेला मनुष्यत्वाची चाड बाळगणाऱ्या प्रत्येक माणसानं आपापल्या शक्तीप्रमाणें ठेचलं पाहिजे असं त्याला वाटूं लागलं. कामकऱ्यांच्या चळवळींशीं केवळ बौद्धिक

सहानुभूति दाखवून आपलं कर्तव्य संपत नाहीं. तिच्या रक्षणासाठ
आपण कांहींतरी प्रत्यक्ष कृति केली पाहिजे असं त्याच्या मनां
आलं. स्पेनमधील युद्धांत उडी घ्यायचा त्याचा निश्चय झाला.

या त्याच्या निश्चयापासून त्याला परावृत्त करण्याचा त्याच्य
चुलत्यानं व चुलतभावांनीं आटोकाट प्रयत्न केला. अर्नीनं तर त्याल
धमकी दिली, कीं 'लोकसत्ताक सरकारच्या वतीनं लढण्यासाठीं
निघालास तर फ्रँकोच्या सैन्यांत दाखल होण्यासाठीं मीहि निघेन
पण या बोलण्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. रूडीचा निश्च
पक्का होता. 'ठीक आहे, तुझीमाझी आता स्पेनच्या रणभूमीव
भेट होईल!' असं म्हणून त्यानं अर्नीचा निरोप घेतला! दोघे सख्
चुलतभाऊ, परंतु साऱ्या जगांत ज्या दोन प्रचंड शक्तींची निर्वाणीच
झुंज सुरू आहे, त्यांपैकीं भिन्नभिन्न शक्तींशीं समरस झाल्यामुळं त्यां
रक्तनिष्ठ ऋणानुबंध तुटले आणि समरांगणावर समोरासमोर उ
राहायला ते तयार झाले। अप्टन सिंक्लेर म्हणतात, 'मार्क्सनं आपल्य
ग्रंथांत हें भविष्य केव्हांच वर्तविलेलं होतं!'

रूडी स्पेनकडे जायला निघाला तेव्हा त्याच्याबरोबर इर्मी
निघाला, ज्यूसेपहि निघाला. एकंदर सहा तरुण स्वयंसेवकांची
छोटीशी तुकडी बनली आणि केव्हां जायचं, कसं जायचं, बरोबर का
काय घ्यायचं याबद्दलचे त्यांचे बेत सुरू झाले. तें ऐकून ज्यूसेपच
मेव्हणी पोर्शा एक दिवस रूडीला म्हणाली,

'तूं त्या दिवशीं माझ्याबरोबर नाचणार होतास, पण आप
तशींच परत आलों अन् आतां तर तूं युद्धावर निघालास!'

रूडी म्हणाला, 'नाहीं पोर्शा, आपण दोघं एकदा नृत्याल
जाऊं अन् मगच मी कूच करीन..'

आणि या वचनाप्रमाणं तो खरोखरच तिला घेऊन नृत्या
गेला! तीं दोघं मनःपूत नाचलीं. विद्युत्प्रकाशांत मृदु वाद्यसंगीताच्
तालांत दोघांनीं कांहीं काल सौख्यसृष्टींत विहार केला. नृ

संपल्यावर रूडी पोर्शाला तिच्या बिन्हाडीं पोचविण्यास निघाला, पण वाटेंत मधेच ती म्हणाली,

' रूडी, गाडी थांबव जरा. मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे. '

रूडीनं गाडी बाजूला काढून थांबविली आणि विचारलं, ' काय म्हणतेस पोर्शा ? '

ती थोडीशी अडखळली व उद्‌गारली, ' तूं आतां जाणार ! '

' होय. '

' कदाचित् तुझी–माझी ही अखेरचीच भेट ! '

' बहुतेक. '

' अवकाश असता तर मीं वाट पाहिली असती. मग कदाचित मला जें बोलायचं आहे तें तूंच ओळखलं असतंस; पण आतां—'

' काय सांगायचं आहे तुला पोर्शा ? '

' रूडी, माझं तुझ्यावर प्रेम आहे. '

' खरं म्हणतेस ? ' तिची ती प्रेमाची अकल्पित ग्वाही ऐकून विस्मयचकित झालेल्या रूडीनं विचारलं.

' होय. रूडी, माझं अतोनात प्रेम आहे तुझ्यावर. तूं जाणार या विचारानं माझ्या अंतःकरणाचं पाणीपाणी होतं आहे. हें मी बोलतें म्हणून रागावूं नकोस. '

' तूं सांगितलंस हेंच बरोबर. त्याचा मला राग येईल अशी वेडी शंका कां घेतेस ? '

' रूडी, तुझं माझ्यावर थोडंतरी प्रेम आहे का ? '

' तूं फार सुंदर आहेस असं माझ्या नेहमी मनांत येई. '

'पण माझ्यावर प्रेम करावंसं तुला कधीं वाटलं नाहीं का ?'

'अवश्य वाटलं असतं; पण तसा विचार करायला मला फुरसतच मिळाली नाहीं. तुला माहितच आहे, कीं गेले कित्येक दिवस फासिझम, कम्युनिझम, स्पेन, युद्ध असल्या विषयांनीं माझं डोकं भरून गेलं आहे. मला वेळच नव्हता. प्रेमाचं स्मरणच राहिलं नाहीं मला !'

'पण आतां थोडं स्मरण ठेव–या घटकेपुरतं तरी. रूडी तुझं थोडसं प्रेम मिळालं तरी त्याच्या आठवणीवर मी जन्म काढीन !'

'पाशी, लाडके !' असं म्हणून रूडीनं तिला जवळ घेतलं.

आणि मग दोघांनी स्मरदेवाचं स्मरण केलं.

इतकंच नव्हे, तर लढाईवर निघण्यापूर्वी रूडीनं पोशीशीं विवाह केला !

ठरलेल्या बेताप्रमाणं रूडी, ज्यूसेफ, इझि इत्यादि सहा स्वयंसेवकांची तुकडी स्पेनकडे जाण्यासाठीं निघाली. फ्रँकोच्या नेतृत्वाखालीं चढाई करून येणारं बंडखोराचं सैन्य माद्रिद शहराच्या हद्दीशीं येऊन थडकलं होतं. तें परतविण्यासाठीं लोकसत्ताक सरकारच्या सैन्याला प्रयत्नांची शिकस्त करायची होती. माद्रिद शहराच्या परिसीमेवर होणाऱ्या या निकराच्या रणधुमाळींत भाग घेण्यासाठी हे सहा स्वयंसेवक निघाले. अमेरिकेहून निघालेले हे पहिलेच स्वयंसेवक होते. रूडीचा चुलतभाऊ अर्नी यानं आपली प्रतिज्ञा खरी केली. तोहि सहा स्वयंसेवकांची तुकडी घेऊन फ्रँकोच्या बाजूनं लढण्यासाठीं निघाला.

रूडी व त्याचे दोस्त प्रथम आगबोटीनं फ्रान्सला गेले. पॅरिस शहरापासून त्यांचा प्रवास आगगाडीनं होऊं लागला. दक्षिण दिशेनं खालीं जाऊन त्यांनीं स्पेनची हद्द गाठली व मग बार्शिलोना, व्हॅलेन्शा

असे मुक्काम करीत निरनिराळ्या देशांतून स्पेन सरकारसाठीं लढायला आलेल्या स्वयंसेवकांची प्रचंड छावणी जिथं होती त्या आल्बायेटे नांवाच्या गावीं ते जाऊन पोचले. प्रवासांत त्यांना दिसून आलं, कीं जिथेतिथं कामकरी वर्गांत अपूर्व जागृति झाली आहे. माद्रिद शहरीं फ्रँकोचा पाडाव झाला तरच फासिस्ट सत्तेला खरा तडाखा बसेल हें सर्व कामकरी ओळखून आहेत आणि जगांतले सारे कामगार म्हणजे बंधुबंधु असून जर्मनी, इटली इत्यादि देशांतल्या फासिस्ट सरकारांशीं त्यांनी एकजुटीनं टक्कर दिली पाहिजे ही जाणीव शेतकऱ्यांत व सामान्य मजुरांतसुद्धां पुरी भिनलेली आहे. स्पॅनिश सरकारच्या मदतीसाठी अमेरिकेंतले सहा तरुण स्वयंस्फूर्तीनं धावून आले म्हणून प्रत्येक गांवच्या कामकऱ्यांना व किसानांना केवढा आनंद होई! ते त्यांची मिरवणूक काढीत, आपल्या आरोळ्या ठोकीत, फेर धरून नाचत, ते पुढच्या मुक्कामाकडे निघाले कीं सद्गदित कंठांनीं निरोप देत!

आल्बायेटेच्या छावणींत दाखल झाल्यावर चार दिवसांनीं तिथल्या वीस हजार सैनिकांच्या पलटणीबरोबर रूडी व त्याचे पांच दोस्त माद्रिदकडे रवाना झाले. फ्रँकोचं सैन्य शहराच्या अगदीं नजीक येऊन ठेपलं होतं. त्याला पंधरा दिवस थोपवून धरलं तर तेवढ्यांत स्पॅनिश सरकारला मोठं सैन्य सज्ज करतां येण्यासारखं होतं आणि तें सज्ज झाल्यावर मग माद्रिदवर चढाई करण्याची फ्रँकोची हिम्मत तऱ्हती. परंतु पंधरा दिवस बंडखोर सैन्याची लाट कशी हटवायची? वेळ मोठी बिकट होती! माद्रिदच्या संरक्षणासाठीं लढणाऱ्या सैनिकांनीं शौर्याची परमावधि केली तरच आणीबाणीचा तो प्रसंग टळणार होता;

परंतु त्या सैनिकांनीं अपूर्व शौर्य गाजविलं अन् माद्रिद शहर बचावलं. रूडीला सार्जंटचा हुद्दा मिळाला होता. त्यानं आपल्या हुकुमाखालच्या लोकांनिशीं आपली जागा जिवावर उदार होऊन लढविली अन् अतुल पराक्रम केला. अर्नी फ्रँकोच्या बाजूनं विमान

घेऊन आला व बॉंब टाकूं लागला तेव्हां रूडीनं खालून मोठ्या शिताफीनं गोळ्या झाडल्या. अर्नीचं विमान खाली कोसळलं आणि रूडीच्या एका गोळीला अर्नी बळी पडला. चुलतभावांच्या तत्त्वज्ञानांतली लढाई अखेर माद्रिद शहराच्या वेशीबाहेर अशा प्रकारें संपली!

आणि कादंबरीचं कथानकहि इथेच संपलं!

रूडी नंतर स्पेनच्या बाजूनं लढत राहिला कीं नांहीं, त्यानं पुढे आणखी कोणते पराक्रम केले इत्यादि गोष्टी कादंबरीकारानं सांगितल्या नाहींत. रूडी कधीकाळीं अमेरिकेस सुखरूप आला कीं नाहीं व त्यानं अन् पोर्शानं विवाहसुखाचा मनसोक्त उपभोग सवडीनं घेतला कीं नाहीं याबद्दलसुद्धां वाचकाना निश्चित बातमी लेखक देत नाहीं. वाचकांनीं तर्कानं पाहिजे तें त्याबद्दल ठरवावं असंच जणूं त्याचं म्हणणं आहे.

आणि तसं असावं हेंच बरोबर आहे. मी तर म्हणतों, कीं माद्रिदच्या पहिल्या लढाईच्या अखेर अपटन सिंक्लेर यांनी कथानकावर पडदा टाकला यांतच कलावंताचं कसब आहे. त्यापुढच्या गोष्टी त्यांनीं सांगितल्या असत्या तर त्या मनोवेधक झाल्या नसत्या असं नव्हे; पण त्यामुळं कलेची हानि झाली असती. कलेची हानि असं मी येवढ्याचसाठीं म्हणतों, कीं ज्या हकीकतीसाठीं लेखक कादंबरी लिहावयास बसला नाहीं त्या त्यानं कादंबरींत आणल्या असं झालं असतं. कारण 'या कादंबरींत मला अमुक अमुक सांगायचं आहे' अशी स्पष्ट प्रतिज्ञा तिच्या प्रारंभीं कादंबरीकार क्वचित्च करतों हें जरी खरं, तरी मर्मज्ञ वाचक त्या प्रतिज्ञेच्या उल्लेखावांचूनहि ती ओळखूं शकतो! या न्यायानं 'No Pasaran!' मध्यें अपटन सिंक्लेर यांना मुख्यतः काय सांगायचं आहे या प्रश्नाचं उत्तर कांहीं वेळापूर्वी मी सुचविलं तेच. 'No Pasaran!' म्हणजे रूडीच्या मानसिक क्रांतीची गोष्ट आहे. त्या क्रांतीचा

प्रारंभ, तिची प्रगति अन् तिचा परमोत्कर्ष सांगितल्यानंतर गोष्ट संपलीच पाहिजे.

रूडीच्या मानसिक क्रान्तीच्या या गोष्टीत शक्य तेवढं नाट्य आणण्यासाठीं कथानकाची सुरवात व अखेरी किती भिन्न व विरोधी वातावरणांत लेखकानं केली आहे तें नीट लक्षांत घ्या. तुम्हांला रूडी प्रथम दिसतो तो उत्तररात्रीं एका विलासमंदिरांत उद्दीपक संगीताच्या तालावर एका छानछबेलीला बाहुपाशांत धरून नृत्य करतांना ! आणि तो अखेर दृष्टीस पडतो तो माद्रिदच्या सीमेवरील रणकंदनांत बॉम्ब अन् तोफगोळ्यांच्या वर्षावांत बेभान होऊन लढणाऱ्या हजारों सैनिकांबरोबर 'No Pasaran !' अशी उत्कट आवेशयुक्त गर्जना करतांना ! व या दोन दृश्यांच्या मुळाशीं रूडीच्या मनांतली विचारक्रांति आहे. कथानकाच्या सुरवातीस ज्या रूडीला न्यूयॉर्क शहरांत जवळजवळ पाऊण कोट दरिद्री लोक उपाशी राहतात या गोष्टीची दादहि नाहीं, तोच रूडी अखेर दरिद्री कामकऱ्यांच्या स्वातंत्र्यासाठीं सुरू झालेल्या जागतिक चळवळीशीं समरस होऊन रणांगणावर वीर्य गाजवितो ! पहिल्या प्रकरणांत केवळ एका छचोर छबकडीनं आपला अव्हेर केला म्हणून जो रूडी निराशेनं विव्हल अन् मूढ होतो त्याच्या अंतःकरणांत भांडवली सत्तेविषयींचा उदास द्वेष व अन्याय्य, निर्दय फासिस्ट शक्तीखालीं भरडल्या जाणाऱ्या कामकऱ्यांबद्दलची गाढ सहानुभूति उसळून कादंबरीच्या शेवटीं तो हातावर शीर घेऊन युद्ध करतो.

रूडीच्या अंतःकरणांतील ही क्रांति घडवून आणण्यासाठीं त्याच्याभोवती इतर पात्रं उभीं करतांना कादंबरीकारानं कसं चातुर्य योजलं आहे तें पाहा हं ! या पात्रांचे दोन गट आहेत व त्याच्या आघात-प्रत्याघातांनीच रूडीच्या मनांतल्या पहिल्या कल्पना छिनून पडतात व त्या जागीं समाजसत्तावादाविषयींची नवी श्रद्धा उद्भवून

ती दृढमूल होत जाते. एका बाजूस रूडीचा वृद्ध चुलता, त्याचा चुलत-भाऊ अर्नी इत्यादि पात्रं आहेत आणि दुसऱ्या बाजूस इझि, ज्युसेप, पोर्शा इत्यादि पात्रं आहेत व जसे या पात्रांच्या विचारांचे आघात रूडीच्या वृत्तीवर होतात, तसेच नाझी लोकांच्या कवाइती व भाषणं अन् कामगारांच्या सभा आणि त्यांतलीं भाषणं इत्यादींचेहि आघात हीं सर्व पात्रं अप्टन सिंक्लेरनी मोठ्या कौशल्यानं चित्रित केलेलीं आहेत व त्यांच्या आणि रूडीच्या गाठीभेटींचे प्रसंग मोठ्या सहृदयतेनें रंगविले आहेत.

आणि हे प्रसंग रंगवितांना त्यांनीं चालू आंतरराष्ट्रीय धाम-धुमीच्या बुडाशीं असलेल्या भिन्नभिन्न विचारभूमिका किती सहजा-सहजीं विशद करून सांगितल्या आहेत ! आणि अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, स्पेन इत्यादि देशांतील परिस्थितीचीं धावतीं चित्रं किती सफाईनं वाचकांपुढं उभीं केलीं आहेत ! मार्क्सच्या तत्त्वज्ञानांचीं मूलतत्त्वें, इटली व जर्मनींत फासिस्ट सत्ता प्रस्थापित झाली त्याचीं कारणं, स्पेन देशांतील सत्तेचं सत्य स्वरूप, त्या सत्तेवर इटलीचा हल्ला झाला त्यांतील खरा हेतु, जागतिक युद्धाचीं सूत्रं हालविणाऱ्यांचं धोरण इत्यादि कितीतरी महत्वाच्या प्रश्नांवर सुंदर प्रकाश पडल्यासारखं रूडी मेसरच्या मानसिक क्रांतीची ही गोष्ट वाचणाऱ्या वाचकाला वाटतं. स्पेनमधील युद्धावर जातांना वाटेंत ठिकठिकाणीं आणि अखेर माद्रिद शहरालगतच्या रणक्षेत्रावर रूडीला जीं दृश्यं दिसलीं म्हणून लेखकानं सांगितलं आहे त्यांचीं वर्णनं तर अतिशय बहारीचीं आहेत. अमेरिकेंतले सहा तरुण माद्रिदचं संरक्षण करायला चालले आहेत या कल्पनेनं बार्सिलोना शहरांतले कामगार हर्षानं वेडे झाले. या ‘कामगार स्त्रीपुरुषांनीं साध्या विळ्याकोयत्यांनीं युद्ध केलं होतं व शहर ताब्यांत घेतलं होतं ! आतां शहरांत त्यांची सत्ता होती ! त्यांच्या शृंखला गळून पडल्या होत्या. साऱ्या जगावर कामगारांचं प्रभुत्व लवकरच होणार अशी त्यांना आशा वाटत होती. अमेरिकेहून आलेल्या सहा स्वयंसेवकांचीं त्यांनीं उत्साहानं

मिरवणूक काढली ! जिथेंजिथें ही मिरवणूक जाई तिथेंतिथें हर्ष-भराच्या आरोळ्यांनी सारं वातावरण निनादत राही ! जणुं अमेरिकेची सबंध फौज आली होती व तिचं ते लोक स्वागत करीत होते !' माद्रिदच्या क्षेत्रावर दाखल होण्यापूर्वी आल्बाथेटेच्या छावणींत रूडी व त्याचे दोस्त थांबले तेव्हां त्यांना जें दृश्य दिसलें तें अपूर्व होतं ! 'कोणत्याहि युद्धाच्या इतिहासांत अशी विचित्र फौज एकत्र झाल्याचा दाखला सांपडणार नाहीं. जर्मनी, इटली, फ्रान्स, रशिया, इंग्लंड-जगाच्या चारी कोपऱ्यांतून ज्यांनाज्यांना कामगारांच्या स्वातंत्र्ययुद्धाची हांक नीट ऐकूं आली ते या ठिकाणीं आले होते ! गेल्या महायुद्धांत ज्यांनीं एकमेकांवर गोळया झाडल्या ते आतां फासिस्ट राक्षसाचा नायनाट करण्यासाठीं खांद्याला खांदा लावून लढणार होते. या फौजेंत केवळ आडदांड शिपाई गडीच नव्हते. कवि, शाहीर, लेखक, शिक्षक, तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ अशांचा मोठा भरणा या फौजेंत होता. विमानांतून, बोटीनं, गाडीनं, ज्याला जसं साधलं तसा तो धांवून आला होता. वीस हजार सैनिकांची कवाईत या तळावर चालू होती आणि 'No Pasaran !' ही गर्जना पुन:पुन्हां हवेंत उठत होती !' ही छावणी सोडून माद्रिदकडे कूच करण्याचा हुकूम सुटला आणि रूडी वगैरे मंडळी निघाली तेव्हां 'गांवचे सारे शेतकरी निरोप देण्यासाठीं जमा झाले. गांवकऱ्यांच्या बायकांनीं सैनिकांचे कपडे धुवायचं काम आजवर हौसेनं केलं होतं; त्या जणुं हीं सारी आपलींच मुलं लढाई-वर निघालीं म्हणून त्यांना हृदयाशीं घट्ट धरून निरोप देऊं लागल्या. तरुण पोरींनी शिपायाच्या बंदुकांच्या तोंडांत तांबड्या रानफुलांचे गुच्छ खोवले अन् जयजयकार केला ! लहान पोरं गोळा झालीं होतीं आणि सिगरेटचे तुकडे गोळा करीत होतीं. पुन:पुन्हां स्वत:चा कंठनाळ कापल्याचा अभिनय करून 'फ्रँको ?' अशी त्यांनीं आरोळी ठोकली !'

अशीं कितीतरी उत्कृष्ट वर्णनं या कादंबरींत आहेत. तीं वाचतांना ते ते देखावे आपल्या नजरेसमोर घडत आहेत असं तुम्हांला वाटेल अन् वीररसानं तुमचं अंत:करण उचंबळून आल्यावांचून राहणार नाहीं.

परंतु या कादंबरीची विशेष शिफारस मी तुमच्याजवळ करूं इच्छितों ती अशासाठीं, कीं माद्रिदच्या लढाईच्या इतिहासानं जरी हिची पार्श्वभूमि सजविलेली असली तरी त्या पार्श्वभूमिवर वावरणाऱ्या मुख्य व गौण पात्रांचीं चित्रं लेखकानं अतिशय नाजुक हातानं अन् प्रसादयुक्त शैलीनं काढलीं आहेत. दारिद्र्यांत, कष्टांत दहाबारा फूट लांबीरुंदीच्या खुराडयांत राहून साऱ्या जगाच्या पुनर्घटनेची तळमळ बाळगणारा ज्यू रक्ताचा इझि, अराजक विचारसरणीचा ज्यूसेप, विधिपूर्वक लग्नावांचून त्याची पत्नी म्हणून त्याजवळ राहून संसार करणारी टेरेसा, रूडीवर प्रेम करणारी टेरेसाची सुंदर बहीण पोर्शा, रूडीचा वृद्ध धनाढ्य चुलता, स्वातंत्र्य मिळवूं पाहणाऱ्या कामगारांना व ज्यू लोकांना ' गलिच्छ कीटक ' समजणारा उन्मत्त अर्नी, इत्यादि सर्वच पात्रांचे स्वभाव रेखाटतांना अप्टन सिंक्लेरनी ठिकठिकाणीं मोठी मौज केली आहे. नृत्यगृहांतून परत घरीं जातांना पोर्शा आपलं प्रेम रूडीजवळ व्यक्त करते तेव्हां तो त्या प्रेमाचा स्वीकार करतो. इतकेंच नव्हे, तर तिला विधिपूर्वक पत्नी करून घेतल्यानंतर युद्धावर जाण्यापूर्वी तिच्यासाठीं पैशाची तरतूद कशी कशी करायची त्याचे बेत सांगतो खरा; पण प्रेमिकांना प्रिय अशा प्रणयचेष्टा करायचं भान त्याला राहत नाहीं. तेव्हां बराच वेळ वाट पाहून अखेर पोर्शा त्याच्या कानांशीं तोंड नेऊन हलकेंच म्हणते,

' तें सारं झालं रूढी, पण एक गोष्ट अजून राहिली !

' ती कोणती ? '

' मला पत्नी करून घेण्याइतका माझ्यावर तुझा विश्वास असेल तर माझं चुंबन घ्यायला कांहीं हरकत नाहीं ! '

त्या प्रेमबद्ध गोड मुलीच्या मधुर स्वभावांतली किती मनोहर लकेर आहे ही !

त्याचप्रमाणें माद्रिदच्या रणकंदनांत इझीला मर्मी गोळी लागते तेव्हां प्राण सोडतांसोडतां तो रूडीला विचारतो, ' शत्रू हटला ना ? '

रूडो त्याला सांगतो, ' होय. '

' मग आपण आपलं कर्तव्य केलं तर ! '

' तूं केलंस यांत संशय नाहीं. तुझ्याबद्दल मला केवढा अभिमान वाटतो !'

' खरंच रूडी ? ' जवळजवळ स्वर्गलोकांत पोचलेल्या त्या मुलाच्या डोळ्यांत क्षणमात्र चमक आली. ' रूडी, सगळयांना सांग तर कीं ज्यू मनुष्य वीर्य गाजवूं शकतो ! '

आपल्या जातीवर केला जाणारा वृथा आरोप आपण आपल्या कृतीनं धुऊन टाकला याबद्दलच्या अभिमानानं भरून आलेल्या पोरसवदा इझीच्या अंतःकरणाचं किती मनोज्ञ चित्र हें !

आणि तसंच शत्रूवर गोळया झाडूनझाडून थकलेल्या पण हात दुखूं लागले, भाजूं लागले तरी फैरीवर फेरी झाडणाऱ्या रूडीचं वर्णन ऐका—

' त्या घटकेला रूडीच्या अंतरात्म्यात एक दिव्य चमत्कार घडला. शर्यतींत धावणाऱ्या पटाइताला पहिला दमछास संपला कीं दुसरा येतो म्हणतात ! तद्वत आतां सारीं गात्रं थकल्यामुळं आपण पाय लटपटून कोसळणार असं रूडीला भय वाटलं न वाटलं तोंच कुठून कोण जाणे एकदम नवीनच स्फुरण आणि चैतन्य त्याच्या अंगीं संचारलं. त्याची सारी भीति आणि दहशत अकस्मात् गळून पडली. त्याचं सारं देहभानच मुळीं हरपलं ! ज्यासाठीं आपल्यासारख्या सहस्र जीवांचा बळी दिला तरी तो थोडा, तें सत्य त्याला एकदम दिव्य प्रकाशासारखं दिसलं ! आणि तें दिसतांच त्याला वाटलं, आपण रणांगणावर नसून फूटबॉलच्या मैदानावर चुरशीचा सामना खेळत आहोंत अन् खेळांत आरोळी ठोकावी त्याप्रमाणें त्यानं उन्मत्त आवाजानं गर्जना केली, No Pasaran ! '

*

# भाषण सहावें

माणसाच्या हातून जीं बरींवाईट कृत्यं घडतात तीं त्याच्या अंतःकरणांतील विविध सदसत् प्रेरणांमुळें घडतात असं आपण सामान्यपणें समजतों; अन् आपल्या स्वतःच्या व आपल्य भोंवतालच्या माणसांच्या वर्तनाची समाधानकारक संगती लावायला ही समजूत पुरेशी असते. मानसशास्त्रज्ञ मात्र या साध्या समजुती-वर थांबायला तयार नसतात. मनुष्याच्या ठिकाणीं ज्या अनेक प्रेरणा आहेत त्यांत वरिष्ठ-कनिष्ठ ठरवीत ठरवीत अशी कोणती तरी एकच प्रेरणा सर्वांत बलिष्ठ व मूलभूत म्हणून ठरवितां येईल काय, कीं जिच्या क्रियेनं एकंदर सर्व मानवी आचार घडतात असं मानतां येईल, असा प्रश्न हे शास्त्रज्ञ उपस्थित करतात. आधुनिक मानशास्त्रांत हा प्रश्न फार महत्त्वाचा गणला गेला आहे व या प्रश्नावरील मतभेदामुळेंच मानसशास्त्रज्ञांचे भिन्नभिन्न गट पडले

आहेत. तुम्हीं फ्रॉइड हें नांव पुष्कळदां ऐकलं असेल. मराठी वाङ्मयांतील नवमतवादाबद्दल जेव्हां जेव्हां चर्चा होते. तेव्हां तेव्हां या गृहस्थाच्या नांवाचा उच्चार उभयपक्षांकडून व्हायचा हें आतां ठरून गेलं आहे. या गृहस्थाचं म्हणणं असं आहे, की मनुष्याच्या ठिकाणीं ज्या अनेक प्रेरणा आहेत त्यांत कामप्रेरणा ही मुख्य असून बाकीच्या सर्व तिच्यांतून उद्भवणाऱ्या व म्हणून गौण मानल्या पाहिजेत; आणि एकंदर साऱ्या मानवी आचाराच्या बुडाशीं ही एकमेव कामप्रेरणा असून माणसांचे पराक्रम, त्यांचे रागद्वेष, त्यांचे प्रणयप्रकार, –इतकंच काय, त्यांचं आरोग्य व अनारोग्यसुद्धा या कामप्रेरणेच्या व्यापारांतूनच निर्माण होत असतं !

पण फरॉइडसारखाच ॲडलर नांवाचा एक मानसशास्त्रज्ञ म्हणाला, साऱ्या मानवी आचाराच्या मुळाशीं कोणतीतरी एकच प्रेरणा असली पाहिजे ही फरॉइडची कल्पना बरोबर आहे; पण ही एकमेव प्रेरणा कामप्रेरणा होय हें त्याचं मत चुकलेलं आहे, यावर साहजिकच कोणी ॲडलरला विचारील, कीं ‘ कामप्रेरणा नाहीं तर मग कोणती प्रेरणा तें सांगतां कां ?’ या प्रश्नाला ॲडलरचं उत्तर असं, की प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं वरचढपणा, अधिकार किंवा सत्ता मिळविण्याची व मिरविण्याची एक प्रेरणा असते. राग, द्वेष, लोभ, मद, मत्सर, इतकंच नव्हे, तर ज्याचं फरॉइडनं उगीच स्तोम माजविलं तो कामदेखील या सत्ताप्रवृत्तीचंच एक स्वरूप होय आणि मनुष्याच्या वैय्यक्तिक व सामाजिक जीवनांतील सर्व व्यवहारांची संगति या एका मूलभूत सत्ताप्रवृत्तीच्या सहाय्यानं उत्तम प्रकारें लावतां येते.

तुम्ही मनांतल्या मनांत आश्चर्य करीत असाल फरॉइड अन् ॲडलर कशासाठीं निघाले आहेत ? पण घाबरूं नका. आधुनिक मानसशास्त्रांतलीं दर्शनं तुम्हांला समजावून सांगण्याचा माझा विचार नाहीं. फरॉइडचं मत कितपत ग्राह्य किंवा ॲडलरच्या मतांत कितपत तथ्य आहे या वादांत मी तुम्हाला घेऊन शिरणार नाहीं. एका

कादंबरीचंच विवेचन आजच्याहि भाषणांत मी करणार आहे. पण ती कादंबरी ज्या वेळीं मी प्रथम याचली त्या वेळीं ती वाचीत असतां माझ्या मनांत सारखे अॅडलरच्या मानसशास्त्रविषयक सिद्धान्ताचे विचार येत होते व त्यामुळें आज त्या कादंबरीबद्दल बोलायचं म्हटलं तेव्हांहि मनांत त्याच विचारांची पुनरावृत्ति होऊन भाषणाला प्रारंभ करतांना ते प्रगट झाले.

साऱ्या मानवी आचाराच्या मुळाशीं माणसाची सत्ताप्रवृत्ति आहे हा अॅडलरचा सिद्धान्त सर्वथा सत्य व अबाधित नसेल; पण त्यांत सत्यांश पुष्कळच आहे हें कोणालाहि मान्य करावं लागेल. राष्ट्रा-राष्ट्रांतल्या राजकीय घडामोडी या सत्ताप्रवृत्तीमुळें घडत असतात हें तर अगदी उघड आहे. धार्मिक क्षेत्रांतले जुलूम व त्या जुलुमाविरुद्ध होणाऱ्या सुधारक चळवळीहि या प्रवृत्तींचेच परिणाम होत. आणि कौटुंबिक जीवनांतलीं देखील कितीतरी सुखदु:खं या प्रवृत्तीं-तूनच निर्माण होत नाहींत काय? सासूकडून होणारा सुनेचा छळ, सावत्र आईकडून होणारा सावत्र मुलांचा छळ इत्यादि प्रकारांचा उगम अधिकार गाजविण्याच्या इच्छेंतूनच होतो ना? तुमच्यापैकीं प्रत्येकाच्या पाहण्यांत असं एकतरी कुटुंब आलं असेल, की ज्यांतला कर्ता पुरुष बायकापोरांना कर्दनकाळासारखा वाटतो. असल्या पुरुषांना बाहेर सत्ता गाजवितां येत नसली म्हणजे तर ती गाज-विण्याची आसुरी लालसा ते आपल्या घरांत भरपूर भागवून घेतात. त्यांच्यापुढें ब्र काढण्याची कुटुंबांत कोणाची छाती नसते. ते बाहेरून घरांत आले की पोराबाळांनीं आपले श्वास आवरून धरले पाहिजेत. त्यांच्या सुखसोयीसाठीं साऱ्यांनीं दक्ष असलं पाहिजे, इतरांच्या भावना ते जाणत नाहींत. त्यांच्या मुलांनी अभ्यास उत्तम केला पाहिजे, शाळेंत पहिला नंबर ठेवला पाहिजे, शिस्तींत राहिलं पाहिजे, मस्ती करतां कामा नये, मित्र जोडतां कामा नये, वडिलांची आज्ञा वेदतुल्य मानली पाहिजे. बायकांपोरांनी आपल्या इच्छेपुढे करकरा वाकलंच पाहिजे, त्यांतच त्यांचं कल्याण आहे असं या पुरुषांना वाटत

असतं. सत्ता गाजविण्याची अमर्याद राक्षसी हौस यांच्या ठिकाणीं असते व आपल्या आज्ञेंत वागण्यानेंच त्यांना अंतीं सुख मिळणार आहे अशी ते स्वतःची आंधळी समजूत करून घेत असतात. त्यांच्या या जुलुमी वर्तनाचा प्रत्यक्ष परिणाम मात्र असा होतो, कीं त्यांचीं मुलं सदाचारी व कर्तृत्वान् निघण्याऐवजीं वाईट निघतात. कुटुंबांत सुख व समाधान नांदण्याऐवजीं दुःख व असंतोषच सदा धुमसत राहातो अन् त्याचा कोणत्यातरी स्वरूपांत भडका उडतो अन् अखेर त्यांना स्वतःला तरी शांति मिळते काय ? तीहि नाहीं ! वैतागांत अन् पश्चात्तापांतच त्यांच्या जीविताचा अंत होतो.

ज्या कादंबरीचा मी आजच्या भाषणांत तुम्हांला परिचय करून देणार आहे, तिच्यांत असल्यास एका कठोर, हट्टी गृहस्थाच्या संसाराचं चित्र रंगविलें आहे. या कादंबरीचं नांव 'Hatter's Castle' ( टोपीवाल्यांचा किल्ला )! आणि हिच्या लेखकाचं नांव 'A. J. Cronin'. डॉक्टरचा धंदा करणाऱ्या या लेखकाची ही कादंबरी इतकी लोकप्रिय ठरली, कीं एक इंग्रजी वाक्प्रचार वापरायचा म्हटलं तर तो एका रात्रींत एकदम मोठा कादंबरीकार गणला गेला. यानंतरच्या त्याच्या कादंबऱ्यांचंहि चांगलं स्वागत झालं व 'Citadel' या नांवाच्या त्याच्या कादंबरीचा तर आतां चित्रपट तयार झाला आहे. तो कदाचित् या सुमारास मुंबईच्या चित्रपटगृहांत पाहायलाहि मिळेल.

'Hatter's Castle ( प्रकाशक–Gollancz ) या कादंबरीच्या विशेष गुणांची चर्चा करायच्या आधीं एक गोष्ट सांगून टाकली पाहिजे ती ही, कीं आकारानं ही कादंबरी फार मोठी, साडेसहाशें पृष्ठांची आहे. अलीकडे इंग्रजी कादंबऱ्यांच्या अंगांत जरा वात शिरल्यासारखा दिसतो. तीनसाडेतीनशें पृष्ठांची मर्यादा मागं पडून बऱ्याचशा कादंबऱ्या त्याच्या दुप्पट पृष्ठांच्या होऊं लागल्या आहेत. अमेरिकेंत गतवर्षी गाजलेली Gone With the Wind

ही कादंबरी तर हजारोंच्यावर पानांची होती. अडीचशेतीनशें पानांच्या सुटसुटीत कादंबऱ्या लिहिणाऱ्या व्हिकी बाऊमची नवी कादंबरी 'A Tale from Bali' अशीच जंगी आहे (अन् भिकार आहे!) पश्चात्य युवतींची मध्यंतरीची कृशांगाची हौस मावळून पुष्ट नितंब व स्तनभाग आणि विपुल केशभार जसा त्यांना पुन्हा प्रिय होऊं लागला आहे, तद्वतच पाश्चात्य ललितकथाहि पुन्हा जुन्या वळणावर जाऊन लठ्ठलठ्ठ बनत चालल्या आहेत कीं काय कुणाला ठाऊक! तें कसंहि असो, विस्ताराच्या मानानं पाहिलं तर डॉ. क्रोनिन यांची 'टोपीवाल्यांचा किल्ला' ही कादंबरी जरा जुन्या थाटाची वाटल्यावांचून राहात नाहीं. तीनसाडेतीनशें पृष्ठांत या कादंबरीचं कथानक मावलं नसतं असंहि म्हणवत नाहीं. लेखकानं लिहिण्यांत संयमाचं तत्त्व राखलं असतं तर जवळजवळ अर्धी पानं कमी झालीं असतीं!

पण एकीकडे तुम्हांला हें सांगतांसांगतां दुसरीकडे माझ्या मनांत असं आल्यावांचून राहात नाहीं, कीं हीं कादंबरी अशा प्रकारें विस्तारानं आटपशीर असती तर तिच्या वाचनानं माझ्या मनावर आज जो विलक्षण परिणाम झाला आहे तो झाला असता का? अन् या प्रश्नाला 'हो, झाला असता!' असं उत्तर एकदम देतां येत नाहीं मला! याचं कारण असं, कीं कादंबरींतील विविध प्रसंगांचं, स्थळांचं अगर व्यक्तींच्या मनःस्थितीचं वर्णन करतांना लेखकानं यत्किंचितहि कुचराई केलेली नाहीं, त्यानं संयम पार झुगारून दिला आहे हाच कदाचित् या कादंबरीचा प्रमुख गुण असेल; यांतच कदाचित् या कादंबरीचं सामर्थ्य असेल! मोठे-पणाच्या वृथा कल्पनांनीं ज्याचं माथं भडकलेलं आहे अशा एका दुराग्रही निष्ठुर गृहस्थानं बायकापोरांवर सत्ता गाजविण्याची आपली लालसा भागविण्याच्या हट्टाला पेटून अखेर आपल्या घरादाराचं कसं वाटोळं करून घेतलं त्याचं भेसूर शब्दचित्र या

कादंबरींत काढलेलं आहे. अशा चित्रांत गडद काळ्या रंगाचे थरावर थर मुक्त हस्तानं दिले तरच तें पाहतांच माणसाच्या अंगावर शहारे येतील असं म्हणतां येईल. शिवाय सूचकता हा जसा एक गुण आहे त्याप्रमाणें वर्णनाचा भरगच्चपणा हाहि कधींकधीं गुण ठरण्यासारखा असतो. कादंबरींतला मुख्य विषय जर एखाद्या झंझावातासारखा असेल, तर त्याला साजेलशा अनिर्बंध गतीनं आणि शक्तीनं कादंबरींतलीं ठिकठिकाणचीं वर्णनं असावींत हेंच योग्य ठरेल: 'टोपीवाल्यांचा किल्ला' ही कादंबरी अशा स्वरूपाची आहे हें कबूल करणं भाग आहे.

स्कॉटलंडमधल्या लेव्हनफोर्ड नांवाच्या गावांत जेम्स ब्रॉडी नांवाचा गृहस्थ होता. त्याच्या बायकोचं नांव मार्गारेट. त्याच्या दोघी मुलींपैकीं थोरलीचं नांव मेरी अन् धाकटीचं नांव नेसी. त्याच्या मुलाचं नांव मॅथ्यू. जेम्स ब्रॉडीचं टोप्याचं दुकान होतं; पण हा कांहींसा हलक्या प्रतीचा धंदा आपण करीत असलों तरी आपण फार उच्च कुळांतले आहोंत असा त्याला मोठा अभिमान होता. एका उमरावाच्या कुटुंबाशीं आपला कसा संबंध पोंचतो तें तो वेळोवेळीं घरांत बोलून दाखवीत असे. आपल्या मानानं गावांतले सारे लोक हलके होत अशी त्याची भावना होती आणि तिच्यामुळं तो सर्वांशीं मोठ्या आढ्यतेनं वागे. कुणाचं चांगलं झालेलं त्याला पाहावत नसे अन् ज्याच्यात्याच्याशीं हेव्यादाव्यानं वागण्यांत त्याला आनंद वाटे. त्यानं घर बांधलं होतं तेंसुद्धां वस्तीपासून दूर अन् त्या घराचा आकार, बांधणी सारंच कांहीं चमत्कारिक होतं. लोक त्या घराकडे बोटं दाखवून म्हणत, 'जसा मालक तसं घर आहे खरं!' 'टोपीवाल्यांचा किल्ला' असं नांव पडलं होतं त्या घराला!

अन् खरंच तो एक किल्ला होता. आंत जायची कुणा परक्याची प्राज्ञा नव्हती. बाहेर कुठे मजेनं जायची आंतल्या माणसांची छाती नव्हती. मार्गारेट अन् तिचीं तिन्ही मुलं किल्ल्यांत

कोंडलेल्या बंदिवानांसारखींच आयुष्य कंठीत होतीं. जेम्स ब्रॉडी या किल्ल्यांतला बादशहा होता. तो म्हणेल तो कायदा, ठरवील तो अपराध अन् सांगेल ती शिक्षा असा त्याचा कडक अंमल होता. विनोद, थट्टामस्करी, हंसणंखिदळणं त्या घरांत अजिबात वर्ज्य होतं. उंच, धिप्पाड, पैलवानी बांध्याचा, बारीक घाऱ्या डोळ्यांचा, भरदार पिंगट कल्ल्यामुळं ज्याची राकट मुद्रा अधिकच उग्र आणि तिरसट दिसे असा जेम्स ब्रॉडी त्या घरांत एखादा नाराज सिंह आपल्या गुहेंत वावरतो तसा वावरत असे. बायकोनं व पोरांनीं त्याची खायप्यायची मिजास राखली पाहिजे; त्याच्या सुखसोयींत यत्किंचित्‌सुद्धां उणं पडतां कामा नये. सर्वांनीं आपल्या आज्ञाधारकपणानं त्याला खुषींत ठेवलं पाहिजे, तो सांगेल त्याला 'होय' म्हटलं पाहिजे, त्यानं नको म्हटलं कीं तें करतां कामा नये. त्याच्या मर्जीविरुद्ध वागणाऱ्याचा तो संपापानं प्राणसुद्धां घेईल अशी घरांतल्या साऱ्या माणसांची खात्री झाली होती.

परंतु पक्क्या चिरेबंदी भिंतीच्या दगडांतून सुद्धां सापडेल त्या फटींतून वेलींचे नाजुक कोवळे पल्लव बाहेर पडतात! निसर्गाची वाट ते दगड पुरती आडवूं शकत नाहींत! जेम्स ब्रॉडीचीं मुलं त्याच्यापुढं भीतीनं थरथर कापत; पण मॅथ्यू व मेरी वयांत आलीं तेव्हां त्यांच्या अंतःकरणांत प्रणयाची प्रेरणा जागृत झाली. आणि ही प्रेरणा अशी जबरदस्त आहे कीं तिनं एकदां हृदयाचा ताबा घेतल्यावर परिस्थितीचा विरोध टिकत नाहीं; जुलुमी धाकाचा तर नाहींच. ॲग्निस नांवाच्या मुलीवर मॅथ्यू प्रेम करूं लागला व डेनिस नांवाच्या एका तरुणाच्या प्रेमपाशांत मेरी सांपडली. डेनिस मोठा देखणा, सुस्वभावी अन् कर्तृत्ववान् होता; पण तो एका साध्या कलालाचा मुलगा. आपला बाप आपल्याला त्याच्याशीं लग्न करून देईल हें अगदीं अशक्य होय हें मेरी पुरतं ओळखून होती. पण त्याच्यावर तिचं प्राणापलीकडे प्रेम होतं. त्याचंहि आपल्यावर तसंच प्रेम आहे याविषयीं तिची खात्री झाली होती व त्याच्याशीं लग्न

करण्याचा तिच्या मनात पक्का निश्चय ठरला होता. ती चोरून त्याच्या गांठीभेटी घेई व त्याच्या एकान्त सहवासांत कित्येक घटका घालवी. तिनं आपल्या बापाची एवढी भीति कां बाळगावी तें डेनिसला कळत नसे व आपल्या विशुद्ध प्रेमाला असं चोरटं स्वरूप असावं हें तर त्याला मुळींच सहन होत नसे.

मेरीच्या विरोधाला न जुमानतां त्यानं एके दिवशीं ब्रॉडीच्या दुकानांत जाऊन त्याची भेट घेतली आणि सरळ सांगितलं, 'माझं तुमच्या मेरीवर प्रेम आहे. तिच्याशीं लग्न करायची माझी इच्छा आहे!' पण ते शब्द ऐकतांच ब्रॉडी संतप्त होऊन गर्जू लागला, त्यानं डेनिसवर अपशब्दांचा वर्षाव केला व अखेर त्याच्यावर हात उगारायलाहि कमी केलं नाहीं. या प्रकारानंतर मात्र डेनिस उमजला, कीं राजरोसपणें, मेरीच्या बापाच्या अनुमतीनं तिच्याशीं आपल्याला लग्न करतां येईल ही आशा व्यर्थ होय. बापाच्या घराचा त्यागच मेरीला केला पाहिजे. मेरी तें करायला तयार होती—नव्हे, उत्सुक होती. पण डेनिसचं म्हणणं, 'अशी घाई नको. माझा रोजगार वाढूं दे, स्वतंत्र बिऱ्हाडाचा खर्च झेपण्याइतके पैसे माझ्याजवळ साठूं देत; मग आपण लग्न करूं.' त्याचा हा विचार योग्यच होता व त्याप्रमाणं वागायला मेरी आनंदानं कबूल झाली असती.

पण याच सुमारास तिला कळून आलं, कीं डेनिसपासून आपल्याला दिवस गेले आहेत. तिनं त्याला ही गोष्ट सांगितली तेव्हां त्याला विस्मयाचा धक्का बसला, असं झालं नसतं तर बरं झालं असतं या विचारानं दु:खहि झालं; पण त्याची सत्प्रवृत्ति ढळली नाहीं. मेरीशीं शक्यतों लवकर विवाह करण्याचं त्यानं ठरवलं. बिऱ्हाडासाठीं त्यानं एक छानसा बंगलादेखील घेतला. दुकानाच्या कामासाठीं त्याला आठदहा दिवस फिरतीवर जाण्यावांचून गत्यंतरच नव्हतं; पण मेरीला त्याचं कांहीं वाटलं नाहीं. डेनिस परत आला कीं आपलं लग्न होईल अन् मग आपण व आपला जिवलग डेनिस अन् आपला

प्रेमाचा संसार अशा स्वर्गीय सुखाला प्रारंभ होईल याबद्दल तिची खात्री होती. आठ दिवस थांबायला ती आनंदानं तयार झाली.

पण दुर्दैवाला एखाद्यावर झडप घालायची असली म्हणजे आठ घटकासुद्धां पुरतात; मग मेरी तर डेनिसच्या आधारावांचून एकटी अशी दुर्दैवाला आठ दिवस सांपडली ! एके रात्रीं त्याची झडप बिचारीवर अकस्मात् पडली !

कांहीं एका प्रसंगाच्या निमित्तानं ती अर्धवट विवस्त्र असतांना तिच्या आईनं तिला पाहिलं. ती गर्भवती आहे हें लक्षांत येतांच तिच्या आईला मोठा धक्का बसला आणि चमत्कार असा, कीं लेकीची अनुकंपा वाटण्याऐवजीं लेकीच्या या दुराचारांत आपलं अंग होतं असा आपल्या नवऱ्याला जर संशय आला तर तो आपल्याला जिवें मारील ही भयंकर भीतीच त्या स्त्रीच्या मनांत एकदम उभी राहिली. पाषाणहृदयी नवऱ्याच्या धाकांत सतत वागल्यानं तिचं मातृहृदय कसं विकृत झालं होतं पाहा ! तिनं मेरीला जवळ घेऊन धीर देण्याऐवजीं नवऱ्याला ती गोष्ट सांगून टाकली आणि तो जेव्हां संतापानं लाल होऊन पाहूं लागला, तेव्हां गर्भगळीत होऊन ' मला मारूं नका ! माझा कांहीं अपराध नाहीं ! ' येवढंच पुनः-पुन्हां ओरडूं लागली ! आपल्या मुलीनं कुळाला कलंक लावला हें पाहतांच ब्रॉडीचा क्रोध अनावर झाला. त्याचं त्या वेळचं पाशवी तांडव काय वर्णावं ! त्यानं मेरीच्या पोटांत लाथ मारून तिला खाली पाडलं, शिव्यांची लाखोली वाहिली अन् अखेर तिला घराबाहेर काढली. त्यावेळीं बाहेर तुफान वादळ चालूं होतं. मेरी वादळांत सांपडली व धांवताधावतां थकून जाऊन एका शेत-कऱ्याच्या खोपटाबाहेर पडली. झोपडींतल्या मंडळींनी तिला इस्पितळांत नेलं. तिथले डॉक्टर ' रेनविक् ' यांनी औषधोपचार केले. मेरीचं मूल जन्मल्याबरोबरच मेलं !

आणि दुर्दैवाची भूक येवढ्यावरच भागली नाहीं. ज्या क्षणीं मेरीच्या उदरांतून बाहेर आलेलं तें अर्भक पहिला टाहो फोडीत होतं

त्याच क्षणीं तिचा प्रियकर डेनिस 'मेरी! मेरी!' असा अखेरचा आक्रोश करीत होता! ज्या आगगाडीनं तो लेव्हनफोर्डला परत यायला निघाला होता, ती वादळांत सांपडून एका पुलावरून खालीं कोसळत होती!

ब्रॉडीचा मुलगा मॅथ्यू मध्यंतरी नोकरीनिमित्त हिंदुस्थानांत आला होता; पण तो फार दिवस धडपणानं नोकरींत नांदला नाहीं. शिस्तीच्या कचाट्यांत घरीं डांबलेलीं मुलं घराबाहेर पडून स्वतंत्र झालीं की व्यसनी व्हायला वेळ लागत नाहीं. जुगारी, दारूबाज मॅथ्यूची नोकरी गेली व तो परत घरीं आला. त्याचे पैसे सरले होते; पण सारीं व्यसनं कायम होतीं. ज्या ऑफिसर्शी त्याचा विवाह होणार होता ती त्याला आता कुठे हवीशी वाटत होती? आता तो पक्का चंगीभंगी झाला होता. तो आईला सुचतील त्या थापा मारी आणि तिच्याजवळून पैसे काढी. तें साधलं नाहीं तर तिचं किडुकमिडुक चोरी. एके रात्रीं मॅथ्यूनं सपाटून सुरापान केलं अन् जिथं आपली कामपिपासा तृप्त करतां येईल अशी त्याची कल्पना झाली होती अशा घरांत त्यानं प्रवेश केला. हें असलं घर नाहीं असं मालकिणीनं त्याला परोपरीनं सांगितलं; पण 'आधीच मर्कट तशांतहि मद्य प्याला' अशी त्याची अवस्था झालेली! तो काय तिचं ऐकतो? तो घरांतल्या साऱ्या खोल्या धुंडाळूं लागला आणि एका खोलींत जेव्हां एक तरुण स्त्री त्याला आढळली तेव्हां त्याचा आनंद गगनांत मावेना, 'तुम्ही कोण? तुम्ही बाहेर व्हा!' असे त्या स्त्रीचे दरडावणीचे शब्द त्यानं तुच्छ मानले. 'माझे यजमान आत्ता इथं येतील अन् त्यांनीं तुम्हांला इथं पाहिलं तर तुमचा प्राण घेतील!' असंहि ती म्हणाली; पण मॅथ्यूच्या अंगांत सुरा अन् काम अशी दोन पिशाच्चं शिरलीं होतीं. त्यानं त्या पोरीला एकदम पकडलं अन् आता तो तिच्यावर बलात्कार करणार—इतक्यांत खोलीचं दार धाड्दिशी उघडलं गेलं आणि मॅथ्यू वळून पाहातो तों प्रत्यक्ष आपला बापच आपल्यापुढें उभा असलेला त्याला दिसला!

क्षणभर बापलेक दोघेहि दगडासारखे निश्चल उभें राहिलें. दोघांचाहि स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना !

एक गलिच्छ शिवी हासडून लेकाची मानगूट पकडण्यासाठीं ब्रॉडीनं हात पसरला; पण मॅथ्यू चटकन दूर झाला. अशा विचित्र परिस्थितींत सापडल्यामुळेंच की काय कुणास ठाऊक, आजपर्यंत साचलेलं बापाविषयींचं सारं भय त्याच्या मनांतून एकदम उडालं. गांगरून जायच्याऐवजी तो आपल्या बापाला बेगुमानपणानं, बरोबरीनं अद्वातद्वा बोलूं लागला. मुलानं आपल्या तोंडावर ब्र काढलेला ज्यानं ऐकला नव्हता, त्या ब्रॉडीवर अशा स्थळीं असा प्रसंग ! तो क्रोधानं पेटला, खाऊं की गिळूं अशा त्वेषानं त्यानं मॅथ्यूला धरायसाठीं पाऊल पुढं टाकलं. मॅथ्यूनं झटकन खिशांतलं पिस्तुल काढलं अन् गोळी झाडली ! पण नेम चुकला. ब्रॉडीच्या कानशिलाजवळ उगीच थोडंसं लागलं अन् पलीकडच्या कपाटावरच्या आरशाचे मात्र तुकडेतुकडे झाले. मग काय विचारतां ? ब्रॉडीनं एका मुष्टिप्रहारांत मॅथ्यूला खालीं पाडलं अन् मग तोंडानं शिव्या देत त्याला लाथाबुक्क्यांखालीं बेदम बडवून काढलं.

इतक्यानंहि त्या क्रोधाविष्ट पशूचं समाधान झालं म्हणतां काय ? नाहीं. जमिनीवर पडलेल्या मॅथ्यूला त्यानं बळेंच उचलून खुर्चीवर बसविलं अन् तो त्याला म्हणूं लागला, 'तुला रात्र मजेंत घालवायची होती नाहीं का ? ठीक, चल तूं अन् मी मिळून दारू पिऊं !' मारानं मॅथ्यूचीं हाडं ठणकत होतीं. ही नवी चमत्कारिक विटंबना त्याला भयंकर वाटली. तो आधींच इतकी दारू प्याला होता, की आता एका थेंबानंहि आपल्याला उलटी होईल असं त्याला वाटत होतं. तो बापाच्या विनवण्या करूं लागला, 'मी तुमच्या पायां पडतो. मी मोठा अपराध केला, मी तुमची क्षमा मागतों. मला सोडा, मला घरीं जाऊं द्या. दया करा माझ्यावर. जाऊं द्या इथून !' पण ब्रॉडीनं त्याला हलूं दिलं नाहीं आणि पुढं केलेली

दारू तो घेईना तेव्हा त्यानं खस्‌दिशीं त्याला पकडलं, त्याचं तोंड उघडलं अन् तोंडांत दारू ओतली आणि मग पुन्हा त्याच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. मॅथ्यू उलट उत्तर करील अन् मग त्याच्यावर पुन्हा हात टाकायला मिळेल अशी त्याची कल्पना. पण मॅथ्यूच्या अंगांत आता यत्किंचितहि त्राण उरलं नव्हतं. बाप जेव्हां 'बोल ! गप्प कां बसलास ? बोल !' म्हणून त्याच्यावर खेकसूं लागला तेव्हा तो केविलवाण्या दीन स्वरानं म्हणाला, 'बाबा, तुम्हाला वाटलं तर माझे प्राण घ्या ! मला एकदाचं मारून टाका; पण माझा असा छळ करूं नका !' पण ब्रॅडीला कुठली दया यायला ? त्यानं पुन्हा मॅथ्यूला मनसोक्त झोडपलं अन् अखेर त्याला हातीं धरून फरपटत बाहेर काढून रस्त्यानं ओढीत ओढीत घरापर्यंत नेलं; इतकंच नव्हे, तर तसं जात असतां त्याला गायला लावलं ! त्याच्या रुद्ध, शुष्क कंठांतून आवाज फुटेना तेव्हां ब्रॅडी ओरडूं लागला, 'मोठ्यांदा ! यापेक्षां मोठ्यांदा ! हं, म्हण !'

बापलेकांची ही विचित्र मिरवणूक घरीं पोचली त्याच वेळेस मार्गारेट–ब्रॅडीची पत्नी–अंथरुणांत पडून विवळत होती. गेलीं कित्येक वर्षं तिला पोटदुखीची व्यथा होती; पण बिचारीनं ती मुकाट्यानं सहन केली होती. औषधाला पैसे खर्च झालेले नवऱ्याला आवडायचे नाहींत अन् त्याच्या सेवाचाकरींत खंड पडण्याजोगी विश्रांतीहि तो आपल्याला घेऊं द्यायचा नाहीं या दोन्ही गोष्टी ती पुऱ्या ओळखून होती. पोटांत कितीहि दुखलं तरी तें सहन करावं, त्याचा उच्चारहि कोणाजवळ करूं नये. अन् घाण्याच्या बैलाप्रमाणं सारीं कामं उरकावीं अशा क्रमांत तिनं इतकीं वर्षं काढलीं होतीं. पण आज पोटांतल्या वेदना तिला अगदी असह्य झाल्या अन् ती अंथरुणांत तडफडूं लागली. ब्रॅडी घरीं आला तो सरळ आपल्या खोलींत जाऊन निजला; पण मॅथ्यूला आईचं विवळणं ऐकूं आलं व तिची अवस्था पाहातांच तो डॉक्टर आणण्यासाठी घराबाहेर

धावला. ज्या डॉ. रेनविकनं मेरीला औषधपाणी केलं होतं, त्यालाच मॅथ्यू घेऊन आला. त्याला माहीत नाहीं कीं मेरीला सहाय्य केल्याबद्दल डॉ. रेनविकवर आपल्या बापाचा मोठा रोष आहे, रेनविकला तें ठाऊक होतं; पण असल्या गोष्टी मनांत आणायची ही वेळ नव्हती. तो आला, त्यानं मार्गारेटला झोपेचं औषध दिलं अन् दुसऱ्या दिवशीं तिची सावकाश तपासणी केली. रेनविक आपल्या घरांत यावा हें ब्रॉडीला सहन होणं शक्यच नव्हतं. आपली पत्नी आजारी आहे यापेक्षा तिच्या आजारामुळं या रेनविकचं पाऊल आपल्या घरांत पडलं हाच विचार त्याच्या मनांत प्रथम आला. तो रेनविकला अद्वातद्वा बोलूं लागला. डॉ. रेनविकनं आपली शांति ढळूं न देतां त्याला सांगितलं. 'ब्रॉडी, आपल्या मगरूर हट्टी स्वभावानं तूं सगळ्यांचा घात केला आहेस; पण आता तरी डोळे उघड. तुझ्या बायकोला गर्भाशयाच्या जागीं व्रण झालेला आहे. तिचं औषधपाणी नीट कर!'

ब्रॉडीचं मन किती विकृत अन् कुजकं आणि त्याचे सारे मनोव्यापार किती अहंभावनिष्ठ पाहा! आपली धर्मपत्नी असाध्य रोगानं ग्रासल्याचं कळल्यावर त्याच्या मनांत पहिला विचार आला तो कांहीं तिच्याबद्दलच्या करुणेचा किंवा तिच्यासाठीं आपण काय केलं पाहिजे या कर्तव्याचा नव्हे, तर आता आपलं कसं होईल याविषयीचा! आपण अहंकारानं आणि हट्टानं वागलों त्याचे हे सारे दुष्परिणाम घडत आहेत हा समज त्याच्या मनाला क्षणमात्रहि शिवला नाहीं; आपण आपली वागणूक सुधारली पाहिजे अशा अनुतापाचं तर नांवच नको! दुर्दैवानं आपला छळ चालविला आहे, आपली योग्यता वास्तविक किती मोठी, पण आपल्या नशिबांत सुख नाहीं, आपण साऱ्या मुलुखाचे अभागी इत्यादि कल्पना त्याच्या मनांत आल्या. त्यानं स्वतःची स्वतःशीं कीव केली व वास्तविक जगाच्या सहानुभूतीवर जर कुणाचा हक्क असेल तर तो आपला असं त्यानं ठरविलं.

असल्या नवऱ्याकडून मार्गारेटच्या औषधपाण्याची उत्तम व्यवस्था होईल हें शक्यच नव्हतं. बिचारी कांहीं दिवस झिजत पडली व अखेर इहलोक सोडून गेली. डॉ. रेनविककडून तिला कळलं होतं, कीं आपली मुलगी मेरी लंडन शहरीं नोकरी करून राहिलेली आहे. मरण्यापूर्वी लेकीची भेट व्हावी अशी तिची साहजिकच फार इच्छा होती; पण मेरीचं नांव काढल्याबरोबर ब्रॉडी संतापून शिव्या मोजूं लागला होता व तेव्हांपासून मार्गारेटनं तो विषय सोडून दिला होता. त्यामुळें तिची व लेकीची शेवटपर्यंत भेट झाली नाहीं ती नाहींच !

ज्या स्त्रीच्या खोलींत बापलेकींची ती विलक्षण भेट झाली होती तिचं नांव 'नॅन्सी.' लेव्हनफोर्डच्या एका पिठ्यांत ती नोकर होती. ब्रॉडीचं सुरापान वाढल्यापासून तो या पिठ्यांत वारंवार जाऊं लागला होता व नॅन्सीला त्यानं ठेवली होती. मार्गारेट मेल्या-वर आता घरकाम कुणीं बघायचं हा प्रश्न ब्रॉडीपुढं उभा राहिला व नॅन्सीला घरांत आणून त्यानं तो सोडविला. पण यांतूनहि दुःखच निर्माण झालं. मॅथ्यूला नोकरी नव्हती. तो दिवसभर घरांतच असे. त्याचं अन् नॅन्सीचं थोड्याच दिवसांत सूत जमलं अन् अखेर तीं दोघं मिळून पळून गेलीं.

थोरली लेक घराबाहेर गेली. बायको आटपली, लेक उडाण-टप्पू निघाला अन् उतारवयांत जिचा रंगेल षोक केला व जिला घरांत आश्रय दिला ती नॅन्सी अखेर बेइमानी करून निघून गेली असे आघातावर आघात ब्रॉडीवर झाले ! त्याचा धंदा तरी नीट चालला होता म्हणतां काय ! नाहीं. तोहि त्यानं आपल्या गुणांनी संपुष्टांत आणला होता. लंडनच्या एका मोठ्या कापडविक्या कंपनीनं लेव्हनफोर्ड गावीं ब्रॉडीच्या दुकानाशेजारींच एक दुकान काढलं. अगदीं आधुनिक थाटाचं हें पहिलंच दुकान. लेव्हनफोर्डचे लोक साहजिक त्या दुकानांतून माल घेऊं लागले अन् ब्रॉडीचीं जुनींजुनीं गिऱ्हाइकंहि फुटूं लागलीं. पण असं कां होतं आहे याचा नीट

विचार करून आपल्याहि वागण्यांत बदल करावा अन् आपलंहि दुकान नवीन तऱ्हेनं थाटून आकर्षक करावं अशी बुद्धि ब्रॉडीला सुचली नाहीं. आपलं बरोबर आहे अन् जग चुकतं आहे हें मुळीं त्याचं आयुष्यांतलं मुख्य सूत्र. जे आपल्या मनासारखं वागणार नाहींत त्यांना शिव्या घालायच्या अन दमदाटी द्यायची येवढंच त्याला माहीत. असल्या वागणुकीनं घरांतलीं माणसं आपल्यापुढं वाकतात तसंच जगहि वाकलं पाहिजे अशी ब्रॉडीची कल्पना; अन या मूर्ख, अहंकारी कल्पनेच्या दगडावर त्यानं आपल्या धंद्याचा कपाळमोक्ष करून घेतला. त्याच्या दुकानांत कोणी फिरकेना. टोप्यांचे ढीगच्या ढीग तसेच पडून राहिले. धूळ खात पडलेल्या त्या ढिगांचा देखावा ब्रॉडीला पाहवेना. त्या राशी दिसल्या की त्याचा जगाविषयींचा सारा संताप उचंबळून येई. एक दिवस त्यानं खूप दारू झोकली, दुकानांत जाऊन सारीं कपाटं फोडून टाकलीं, माल रस्त्यावर फेंकून दिला. इतकंच नव्हे, तर अखेर पिशाच्चबाधा झालेल्या माणसाप्रमाणे जाणाऱ्यायेणाऱ्या लोकांच्या अंगावर टोप्या भराराभिरकावून तो ओरडत सुटला, " घ्या, घ्या ! लुटा या टोप्या मोफत लूट लावली आहे ! कुणाला टोपी पाहिजे ? बोला ! अशी लूट पुन्हा मिळायची नाहीं ! ही घ्या. ही घ्या. ही ! आणखी ही ! ही आली ! पकडा ! मजा करा ! मरा !'

आतां धाकटी लेक ' नेसी ' म्हणजेच काय तो आशेचा अखेरचा तंतु ब्रॉडीला उरला होता. आपण इतर सर्वांपेक्षां फार श्रेष्ठ दर्जाचे आहोंत, शीलानं आणि बुद्धिमत्तेनं आपलं कुटुंब गावांतल्या इतर साऱ्या कुटुंबांहून वरच्या दर्जाचं आहे हें सगळ्यांना पटवून देण्याची महत्त्वाकांक्षा त्यानं पहिल्यापासून मनांत बाळगली होती. त्या आढ्य-तेनं अन् हट्टानं तो साऱ्या लोकांशीं वागत आला होता; पण त्याच्या या महत्त्वाकांक्षेला आणि हट्टाला आतांपर्यंत एकामागोमाग एक धक्के बसले होते. आणि ती महत्त्वाकांक्षा अजूनहि सिद्ध करून घ्यायची असेल तर त्याची धाकटी मुलगी नेसी हें एकच साधन

त्याच्याजवळ उरलं होतं. नेसी लहानपणापासून मोठी हुषार आणि तैलबुद्धीची निघणार असं दिसूं लागलं होतं. ब्रॉडी नेहमी म्हणे, 'माझी बुद्धि या पोरींत उतरली आहे.' (सगळ्या चांगल्या गोष्टींचं श्रेय स्वतःकडे घेण्याइतका त्याचा अहंकार निर्लज्ज होता!) नेसीचा शाळेंत नेहमी पहिला नंबर असे. तिच्या या हुषारीचं जाणतं कौतुक ब्रॉडीला वाटत असे असं नव्हे, तर गावांतल्या साऱ्या लोकांची पोरं तिच्याखाली असलीं कीं साऱ्या गांवाचा नक्षा आपण उतरविला अशा मूर्ख अभिमानाचा आनंदच त्याला खरं पाहातां होत असे. शाळेंतल्या अखेरच्या परिक्षेला एक मोठी शिष्यवृत्ति ठेवलेली होती. ती जर नेसीनं मिळविली तर आपल्या साऱ्या टीकाकारांवर आणि शत्रूंवर आपण प्रचंड विजय मिळविला अन् सूड उगाविला असं होईल अशी ब्रॉडीची कल्पना. परिक्षेची वेळ आता जवळ येऊं लागली होती. नेसीनं सारखा अभ्यास केला पाहिजे, तिनं क्षणाचीहि विश्रांति घेतां कामा नये असा ब्रॉडीचा लकडा तिच्यामागं सुरू असे. तिला तो अभ्यास झेपतो कीं, नाहीं, अतिश्रमानं तिची प्रकृति नीट राहील कीं नाहीं, असले विचार त्याच्या मनांत चुकूनसुद्धां आले नाहींत. लहान नेसी त्याच्या या जुलुमानं घाबरून गेली. अभ्यासाचा भार आणि बापाचा त्रास तिला असह्य वाटूं लागला. अशा व्याकुल स्थितींत तिला साहजिकच आपल्या थोरल्या बहिणीची तीव्रतेनं आठवण झाली. मेरीला परत घरीं बोलावण्याबद्दल तिनं बापाजवळ गोष्ट काढली. मेरीचं नांव ऐकतांच ब्रॉडीच्या अंगांत पशु संचारला! पण मग त्याला असा विचार सुचला, कीं 'नाहींतरी आतां घरकाम करायला कुणीतरी माणूस पाहिलंच पाहिजे; मेरी परत आली तर आपली नेसीची बडदास्त उत्तम प्रकारें राहिल अन् पुन्हां ती सारी फुकटांत!' याच सुमारास लंडनहून मेरीचं त्याला पत्र आलं, कीं 'कृपा करून पूर्वीच्या गोष्टी विसरा, माझे अपराध पोटांत घाला अन् मला परत घरांत येऊं द्या.' तिच्यावर मोठे उपकार करण्याच्या आविर्भावानं ब्रॉडीनं तिला परवानगी दिली आणि अशा प्रकारें कित्येक वर्षांपूर्वी अत्यंत

करुणास्पद स्थितींत घराबाहेर पडलेली मेरी पुन्हा घरीं परत आली !

आपल्या धाकट्या बहिणीचं उत्तम प्रकारें संगोपन करायचं हें एकच आयुष्यांत आपल्याला उरलेलं कार्य होय अशा भावनेनं मेरी वागूं लागली, थोरली बहीण परत आली म्हणून नेसीलाहि पराकाष्ठेचा आनंद झाला. आपल्या घरांत जिकडेतिकडे अंधेर माजला होता, पण आता पुन्हा प्रकाश पडला असं तिला वाटलं; पण अभ्यासाच्या सतत काचामुळं त्या मुलीची मोठी विचित्र अवस्था झाली होती. तिची प्रकृति तर बिघडली होतीच; पण बापाच्या धाकानं तिच्या मनालाहि चमत्कारिक विकृत स्वरूप आलं होतं. ती असामान्य बुद्धीची मुलगी खरीच आणि उत्तेजक आनंदी वातावरणांत ती असती तर हौसेनं अभ्यास करून तिनं ती मोठी शिष्यवृत्ति मिळविली असती हेंहि खरं; पण ब्रॉडीच्या घरांत असलं वातावरण कुठं होतं ? त्याच्या घरांतली सारी हवा त्याच्या हट्टानं अन् निर्दयपणानं कोंदटली होती आणि जिकडेतिकडे त्याच्या अहंकाराची दुर्गंधी भरली होती. गावांवल्या लोकांवर सूड घेतलासं व्हावं, छाती वर काढून म्हणतां यावं, ' पाहिलंत ब्रॉडीची पोर कशी आहे तें ? ' एवढ्यासाठीं केवळ नेसीनं ती शिष्यवृत्ति मिळवावी असं त्याला वाटत होतं. त्याच्या अहंकाराच्या डावांतलं नेसी हें अखेरचं राहिलेलं प्यादं होतं. नेसीला तो पुष्कळदां म्हणे, ' तूं ही शिष्यवृत्ति मिळविली नाहींस तर तुझा प्राण घेईन बघ ! ' हे त्याचे दहशतीचे शब्द नेसीला पुनःपुन्हां आठवत. त्या शब्दांची तिच्या मनानं एवढी धास्ती खाल्ली होती, कीं शाळेतले धडे लिहितांना वहीवर मधेंच ती लिही, ' हं नेसी, चालू दे जोरांत अभ्यास. याद राख, बक्षीस मिळवलं नाहींस तर प्राण घेईन तुझा. ' सारांश, त्या मुलीला ती परिक्षा म्हणजे एक भयंकर दिव्य वाटूं लागलं.

नेसीची प्रकृति बरी नाहीं हें ध्यानांत येतांच मेरीनं तिला नीट औषधपाणी देण्याचा विचार केला. ती डॉक्टर रेनविककडे

गेली. मेरीला पाहून रेनविकला फार आनंद झाला. त्यानं नेहमीच्या औषधपाण्याची अवस्था तर केलीच; परंतु शिवाय मेरीबद्दलहि अत्यंत आस्था दाखविली. खरं म्हणजे मेरी प्रथम त्याच्या इस्पितळांत राहिली होती तेव्हांपासूनच डॉक्टर रेनविकचं तिच्यावर प्रेम बसलं होतं. ती पुन्हा लेव्हनफोर्ड गावीं परत येईल आणि आपलं प्रेम तिच्याजवळ व्यक्त करायला मिळेल अशी आशा त्यानं कधींच केली नव्हती; पण त्या आशेला जागा असतांहि त्यानं मनांतल्या मनांत तिची गोड स्मृति अजूनहि ताजी ठेवली होती. त्यामुळें मेरी अकल्पित परत आलेली पाहून त्याला अत्यानंदच झाला अन् तो तिचं प्रियाराधन करूं लागला.

नेसीच्या परिक्षेचा दिवस उगवला तेव्हां तिची मनःस्थिति अतिशय चमत्कारिक होऊन गेली. क्षणांत तिचं मन आत्मविश्वासानं आणि ईर्षेनं भरून येऊन तिला वाटे, 'आपण इतक्या हुशार, इतका अभ्यास केलेला, मग या परिक्षेची काय कथा! आपण सहज पहिला नंबर मिळवूं!' पण लगेच तिच्या मनांत येई, 'न जाणों आयत्या वेळीं काय होईल तें! किती झालं तरी ही परिक्षा म्हणजे सोडत आहे. माझा पहिला नंबर न आला तर?–तर काय, माझा बाप मला उभी चिरून टाकील!' आणि हें मनांत आल्याबरोबर तिचं सर्वांग भीतीनं थरथर कापूं लागे! परिक्षेला निघायच्या ऐन घटकेला तिनं मेरीला घट्ट मिठी मारली अन् म्हटलं, 'नको, नको! मला नको ती परिक्षा! मी नाहीं जात!' पण दुसऱ्याच-क्षणीं आपला बाप आपल्यासमोर उभा आहे हें तिच्या लक्षांत आलं अन् ती घाबरून म्हणाली, 'जातें, जातें! मी जातें परिक्षेला.'

परिक्षेचा निकाल लागला आणि शिष्यवृत्ति नेसीला न मिळतां ब्रॉडीनं ज्याचं नेहमीं अकारण वैर केलं होतं अशा एका गृहस्थाच्या मुलाला मिळाली. त्या निकालाचा लखोटा ज्यावेळीं येईल त्या वेळीं घरांत आपला बाप व बहीण नसतील अशी चतुराईची योजना नेसीनं केली होती. तो लखोटा उघडून वाचल्यावर त्या मुलीनं काय केलं असेल अशी तुमची कल्पना आहे? तुम्हांला वाटेल, तिनं रडून

आकान्त केला असेल किंवा ती भीतीनं घरांतून पळून गेली असेल. पण छे, छे! घरांतूनच काय, या जगांतून नाहींसं झाल्याखेरीज आपल्या हट्टी, अहंकारी बापाच्या तडाक्यांतून आपली सुटका होणार नाहीं अशी खात्री झाली असल्यामुळें त्या मुलीनं गळफांस लावून घेऊन स्वतःच्या जीविताचा अंत करून टाकला!

ब्रॉडी घरीं परत आला तों त्याच्या अहंकाराला पडलेला तो अखेरचा बळी त्याला दिसला!

त्याची पत्नी केव्हांच मेली होती, मुलगा त्याला सोडून गेला होता, मेरी डॉक्टर रेनविकच्या प्रेमाचा आश्रय घ्यायला गेली आणि त्याची धाकटी मुलगी नेसी मरून पडलेली तो आतां पाहात होता.

कादंबरी या ठिकाणीं संपलेली आहे. ही एक दारुण शोक-कथा आहे हें तुमच्या लक्षांत आलंच असेल. ही शोककथा लिहितांना स्वतः ब्रॉडी व त्याच्या कुटुंबांतलीं चार माणसं यांचीं स्वभावचित्रं काढण्यांत जें कौशल्य डॉ. क्रोनिन् यांनीं दाखविलं आहे तें अभ्यास करण्यासारखं आहे. प्रथम तुम्हीं हें लक्षांत घ्या, कीं ब्रॉडीनं आपल्या मूर्ख, निर्दय, हट्टी अहंकारानं स्वतःचा व कुटुंबाचा जो सर्वनाश करून घेतला त्याच्या एकाहून एक चढत्या अशा पांच पायऱ्या लेखकानं कल्पिल्या आहेत. सामान्यपणें ज्यांना आपण पेचप्रसंग म्हणतों तसले पेचप्रसंग य कादंबरींत नाहींत; परंतु त्याचं कार्य या पांच पायऱ्यांच्या सहाय्यानं लेखकानं कसं साधून घेतलं आहे तें पाहा. प्रथम ब्रॉडीची थोरली मुलगी मेरी कलंकित ठरते आणि त्याच्या अब्रूला व अभिमानाला पहिला जबरदस्त धक्का बसतो. नंतर त्याचा मुलगा दुराचारी निघतो अन् बापाच्या प्रियपात्राबरोबर पळून जाण्यापर्यंत त्याची मजल जाते. मग त्याची बायको मरते. त्यानंतर त्याचं दुकान उध्वस्त होतं आणि अखेर नेसी गळफांस लावून घेऊन आत्महत्त्या करते! ज्या अहंकाराला ब्रॉडी पहिल्यापासून पेटला त्याच अहंकाराच्या डोंबांत साऱ्या घरादाराचं भस्म झालेलं अखेर त्याला पाहावं लागतं! अहंकाराच्या दुष्परिणामांचं याहून भयंकर शब्दचित्र तुमच्यापैकीं कुणाच्या वाचण्यांत आलं आहे?—निदान माझ्या तरी नाहीं.

या कादंबरींत कथानकरचनेच्या चमत्कृतिकारक युक्त्या फारशा नाहींत ; पण एकदोन आहेत त्यांकडे तुमचं लक्ष मला वेधलं पाहिजे. लेखकाच्या कल्पकतेची साक्ष देणारा या कादंबरींतला सर्वांत उत्तम प्रसंग म्हणजे त्यानं घडवून आणलेली नॅन्सीच्या खोलींतलीं बाप-लेकांची अकल्पित भेट ! याच्या खालोखाल मनांत भरणारा प्रसंग म्हणजे ज्या रात्रीं मेरीला घराबाहेर पडावं लागलं, त्याच रात्रीं डेनिसला आगगाडीच्या आपघातांत आलेला मृत्यु ! मेरी व डॉक्टर रेन॰विक यांची दीर्घ कालानं घडवून आणलेली अनपेक्षित भेटही कौशल्यपूर्ण आहे ! परंतु मी पुन्हा सांगतों, कीं या कादंबरीची खरी शक्ति प्रसंगयोजनेच्या कौशल्यापेक्षा मुख्य पात्रांच्या स्वभाववर्णनांत आणि त्या त्या पात्रांच्या सूक्ष्म मनोव्यापारांचीं जीं चित्रें निरलसपणें कादंबरीकारानं रंगविलीं आहेत त्यांत आहे. ब्रॉडी, त्याची बायको मार्गारेट, मॅथ्यू, मेरी आणि नेसी यांच्या कृत्यांची आणि विचार-विकारांचीं वर्णनं वाचलीं कीं, मनुष्यस्वभावाचे कधींहि विसरतां न येण्यासारखे पांच नमुने प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याचा भास झाल्यावाचून राहात नाहीं.

कादंबरीचा विषयच बोलूनचालून उद्वेगजनक व शोककारक आहे आणि लेखकानं तो लिहिला आहे अशा जबर सामर्थ्यानं, कीं जों जों पुस्तक वाचीत पुढें पुढें जावं, तों तों मनांत साचत जाणारा उद्वेग व शोक असह्य होऊन वाचक मनांतल्या मनांत लेखकाला म्हणूं लागतो, ' पुरे पुरे ! आतां आम्हांला हें सहन होत नाहीं. ' ब्रॉडीच्या धिप्पाड, मस्त शरिरापासून तों त्याच्या अहंकारी मनाच्या सूक्ष्मतम व्यापारापर्यंत प्रत्येक गोष्ट लेखकानं कमालीच्या विदारक पद्धतीनं सांगितली आहे. अविवाहित मेरी गर्भवती आहे हें कळतांच संतप्त होऊन तिच्या पोटांत लाथ मारणारा ब्रॉडी, नॅन्सीच्या खोलींत आकस्मिक आपला स्वतःचा मुलगा दिसतांच खवळलेल्या क्रूर श्वापदाप्रमाणें वागणारा ब्रॉडी आणि आपल्या धंद्याचं वाटोळं झालं हें कळल्यावर दुकानाचीं कपाटं फोडून टाकून टोप्या हवेंत भिरकावीत

आरडतओरडत वेड्यासारखा रस्त्यानं सैरावैरा धावणारा ब्रॉड
—हीं शब्दचित्रं तर तुम्हीं एकदा वाचल्यावर तुमच्या स्मरणांतून कध
जाण शक्य नाहीं.

आणि डॉ. क्रोनिनच्या ज्या कलमानं हे गंभीर भेसूर हृदय
विदारक प्रसंग रंगविले आहेत तें कलम मानवी स्वभावातल्या सात्विक
आणि मनोहर छटाहि अतिशय नाजुकपणानं रंगवूं शकतं हें पाहाण्या
सारखं आहे. असल्या मनोहर मृदु छटांना लेखकांनं मुद्दामच कमी वा
दिलेला आहे. गडद अंधार लक्षांत येण्यासाठीं प्रकाशाचे चारदोन
किरण सोडावे, तद्वत् कादंबरीकारानं या छटांची योजना केली आहे
हें करण्यांतच त्याची चतुराई म्हटली पाहिजे. एकंदर कादंबरीं
वात्सल्याचे अन् तरुणांच्या प्रणयाचे तीनच प्रसंग आहेत.
म्हणजे कादंबरीच्या पहिल्या भागातल्या मेरी व डेनिस यांच्या गु
गाठीभेटी, कादंबरीच्या शेवटींशेवटीं मेरी घरीं परत येते त्य
वेळची तिची व नेसीची भेट आणि अगदीं शेवटचं डॉक्टर रेनविक
केलेलं मेरीचं प्रियाराधन. पण हे तीनच निवडक प्रसंग इतके सुंद
साधले आहेत, कीं त्यातली एका प्रसंगाची किंमत एकेका कादंबरी
इतकी वाटते. मी तर कादंबरी संपवून हातावेगळी करतांन
नेसीच्या आत्महत्येचं वर्णन वाचून मनाचा जो विलक्षण कोंडमा
झाला होता तो दूर करण्यासाठीं या तिन्ही प्रसंगांचीं पानं उलट
पुन्हा वाचलीं! आणि या पृष्ठांवरील सर्व वर्णनांत असा मोहकपण
भरलेला आहे, कीं ब्रॉडीचा सर्वनाश वाचून उद्विग्न व शोकम
झालेल्या मनाला त्याच्या वाचनानं पुन्हा चैतन्य येतं अन् वा
लागतं, 'संसारांत केवळ अहंकाराचा गडद अंधारच नाहीं
वात्सल्याचा आणि प्रीतीचा उत्तेजक प्रकाशहि आहे!'

# भाषण सातवें

परमेश्वराची प्रार्थना करायची म्हणजे काय करायचं ? परमेश्वराला काय सांगायचं ? त्याच्याजवळ काय मागायचं ? अशा प्रार्थनेचा हेतु काय ? अन् तो सफल होण्याची खात्री असते काय ? परंपरागत धर्माचाराप्रमाणं श्रद्धेनं वागणाऱ्या सामान्य माणसाला हे प्रश्न तुम्हीं विचारले तर तो काय उत्तर देईल याची तुम्हांला खचित कल्पना करतां येईल, नाहीं का ? तो म्हणेल, कीं संसारांत आपल्याभोंवतीं जे अनेक मोह पसरलेले आहेत त्यांपासून आपलं रक्षण व्हावं म्हणून व त्या मोहांत सांपडून आपल्या हातून पापकृत्य घडलं असतां त्याविषयीं अनुताप व्यक्त करावा, चित्तशुद्धि करावी व अपराधाबद्दल भोगावं लागणारं कडक शासन टाळतां यावं म्हणून प्रार्थना करायची असते. परमेश्वराच्या कृपेची अन् क्षमेची याचना करणं हा प्रार्थनेचा मुख्य हेतु. ती करतांना माणसानं अर्थातच

आत्यंतिक नम्रता स्वीकारली पाहिजे. मी अजाण आहें, मी पापी आहें, पतित आहें, दीन, लीन आहें अशा शब्दांनींच परमेश्वराला आळविलं पाहिजे. असं केल्यानं सज्जनांवर तर परमेश्वरी कृपेचं छत्र कायम राहातंच; पण पतितांचासुद्धां उद्धार होतो. कारण परमात्मा प्रार्थनेचा फार भुकेला आहे, तो कुणाचीहि प्रार्थना ऐकल्यावांचून राहात नाहीं !

परंतु परमेश्वर खरोखरच सर्वांची प्रार्थना ऐकतो का ? कोणत्याहि नीतिनियमांचं उल्लंघन केलं नसतां, कुणाचाहि घातपात केला नसतां, कोणतंहि पापकृत्य केलं नसतां संकट कोसळावं अन् मग देवाचा कितीहि धावा केला तरी त्या संकटाचं निवारण होऊं नये असा अनुभव काय थोड्या लोकांना येतो ? अशा लोकांवर अकारण दुःखाचे हल्ले पुनःपुन्हा झाले म्हणजे त्यांची स्वतःची ईश्वर-निष्ठा तर ढासळतेच, पण शिवाय ती निष्ठा उराशीं बाळगून वागणारे भोवतालचे लोक मूर्ख असले पाहिजेत असं त्यांना वाटूं लागतं आणि ईश्वराच्या कोपाचा धाक घालून व त्याच्या कृपेचं खोटं आमिष दाखवून हजारो लोकांना मेंढ्यांप्रमाणं हाकणाऱ्या उपाध्यायांविषयीं व भटभिक्षुकांविषयीं— इतकंच नव्हे, तर एकंदर धर्मसंस्थेविषयींच ते तिरस्कार दाखवूं लागतात. त्यांना वाटूं लागतं, धर्माच्या नांवाखालीं आपमतलबी लबाडांनी एक जंगी थोतांड चालविलं आहे. नीट विचार केला तर धर्मसंस्थेमुळें मनुष्यजातीचं कोणतं हित आजपर्यंत झालं आहे ? जगांतलं वैर धर्मानं नाहीसं केलं आहे ?—छे, उलट धर्मासाठीं रक्तपात अन् युद्धं मात्र झालीं आहेत. शास्त्रीय विज्ञानाला धर्मानं हातभार लावला आहे ?—छे, उलट शास्त्रीय ज्ञानाची गळचेपी करणाऱ्या मूर्ख समजुती उराशीं जपून ठेवण्याचीच सक्ति धर्मानं केली आहे ! मग धर्म, देवळं, उपाध्याय, ईश्वरनिष्ठा, प्रार्थना या साऱ्या गोष्टी जितक्या लवकर नष्ट होतील तितका मानवजातीचा उद्धार अधिक लवकर होईल असं कां म्हणूं नये ?

पण अशा अश्रद्धेनं अन् नास्तिक्यानं ज्याचं अंतःकरण भरून गेलेलं आहे अशा माणसालाहि आयुष्यांत एखादा असा विलक्षण अनुभव येतो, कीं त्यामुळं धर्मसंस्थेविषयीं जरी त्याच्या मनांत सहानुभूति उत्पन्न झाली नाहीं तरी धर्मतत्त्वांतला खोल, शुद्ध अर्थ त्याला उमजतो व तो स्वतःशीं म्हणूं लागतो, कीं अरे, हा अर्थ फार महत्त्वाचा आहे; हा जर प्रत्येकाला कळेल तर प्रत्येकाचं आयुष्य अधिक सुखाचं झाल्यावांचून राहाणार नाहीं.

मी माझं मत म्हणून नाहीं तुम्हांला सांगत हें. एका कादंबरीकाराची आहे ही आतापर्यंत सांगितलेली विचारसरणी! अर्थात् ज्या स्वरूपांत मीं ती तुम्हांला सांगितली त्या स्वरूपांत त्यानं ती पुढें मांडलेली नाहीं. एका रम्य कथानकाच्या सहाय्यानं त्यानं ती सूचित केलेली आहे. या कादंबरीकाराचं नांव 'लॉइड डग्लस.' आधुनिक विज्ञानानं चिकित्सक बनलेल्या माणसाला जुन्या धर्मसंस्थेविषयीं आदर वाटणं शक्य नाहीं हें तर खरंच; पण प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत लोभाप्रमाणंच त्यागाचीहि प्रेरणा असते व ती ज्या वेळीं जागृत होते त्या वेळीं तो सत्यार्थानं 'धार्मिक' बनतो हेंहि खरं, हें या कादंबरीकाराचं फार आवडतं मत आहे. धर्मसंस्था नष्ट होतील–नव्हे झाल्याहि पाहिजेत; पण खरा धर्म माणसाच्या अंतःकरणांतच आहे व तो कधीं नष्ट होणार नाहीं असं लॉइड डग्लस यांना वाटतं. त्यांच्या लिखाणांत या मतांचं सूचक प्रतिपादन आढळतं. 'Green Light', 'White Banners', 'Precious Jeopardy' व 'Magnificent Obsession' या त्यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय आहेत. परंतु या सर्वांपेक्षा मला त्यांची जी कादंबरी अधिक उद्बोधक आणि लालित्यपूर्ण वाटली तिचं नांव 'Forgive us our Trespasses' (क्षमस्व!') (प्रकाशक–'लोव्हॅट डिक्सन' किंमत साडेसात शिलिंग) या नमुनेदार कादंबरीचीच चर्चा आज मी करणार आहे.

मास्तरकीची परीक्षा पास होऊन त्याबद्दलचं प्रशस्तिपत्र 'ज्यूलिआ'च्या हातीं पडलं तेव्हा तिला विलक्षण आनंद व्हावा याला तशींच कारणं होतीं. अगदी गरीब स्थितींत ती लहानाची मोठी झाली होती. तिचीं भावंडं अशिक्षित अन् खेडवळ होतीं. तिच्या बापानं दारूच्या व्यसनापायीं पैसे घालविले होते. ती लहानपणींच मातृहीन झाली होती; पण आईविषयी तिच्या मनांत आदराच्या अथवा प्रेमाच्या आठवणी नव्हत्या. उलट आपली आई म्हणजे एक मूर्ख, असंतुष्ट, तक्रारखोर स्त्री होती येवढंच तिला आठवत होतं. कुटुंबांतल्या साऱ्या माणसांची अंध धर्मश्रद्धा तर तिला अगदी कींव करण्यासारखी वाटे. सारांश, विद्याप्रीति, स्वतंत्र विचार करण्याची हौस, सौंदर्यलोलुपता इत्यादि गुणांमुळें तिला घर कोंडवाड्यासारखं वाटत असे. त्या कोंदट, रोगट वातावरणांतून बाहेर पडण्यासाठीं ती वाट शोधीत होती. ती मास्तरकीची परीक्षा पास झाली तेव्हा तिला वाटलं, आपण शोधीत होतों ती वाट आपल्याला सांपडली, आतां बाहेरच्या मोकळ्या जगांत आपलं पाऊल पडायला फार अवकाश नाहीं ! तिला मनस्वी हर्ष झाला.

तिचं दैव त्या वेळीं तिच्यावर विशेष प्रसन्न असलं पाहिजे, कारण तिला एका शाळेंत नोकरी तर लागलीच; पण त्याच सुमारास 'अॅलेक्झांडर क्रेग' नांवाच्या तरुणाचं व तिचं एकमेकांवर प्रेम जडलं. तो कांहीं ज्यूलिआच्या गावीं राहात नसे. लांब डार्टमथ येथील विश्वविद्यालयांत शिकत होता तो. त्याचा बाप लक्षाधीश होता. आपल्या मुलानं व्यापारांत शिरावं अशी त्याची इच्छा, तर उलट अॅलेक्झांडरच्या कल्पना अगदींच वेगळ्या. लेखक होण्याचे व एखादं नमुनेदार वृत्तपत्र चालविण्याचे बेत तो करीत होता. या मत-भेदामुळें बापलेकांची चांगलीच चकमक उडाली होती. आपल्या मताप्रमाणं मुलगा वागला नाहीं तर त्याला द्रव्यसहाय्य मुळींच करा-यचं नाहीं असं बाप ठरवीत होता. बापाचं सहाय्य बंद झालं तर वाटेल ती धडपड करून स्वतःच्या पायांवर उभं राह्यचं आणि

लेखक व वृत्तपत्रकार होण्याची आपली महत्त्वाकांक्षा पुरी करायची, असं ॲलेक्झांडर मनाशीं ठरवीत होता. त्यानं या साऱ्या गोष्टी ज्यूलिआला सांगितल्या; पण तिचं प्रेम त्याच्या पैशावर थोडंच होतं ? तें त्याच्या गुणांवर होतं. ज्यूलिआसारख्या गरिबाच्या मुलीशीं लग्न करायला आपला बाप आपल्याला मुळीच संमति देणार नाहीं हें ॲलेक्झांडरला पुरतं माहीत होतं; पण बाप आपल्यावर प्रथम कितीहि रागवला तरी कालांतरानं त्याचा राग आपण शांत करूं असा आत्मविश्वासहि त्याला होता. त्यानं ज्यूलिआशीं गुप्त रीतीनं विवाह केला.

आपण स्वतंत्रपणें पैसे मिळवूं लागलों व त्यानंतर आपल्या लग्नाची गोष्ट बापाच्या कांनावर घातली म्हणजे आपल्यावर त्याचा रोष व्हायचं कारण उरणार नाही व सारं कांही ठीक होईल अशी ॲलेक्झांडरला आशा होती. ज्यूलिआचं त्याच्यावर इतकं अमर्याद प्रेम होतं, की तो जें करील तें बरोबरच असलं पाहिजे अशी तिची श्रद्धा. त्याच्याशीं गुप्त विवाह करण्यांत तिला कांहीच वावगं वाटलं नाहीं. विवाहानंतर थोड्याच दिवसांनी तो डार्टमथला परत जायला निघाला तेव्हां तिनं त्याला आनंदानं निरोप दिला. तिच्या मनाची खात्री होती, की आपली व ॲलेक्झांडरची ताटातूट थोड्याच दिवसांची आहे. तो लवकरच स्वतंत्र होईल, पैसे मिळवूं लागेल, बापाचा रोष दूर करील व आपल्याला घेऊन जाईल.

परंतु ॲलेक्झांडरची वाट पाहायची मनाची तयारी करतांना जी एक गोष्ट ज्यूलिआच्या ध्यानींमनींहि नव्हती ती तो गेल्यावर कांही दिवसांनी तिच्या लक्षांत आली व ती येतांच तिच्या धैर्याला एकदम धक्का बसला. तिनं ती गोष्ट ताबडतोब ॲलेक्झांडरला कळविली; पण तो त्या वेळीं इतक्या महत्त्वाच्या उद्योगांत गुंतला होता, कीं तिच्याकडे ताबडतोब धाव घ्यावी असं त्याला वाटत असूनहि तसं करणं त्याला शक्य नव्हतं. तें शक्य होतांच तो येईल अशी आशा

' धरून त्याची वाट पाहात राहाण्यावांचून ज्यूलिआला गत्यंतर नाहीं. पण तिचे दिवस जसजसे भरूं लागले व आतां ॲलेक्झांडर र आला नाही तर आपल्या पोटीं येणाऱ्या अपत्यावर एक प्रका- कलंक कायमचा राहाणार असं तिला जसजसं स्पष्ट दिसूं लागलं. सं धीरानं दिवस काढणं तिला शक्य होऊं लागलं.

ॲलेक्झांडर अशा परिस्थितींत होता, कीं हातांतला उद्योग ' ज्यूलिआकडे आल्यानं त्याचं जन्माचं नुकसान होणार होतं. ञत असल्यामुळें त्याला लिहिलेल्या पत्रांत धैर्याची व उल्हासा- बतावणी ज्यूलिआनं केली; पण मनांतल्या मनांत ती अगदीं ा व कष्टी झाली. आपल्या गुप्त विवाहाला जाहीर जाहीर प्रतिष्ठित ा येण्यापूर्वींच आतां आपल्याला मातृपद येणार याची तिला ी खंत वाटूं लागली. आपल्या शुद्ध प्रेमवृक्षाला हीं दुर्लौकिकाचीं फळं यावींत याबद्दल तिला चीड आली. आधीच पापपुण्याच्या ावरीं न्यायाच्या सांप्रदायिक कल्पनांविषयी अनादर बाळग- ा तिच्या मनांत स्वत:वरच्या या संकटामुळे तर ईश्वराविषयी त्याच्या परमदयालुत्वाबद्दल थापा मारणाऱ्या धर्मग्रंथांविषयी ार संताप व तिरस्कार उत्पन्न झाला. तिच्या मनाला शांति वी म्हणून तिची थोरली बहीण 'मार्था' तिला बायबल वाचून वी. परंतु, 'मीं असं कोणतं पाप केलं, की त्याबल मला असं न व्हावं ? आणि ईश्वर न्यायी अन् दयाघन आहे तर त्याला ही ा दुःस्थिति कशी पाहावते ?' या प्रश्नांची उत्तरं बायबलमधल्या ग्रांच वाचनांत ज्यूलिआला सापडत नसतं व मग शांतीऐवजी व तिच्या मनांत भडकत असे.

एके दिवशीं तर मनांतला संताप अनावर होऊन तिनं बायबल ढून घेतलं आणि ईश्वराला शिव्यांची लाखोली घालीत तिनं ीं पानं भराभर टरकावून फाडून टाकलीं तेव्हाच तिच्या अंत:- ांतलं वादळ जरा शांत झालं व तिला झोप लागली. ती जागी

झाली व पाहाते तों खोलींतले ते सारे कागदाचे तुकडे कुणींतरी झाडून टाकले होते. एक लहानसा कपटा मात्र तिच्या अंथरुणावर, अगदीं तिच्या हाताशींच अजून पडला होता. तिनं तो सहज उचलला व वाचला; अन् काय चमत्कार ! त्या एका लहानशा वाक्यांत फार गहन अर्थ भरला आहे असं तिला वाटलं.

त्या अर्थाचा ती जों जों अधिक खोल विचार करूं लागली तों तों तिच्या मनांतला संताप कमी कमी होऊं लागला व तिचं अंतःकरण कांहीं एका विलक्षण समाधानानं अन् शांतीनं भरून आलं. आपल्याला जणूं धर्मतत्त्वांतलं खरं मर्म कळलं असं तिला वाटलं. आपल्या पोटीं जन्म घेणाऱ्या आपल्या अपत्याला हें आपलं रहस्य सांगितलंच पाहिजे असं तिला वाटलं. सारी शक्ति एकवटून ती अंथरुणावर उठून बसली अन् आपल्या अंतःकरणांत घडून आलेल्या क्रान्तीची हकीकत तिनं एका पत्रांत सविस्तर लिहिली. तिच्याजवळ एक सुंदर कलाकुसरीचं टेबल होतं, त्याला एक चोरकप्पा होता त्यांत तिनं तें पत्र ठेवून दिलं. एवढं केल्यावर तिला वाटलं, आपल्या अपत्यासाठीं आपण एक दस-लाखाच्या मोलाचा ठेवा ठेवला आहे, आतां त्याच्या कल्याणाची चिंता करण्याचं आपल्याला कारण नाहीं.

थोड्याच दिवसांत ज्यूलिआ प्रसूत झाली. तिला पुत्र झाला, पण ती स्वतः कालवश झाली ! त्याच दिवशीं अलेक्झांडरकडून तिला आलेल्या तारेंत त्यानं लिहिलं होतं, ' लाडके, धीर सोडूं नको. मला एक चांगला उद्योग मिळाला आहे. आतां आपल्या भेटीला थोडेच दिवस उरले आहेत ! '

ज्यूलिआचा मुलगा फर्डिनंड मार्थाच्या म्हणजे आपल्या माव-शीच्या घरीं लहानाचा मोठा झाला. मार्थाचा नवरा धर्मोपदेशक होता; पण तो मोठा चिक्कू, धूर्त, सामान्य व्यवहारी माणसासारखा लबाड होता. त्याचे ते दुर्गुण लक्षांत आल्यामुळें फर्डिनंडला लहान-पणींच वाटूं लागलं, कीं धर्म म्हणजे पोकळ बाता असून केवळ

पोटाचा धंदा म्हणूनच भटभिक्षुक परमार्थाची अन् उपासनेची चर्पट-पंजरी करीत असतात. ज्यूलिआच्या मृत्यूनंतर आपल्या मुलाला घेऊन जाण्याची इच्छा अॅलेक्झांडरनं दर्शविली होती; पण त्याचं संगोपन करण्याची विशेष उत्सुकता मार्थानं दाखविल्यामुळें त्यानं त्या गोष्टीस संमति दिली होती. एवढंच नव्हे, तर फर्डिनंडचं संगोपन व शिक्षण उत्तम प्रकारें व्हावं म्हणून तो दर महिन्याला भरपूर पैसेहि मार्थाच्या नवऱ्याकडे धाडीत असे. परंतु या सर्व गोष्टी फर्डिनंडपासून लपवून ठेवण्यांत आल्या होत्या व त्यामुळें आपल्या बापानं आपल्या आईचा घात तर केलाच; पण आपलीदेखील वास्तपुस्त केली नाहीं असा फर्डिनंडचा समज होत गेला व बापाविषयीं विलक्षण तिरस्काराची अढी त्याच्या मनांत दृढ होत गेली. आपल्या जन्माच्या वेळींच आपली आई कालवश व्हावी या गोष्टीचा तर त्याला इतका खेद होई, कीं तो असह्य होऊन त्याला वाटे, या जगांत जिकडे तिकडे अन्याय अन् दुःखच भरलेलं आहे. सारांश, पित्याविषयीं द्वेष, आप्त-स्वकियांविषयीं क्षुद्रभाव, ईश्वराविषयीं अश्रद्धा, धर्माविषयीं व जगा-विषयीं रोष अन् तिरस्कार अशा तामसी भावनाच फर्डिनंडच्या अंतःकरणांत लहानपणापासून वाढत गेल्या व तो मोठा होऊन कॉलेजांत दाखल झाला तो प्रत्येक गोष्टींविषयीं चटकन् अनादर दाखविणारा व सर्व रूढ कल्पनांवर व संस्थांवर बुद्धिवादाचे तीव्र प्रहार करणारा तरुण म्हणूनच ओळखला जाऊं लागला.

त्याच्या लॉलेजांत 'ब्रेथवेट' नांवाचे एक प्रोफेसर होते. जर्मन लोकांनी मानवी संस्कृतीच्या प्रगतिसाठीं केलेल्या विविध प्रयत्नांबद्दल त्यांना आदर होता, राष्ट्राराष्ट्रांनी परस्परांशीं युद्ध पुकारून रक्तपात करावा ही गोष्ट ते निंद्य समजत होते व सांप्रदायिक धर्मसंस्थेविषयीं त्यांना तिरस्कार वाटत असे. त्यांचीं हीं स्वतंत्र, नास्तिक मतं कॉलेजच्या मिशनरी चालकांना पटणं शक्य नव्हतं. त्यांची एकुलती एक तरुण कन्या 'जोन' हिला आपल्या पित्याच्या विद्वत्तेबद्दल एकी-कडे अमर्याद आदर वाटे. पण दसरीकडे तिला सारखी धास्ती वाटे,

कीं विनाकारण आपल्या जहाल मतांचा जाहीर उच्चार करून आपला पिता कॉलेजच्या अधिकाऱ्यांचा रोष स्वत:वर केव्हां ओढवून घेईल व नोकरी घालवून बसेल याचा नेम नाहीं ! तिनं पाहिलं तों फर्डिनंड कॉलेजांत दाखल झाल्यापासून त्याची आपल्या पित्यावर विलक्षणच भक्ति जडली आहे व फर्डिनंडच्या भक्तीनं अन् आदरयुक्त प्रशंसेनं एक प्रकारें उत्तेजित होऊन आपला पिता आपलीं मतं जाहीरपणें बोलून दाखविण्याच्या बाबतींत संयम सोडूं लागला आहे असं तिच्या लक्षांत आलं. अशानं आपल्या बापावर संकट ओढवेल हें तिला स्पष्ट दिसत होतं. फर्डिनंड तिला इतर सर्व दृष्टींनीं आवडत होता. किंबहुना तिचं त्याच्यावर प्रेमहि बसलं होतं. पण त्यानं आपल्या बापाच्या मतांना चिथावणी द्यावी हें तिला पसंत नव्हतं. तिनं आपली नापसंती बोलून दाखविली कीं तेवढ्यापुरतं तिच्या सूचनेप्रमाणं वागण्याचं फर्डिनंड कबूल करी; पण पुन्हा जाहीर चर्चेची अगर वादविवादाची संधि आली, कीं त्याच्या जिभेचा अथवा लेखणीचा पट्टा चालायचा तसाच चाले.

याचा परिणाम असा झाला, कीं ब्रेथवेट व फर्डिनंड एका बाजूस व सनातनी धार्मिक पंथाचे कॉलेजचे अधिकारी दुसऱ्या बाजूस असं बौद्धिक युद्धच सुरू झालं, व एका महत्त्वाच्या प्रसंगीं भाषण करतांना ब्रेथवेटनी जेव्हां ख्रिश्चन धर्मावर जोराचा हल्ला चढविला तेव्हा त्यांना नोकरीवरून काढून टाकण्यांत आलं. ब्रेथवेट याच सुमारास आजारी पडले व त्या दुखण्यांतच त्यांचा अंतहि झाला. जोन फर्डिनंडवर अतिशय रागावली, त्याच्याशीं चकार शब्दहि कधी बोलायचा नाहीं असा तिनं निश्चय केला. दोघं एकाच कॉलेजांत शिकत असूनहि एकमेकांचा संपर्क टाळण्याच्या धोरणानं तीं कित्येक दिवस वागलीं. पण असं किती दिवस वागतां येणार ? विशेषतः दोघांचं एकमेकांवर प्रेम असतांना ! दोघं पुन्हा एकमेकांशीं बोलूंचालूं लागलीं. एकदा जोन त्याला म्हणाली,

' डिनी, तूं ज्याच्यात्याच्याशीं उठल्याबसल्या असा भांडतोस काय म्हणून ? तुला कशाबद्दल आदर म्हणून वाटतच नाहीं का ? तुझ्या बुद्धीला ही विषबाधा कशामुळें झाली आहे ? '

फर्डिनंड तिला म्हणाला, ' जोन, खरंच माझं अंतःकरण विषानं भरलेलं आहे. अन्याय, उपेक्षा जन् दुःख यांखेरीज माझ्या वांट्याला आजपर्यंत कांहीं आलंच नाहीं अन् त्यामुळं आदर व आस्था माझ्या मनांत उत्पन्न होऊंच शकली नाहीं. मला वाटतं माझ्या आयुष्याच्या अंतापर्यंत मी जगावर असे प्रहारच करीत राहाणार ! '

' डिनी—' जोन चटकन म्हणाली, ' पण माझ्यासाठीं-तुझं माझ्यावर प्रेम आहे ना ? मग माझ्यासाठीं जरा आपलं मन आवरायला शिकशील का ? '

' होय जोन, तुझ्यासाठीं मी तसा प्रयत्न करीन ! ' असं म्हणून डिनीनं तिला बाहुपाशांत धरलं.

' खरं ? '

' खरंच ! ' त्यानं जोनला अधिकच घट्ट धरून म्हटलं व तिच्या ओठांजवळ आपले ओठ नेले.

जोन चुंबन घेऊं देईल कीं नाहीं याची त्याला खात्री नव्हती व वासनातृप्तीपेक्षां आपला अनुताप तिला पटविण्यासाठींच त्याला तें हवं होतं. म्हणून अगदी हलकेच त्यानं तिच्या ओठांवर आपलं मुख टेकल. पण त्याच्या ओष्ठस्पर्शानं जोनच्या सर्वांगांतून जणु विद्युत्‌लहरी गेल्या, अगदी खोल हृदयांतल्या भावना हालल्यामुळें तिनं दीर्घ श्वास टाकला आणि तिनं इतक्या प्रेमभरानं त्याचं उलट चुंबन घेतलं, की त्याची सुखसंवेदना डिनीला सहन करवेना.

जोनला वाटलं आपल्या प्रेमाच्या बळावर आपल्या प्रियकराच्या वृत्तींत आपण पालट करूं शकूं आणि डिनिलाहि वाटलं, कीं आपल्या जोनसाठीं आपण आपला स्वभाव सुधारण्याची प्रतिज्ञा केली तर ती आपण पाळूं शकूं.

पण या कल्पना चोवीस तासांतच खोट्या ठरल्या. कॉलेजांतल्या वाङ्मयमंडळाच्या एका सभेंत एका वक्त्यानं प्रो. ब्रेथवेटच्या मतांवर खूप ताशेरा झोडला. या गृहस्थाला डिनीनं पुष्कळदां बजावलं होतं, की ब्रेथवेटबद्दल अनुदारपणाचे उद्गार काढशील तर खबरदार ! एकदा तर माराची धमकीहि त्यानं त्याला दिली होती. इतकं होऊनहि जेव्हा त्या वावदूकानं हें व्यक्तिनिंदेनं भरलेलं भाषण केलं तेव्हा डिनी संतापला आणि या खेपेला त्यानं उलट भाषण केलं नाहीं. रात्रीं त्या गृहस्थाला त्यानं बेदम मारून काढलं.

या प्रकारानं कॉलेजांत मोठी खळबळ उडाली. डिनीला कॉलेजांतून काढून टाकण्यांत आलं. जोनच्या प्रेमाला तर तो कायमचा पारखा झाला !

यानंतर डिनीनं प्रवास केला, सैन्यांत नोकरी केली, वृत्तपत्रांत खरमरीत टीकालेख लिहिण्याचा उद्योग केला, पण कांहीं केल्या त्याला जोनचा विसर पडेना. मध्यंतरीं तिच्याकडून आलेल्या एका पत्रावरून ती न्यूयॉर्क शहरीं असेल अशी त्याला आशा वाटली म्हणून तो तिकडे गेला; पण तिचा शोध लावण्याचे त्याचे सारे प्रयत्न व्यर्थ गेले. अखेर त्यानं एक गमतीदार युक्ति केली. बरोबर जोनलाच लागूं पडेल असं वर्णन लिहून 'सेक्रेटरी पाहिजे' अशी जाहिरांत त्यानं वर्तमानपत्रांत दिली. तिचा उपयोग लवकर नाहीं, पण कांहीं दिवसांनीं झाला. जोनचं पत्रं आलं. एखाद्या जागेसाठीं अर्ज केल्यासारखंच तें पत्र लिहिलेलं होतं. पण आपण डिनीची जाहिरातीची लबाडी ओळखली हें दाखविण्यासाठीं 'महाराज' अशा मायन्यानं सुरू केलेल्या त्या पत्राच्या शेवटीं जोननं ताजा कलम लिहिला होता— 'डिनी, मला खरंच नोकरीची फार गरज आहे रे !'

जोन न्यूयॉर्कला आली. स्वतःच्याच लेखनाच्या कामांत तिला मदतनीस म्हणून घेऊन पगार द्यायचा डिनीनं बेत केला होता;

पण जोनला ती गोष्ट पसंत पडेना. मग टॉमी फांसोइद नांवाच्या आपल्या एका मित्राकडची नोकरी त्यानं तिला मिळवून दिली.

डिनी व जोन आता एकमेकाला दिवसाकाठीं वारंवार भेटूं लागलीं. सुटी असली की सारा दिवसच्या दिवस तीं एकत्र घालवूं लागलीं. मध्यंतरी तुटलेला त्यांच्या प्रेमाचा दुवा पुन्हा सांधला गेला! पण डिनींचं प्रियाराधन जोनला अतिशय सुखकारक होत असतांहि त्याच्या पर्यवसानाला तिचं मन थोडं घाबरतच होतं. एकदा डिनींनं तिच्याजवळ विवाहाची गोष्ट काढली तेव्हां ती म्हणाली, ' माझ्यासुद्धा मनांत विवाहाचे विचार कधी कधी येतात; पण पुन्हा वाटतं, नको. तुझ्यामाझ्या स्वभावधर्मात इतकं मोठं अंतर आहे, की आपला विवाह सुखाचा होईल अशी खात्री वाटत नाहीं. मला जगांत राहावंसं वाटतं, मला जग आवडतं, जगाविषयी माझ्या अंतःकरणांत जिव्हाळा आहे; उलट तूं जगाशीं सतत लढाई करायला उत्सुक आहेस.'

' जोन, हा एवढासा मतभेद तुला दृष्टिआड नाहीं का करतां येणार ? माझं तुझ्यावर अपरिमित प्रेम आहे ग!'

त्याच्या खांद्यावर आपलं मस्तक टेकीत जोन म्हणाली, ' तें मला माहीत आहे.'

डिनींनं तिला हलकेच विचारलं, ' अन् जोन, तुझं प्रेम आहे ना माझ्यावर ?'

' होय, डिनी, तुझ्यावर इतकं प्रेम आहे माझं की तुझा पूर्ण सहवास एकदा मिळाल्यावर मग जर त्याला मुकायची पाळी आली तर माझा प्राण कांहीं राहायचा नाहीं!'

' जोन, माझ्या स्वभावांतला दोष दूर करण्याचा मी प्रयत्न करीन.' डिनी अगदीं मनःपूर्वक म्हणाला.

' तसं करशील तर किती बरं होईल!'

डिनीनं तिचं चुंबन घेतलं तों तिचे गाल आसवांनीं ओले झाले होते, तिची भावनोत्कटता पाहून डिनीचं अंतःकरण भरून आलं. जोननं त्याचं दीर्घ चुंबन घेतलं व मग त्याच्या कुशींत आपलं मुख ठेवीत, कापरा श्वास सोडीत ती पुन्हा म्हणाली,

'डिनी, मला अंतर देऊं नकोस हं ! माझं तुझ्यावर किती प्रेम आहे हें तुला कळलं आहे !'

इतकं झाल्यावर तरी डिनीच्या स्वभावांत बदल व्हायचा होता ! पण त्याच्या हृदयांत जन्मापासून भिनलेलं विष इतक्या सहजासहजी कुठलं जायला ? जोनचा सल्ला न घेतां 'हलेलुजा' नांवाच्या एका वर्तमानपत्राचं संपादकत्व त्यानं पत्करलं. कमालीचं शिवराळ अन् पांचट म्हणून हें वर्तमानपत्र प्रसिद्ध होतं. असल्या अप्रतिष्ठित, वावदूक पत्राच्या संपादकाचं काम डिनीनं पत्करलेलं पाहून जोनला परमावधीचं दुःख झालं. एखाद्या स्त्रीवर कितीहि प्रेम असलं म्हणून ज्या तऱ्हेचं लेखन आपल्याला साधतं व प्रिय आहे तें का तो तिच्यासाठीं सोडील, अशा बोलण्यानं डिनी तिची समजूत घालूं लागला तेव्हां तर तिचा अगदीं मर्मभेदच झाला व तिला रागहि आला. दोघांचं चांगलंच भांडण झालं. दोघं प्रेमानं जितकीं जवळ आलीं होतीं तितकींच आपले स्वभावधर्म जुळणं शक्य नाहीं अशा निराशेनं दूर झालीं. कांहीं दिवस प्रवासांत घालवायचं डिनीनं ठरवलं अन् त्याप्रमाणें तो निघून गेला.

प्रवासांत डिनीचं मन थोडंसं अंतर्मुख झालं, त्याच्या मनांत थोडासा पालट होऊं लागला. सगळ्याच गोष्टींकडे अनादरानं पाहाण्यांत आपली कदाचित चूक होत असेल असं त्याच्या मनांत येऊं लागलं. तो प्रवासाहून परत आला तो अशा निश्चयानं कीं जोनला भेटायचं अन् तिला म्हणायचं—

पण तो न्यूयॉर्क शहरीं परत आला तों जोन तिथं होती कुठं ? ज्याच्याकडे ती नोकरीला होती तो टॉम फॉसाइद युरोपच्या प्रवासाला

निघून गेला होता. जोन कुठं गेली होती. तें कुणालाच माहीत नव्हतं. डिनीला साहजिकच वाटलं, कीं तीं दोघं मिळून गेलीं असलीं पाहिजेत अन् त्यांचं लग्न ठरलं असलं पाहिजे.

आता जोनच्या प्रेमाला आपण कायमचे मुकलों याबद्दल डिनीला संशय राहिला नाही. त्याला मनस्वी दुःख झालं. निराशेनं आणि विषण्णतेनं त्याचं अंतःकरण भरून गेलं. त्याचा सारा उत्साह पार मावळला. तो अगदीं हताश झाला !

तो अशा मनःस्थितींत असतांना आपल्या लिहिण्याच्या टेबलाला चोरकप्पा आहे हें एके दिवशीं त्याच्या लक्षांत आलं अन् त्यानं तो कप्पा उघडून पाहिला तेव्हां ज्यूलियानं मरणसमयीं लिहून ठेवलेलं पत्र त्याला सापडलं.

तें पत्र खूप मोठं होतं. त्यांत ज्यूलियानं आपल्या मानसिक क्रांतीची इत्थंभूत हकीकत लिहून ठेवली होती. जगाविषयींच्या विद्वेषानंच आपलं अंतःकरण कसं भरलेलं होतं, ईश्वराविषयीं अन् धर्माविषयीं आदराचा व श्रद्धेचा लवलेशहि आपल्या अंतःकरणांत कसा नव्हता, संतापाच्या भरांत आपण बायबलचीं पानं कशीं टराटर फाडलीं आणि मग एका लहानशा कपटयावरचं एकच वाक्य वाच-तांच आपल्या विचारांना नवी दिशा कशी लागली व धर्मतत्त्वांचा नवीनच अर्थ मनांत येऊन आपल्याला शांति कशी लाभली—या सर्व गोष्टींचं अगदीं सविस्तर वर्णन ज्यूलियानं त्या पत्रांत केलं होतं. तिनं लिहिलं होतं—

‘परमेश्वराची प्रार्थना करून ‘क्षमस्व’ असं जेव्हा आपण त्याला म्हणतों तेव्हां तो म्हणजे कोणी एक उच्च सिंहासनावर बस-लेला न्यायदाता आहे अशी समजूत ठेवणं चुकीचं आहे. ही मूर्ख, दुबळी समजूत पसरविणारा धर्म पोकळ आणि खोटा आहे. प्रार्थ-नेच्या अन् क्षमेच्या तत्त्वाचा अर्थ अगदीच निराळा आहे. ‘मला क्षमा कर,’ असं जेव्हां आपण देवाला विनवितों तेव्हां आपण अशी

कल्पना करायची, की जणू कांहीं देव आपल्याला उलट म्हणतो, 'हें बघ, मी तुला क्षमा करीन; पण ती एका अटीवर. ज्यांनीं ज्यांनीं तुझा कांहीं अपराध केला आहे व ज्यांच्या ज्यांच्यावर तुझा राग आहे त्या सर्वांना क्षमा करायला तूं तयार आहेस?' म्हणजे क्षमेचा एकंदर प्रकार एखाद्या व्यावहारिक सौदासारखा आहे. अन् बला म्हणावं, तूं मला ऋणमुक्त कर. त्यावर बनं सांगावं, कीं जीं माणसं तुझ्या ऋणांत आहेत त्यांना तूं ऋणमुक्त केलंस तर मी तुला करतों अन् अनं ही गोष्ट कबूल करतांच कुणाच्याच डोक्यावर कुणाचंच ऋण राहूं नये आणि सारींच माणसं एकदम मुक्त व्हावींत अशापैकींच हा क्षमेचा व्यवहार आहे. क्रोधाच्या तत्त्वावर जग चालणं शक्य नाहीं. क्षमेच्या तत्त्वावरच तें चालेल. म्हणून केवळ चित्त-शुद्धीच्या हेतूनं प्रार्थना करायला माणसं शिकतील तर...'

अशा विवेचनानं भरलेलं आपल्या मृत मातेचं पत्र डिनीनं अगदीं लक्षपूर्वक वाचलं व त्याचा त्याच्या मनावर मोठा परिणाम झाला, ज्या प्रक्षुब्ध मन:स्थितींत ज्यूलिआनं बायबलचे तुकडे तुकडे केले होते त्याच मन:स्थितींत डिनी असतांना तिचं तें पत्र त्याच्या हातीं अकल्पितपणें आलं होतं, व त्यामुळें त्यांतली विचारसरणी तापलेल्या जमिनींत बीं सहज रुजावं तशी त्याच्या मनांत खोल शिरली. शांतीचा आणि समाधानाचा जो मार्ग आपल्या मातेनं आपल्या त्या पत्रांत दर्शविला होता त्या मार्गानं प्रत्यक्ष जाऊन पाहिल्यावांचून तिच्या त्या उपदेशाचा अव्हेर करणं तरी आपल्याला शक्य नाहीं असं त्याला वाटूं लागलं आणि अखेर त्यानं निश्चय केला, कीं ज्यांना ज्यांना आपण आजपर्यंत आदरानं अगर द्वेषबुद्धीनं दुखविलं त्यांची त्यांची क्षमा मागून आपल्या मनांतलं विष नाहींसं करायचं.

या निश्चयानुसार तो प्रथम आपल्या मावशीच्या घरीं गेला आणि तिथं तिला व तिच्या नवऱ्याला त्यानं सांगितलं, 'तुमच्या-विषयीं माझ्या मनांत पुष्कळ वाईट गोष्टी होत्या; पण त्या सगळ्या

मी आतां विसरलों आहे. तुमच्या मनांत माझ्याविषयीं अढी असेल तर तुम्हींहि ती सोडा. क्षमस्व.'

नंतर तो आपल्या कॉलेजांत गेला व पूर्वी तिथें अभ्यास करीत असतांना ज्या ज्या व्यक्तींशीं त्यानं वैर केलं होतं त्यांची गांठ घेऊन त्यांना म्हटलं, 'क्षमस्व' इतकंच नव्हे, तर तो आपल्या बापाकडेहि गेला व त्याला म्हणाला, 'तुम्ही माझ्या आईचा घात केलात व माझा त्याग केलात अशा समजुतीनं मीं आजपर्यंत तुमच्याशीं शत्रुत्व केलं; पण यापुढं मला तें करायचं नाहीं. मला तुमच्याकडून दुसरं कांहींच नको आहे. फक्त क्षमस्व म्हणण्यासाठीं मी तुमच्या भेटीला आलों आहे.'

क्षमायाचनेच्या या प्रयोगांनीं मनःशांतीचा व मानसिक सामर्थ्याचा आपल्याला लाभ झाला असं त्याला वाटलं व आपल्या आईच्या त्या पत्रांतल्या धर्मचिकित्सेवर त्याची श्रद्धा बसली, मात्र त्याच्या मनांत आलं, आपण इतर सर्वांशीं समेट केला; पण जोनशीं कुठं केला? तिनं तर आपल्यावर अतिशय प्रेम केलं होतं व अर्थात आपल्या हेकेखोर, विद्वेषी स्वभावामुळें जर कुणाला सगळ्यांत अधिक दुःख झालं असेल तर तिलाच, आतां तिचं प्रेम परत मिळविणं आपल्याला अशक्य आहे. एव्हाना टॉम फॉर्साइदशीं तिचं लग्न लागलं देखील असेल. पण तिची प्रीति नसली तरी तिची क्षमा तर आपल्याला मागतां येईल! आपल्या वृत्तींत घडलेला पालट तिला आपण सांगितला व तिला खरा वाटला तर आपल्याविषयींचं तिचं मत तर निवळेल! जोनचं आपल्याविषयीं चांगलं मत झालं तर तें काय लहानसहान समाधान आहे!' जोनची भेट घेतलीच पाहिजे...

टॉम फॉर्साइद प्रवासांत कुठेकुठे किती मुक्काम करणार आहे त्याची माहिती डिनीनं त्याच्या ऑफिसांतून मिळवली व पॅरिस शहरीं तो व जोन या सुमारास असतील अशा समजुतीनं त्यानं ताबड-तोब तिकडे प्रयाण केलं. पण तिथं जाऊन तो पाहातो तों जोन टॉम-

बरोबर कुठं होती ? ती कुठं गेली असावी याची टॉमला कल्पनाही नव्हती. डिनी आश्चर्यचकित झाला. जोननं टॉमबरोबर लग्न करायचं ठरवलं असावं ही त्याची शंका अगदीं खोटी ठरली होती. इतकंच नव्हे, तर टॉमनं त्याला पुनः पुन्हा आश्वासन दिलं, की 'जोनचं तुझ्यावर अजूनहि निस्सीम प्रेम आहे.' हें कळल्यावर डिनीची कशी धांदल उडाली तें काय विचारावं ! इकडे तारा, तिकडे तारा अशी धडपड करून त्यानं अखेर एवढी माहिती मिळविली, की जोन अमेरिकेंतच आपल्या चुलत्याच्या घरीं आहे. हें कळतांच डिनीनं पुन्हा अमेरिकेस परत धाव घेतली. ज्या दुकानांत ती काम करीत असे तिथं तो गेला; पण त्याला ती भेटली नाही. तिच्या बिन्हार्डीं त्यानं टेलिफोन केला तों ती घरींहि नव्हती. मग आपण आल्याबद्दलचा निरोप ठेवून तिच्या बोलण्याची वाट पाहात तो आपल्या हॉटेलांत बसला. बऱ्याच वेळानं जोनचं पत्र आलं, पण त्यांत तिनं लिहिलं होतं—

प्रिय डिनी,

आपण एकमेकांना पुष्कळ मनस्ताप दिला आहे आजपर्यंत, अन् दुःखावांचून आपण एकमेकांना दुसरं कांहींच देऊं शकणार नाहीं असं मला वाटतं. मी सुखी आहें अशी प्रतारणा मी कशाला करूं ? पण मी स्वतःमागं उद्योग लावून घेतला आहे अन् तो मला आवडतो. एकमेकांना न भेटण्याचं आपण ठरविलं तें कांहीं सुखासुखी नाहीं; पण एकदां जो निश्चय केला तो पाळण्यांतच आपल्या दोघांचंहि हित आहे. तुझी भेट घ्यावी असं मला किती किती वाटतं; पण तो विषय आतां पुन्हा नको. माझं मन वळविण्याचा प्रयत्न करूं नकोस. आपल्या उभयतांच्या कल्याणाची गोष्ट कोणती याबद्दल माझी कुठल्याच बाबतींत नसेल इतकी खात्री आहे.'

तें पत्र वाचून डिनी दुःखानं गांगरून गेला; पण बराच वेळ विचार केल्यावर त्यानं पुढीलप्रमाणें पत्र लिहिलं.

' जोन प्रियतमे !

'हलेलुजा'च्या संपादकाशीं पुन्हा स्नेह करायला मी तुला सांगत नाहीं. तुला खरं वाटायचं नाहीं कदाचित्; पण त्या साऱ्या गोष्टी मीं अजिबात सोडून दिल्या आहेत. माझा पुनर्जन्म झाला आहे अन् मी चालायला शिकत आहे असंच समज. माझा तोल संभाळण्यासाठीं तुझा आधार मला हवा आहे. अन् तुझ्यावर माझं कल्पनातीत प्रेम आहे !

माझ्या आईनं लिहून ठेवलेलं पत्र सोबत धाडलं आहे तें नीट वाच अन् त्या पत्रांतलं तत्त्वज्ञान मीं आचरणांत आणलं आहे हें ध्यानांत घे, म्हणजे मी किती बदललों आहें तें तुला समजेल !'

डिनीच्या या पत्राचा योग्य तो परिणाम झाला.

जोन त्याच्या भेटीला ताबडतोब आली. तिनं त्याच्या प्रेमाचा स्वीकार केला अन् मग दुसऱ्याच दिवशीं दोघांचा विवाह झाला !

'क्षमस्व' कादंबरीच्या या कथानकाबद्दल तुम्ही विचार करूं लागलांत, कीं पहिली गोष्ट तुमच्या ध्यानांत येईल ती ही, कीं रचनेचा चमत्कार यांत फारसा नाहीं. अनपेक्षित घटना घडवून आणून वाचकांचं चित्त पकडून ठेवण्याची खटपट लेखकानं विशेष केलेली नाहीं. रचनाकौशल्याच्या नादाला तो दोनच बाबतींत लागलेला दिसतो. त्यापैकीं पहिली म्हणजे ज्यूलिआची करुणास्पद अवतारसमाप्ति, आणि दुसरी म्हणजे डिनीच्या हातीं पडणारं ज्यूलिआचं पत्र तीस वर्षं गुप्त राहणं ज्यामुळं शक्य झालं तें चोरकप्याचं टेबल. या दोन्ही युक्त्या पाहाण्यासारख्या आहेत. विशेषतः डिनीच्या अंतःकरणांतील विषादाचा, द्वेषाचा व निराशेचा अग्नि धुमसून धुमसून कमालीचा भडकलेला दाखवून मग त्या निकराच्या ऐन घटकेला ज्यूलिआच्या पत्रानं जलसिंचन घडविण्यांत लॉईड डग्लस यांनीं

जी गंमत साधली आहे ती फार मार्मिक वाटते. परंतु येवढं म्हटलं, कीं कादंबरीच्या कथारचनेची प्रशंसा संपली. अनिश्चितता व उत्सुकता साधण्यासाठीं डिनी आणि जोन यांची भेट, ताटातूट, पुन्हा भेट, पुन्हा ताटातूट अशी योजना लेखकानं केली आहे खरी; पण ती कौशल्यपूर्ण नाहीं. कादंबरीकाराच्या लहरीखातर त्या दोघांचा चाललेला हा लपंडाव कृत्रिम वाटतो. परंतु असं असूनहि रसहानि झाल्यासारखं वाचकाला वाटत नाहीं, याचं कारण काय ? याचं कारण उघडच हें, कीं या कादंबरीचा मुख्य रस तिच्यांतील घटनांच्या चमत्कारापेक्षां स्वभावरेखाटनावर अवलंबून आहे व तें रेखाटन शक्य तेवढ्या कौशल्यानं करण्याची लेखकानं काळजी घेतलेली आहे.

भोळ्या आणि आंधळ्या वृत्तीच्या ईश्वरपूजेच्या तत्त्वावर आधारलेला धर्म आजच्या ज्ञानयुगांत कुणाचंहि खरं समाधान करूं शकणार नाहीं. पण बुद्धिवादी माणसानं प्रार्थनेंतल्या तत्त्वाबद्दल नीट विचार केला तर त्यालाहि त्यांत उपयुक्त मर्म मात्र सापडण्या-सारखं आहे असं 'क्षमस्व' या कादंबरीच्या द्वारें लॉईड डग्लस यांना सांगायचं आहे. विषय किती रुक्ष अन् अवघड ! पण चतुर लेखक असला विषयसुद्धां कौशल्यपूर्ण स्वभाववर्णनाच्या साहाय्यानं मनोरंजक करूं शकतो ! लॉईड डग्लस यांनीं डिनीच्या जन्मसिद्ध स्वभावाची जी कल्पना केली आहे ती कुणालाहि पटावी म्हणून त्याच्या आईची करुण कहाणी त्यांनीं आधी सांगितली आहे. ही कहाणी म्हणजे मुख्य कथानकाचं पूर्वसूत्र आहे व तें वाचल्यानंतर डिनीचं चरित्र वाचूं लागलं, कीं कादंबरीकारानं त्याची जी विलक्षण द्वेषमय, संतापी, जळफळणारी मूर्तिभंजक वृत्ति कल्पिलेली आहे ती मनाला एकदम पटते. सबंध कादंबरींत डिनी व जोन हीं दोनच प्रमुख पात्रं आहेत व त्यांचे स्वभाव रंगविण्यांत लेखकानं अतिशय चातुर्य तर दाखविलं आहेच; पण शिवाय दोघांच्या वृत्तींतल्या मूलभूत भेदाचा मोठा खुबीदार उपयोग करून घेतला आहे. कसा तो पाहा—

कुठल्याहि कादंबरींत चित्तवेधकता केव्हां येते, तर तिच्यांत कसल्या तरी झटापटीचं वर्णन असेल तेव्हां. अन् ही झटापट केव्हां निर्माण होते ? तर कादंबरीच्या नायकाच्या अगर नायिकेच्या मनोरथांना अडथळा करणारी व्यक्ति, शक्ति अथवा परिस्थिति असते तेव्हां. व्यक्तिव्यक्तींतला विरोध कादंबरींत वर्णिलेला असला, कीं त्या समरप्रसंगाला अगदीं स्थूल व उत्तान स्वरूप येतं व अगदीं सामान्य वाचकाचंहि चित्त त्यांत सहजासहजीं रमतं. मी ज्या कादंबऱ्यांविषयीं तुमच्याजवळ आतांपर्यंत चर्चा केली त्यांतल्या 'Closed Frontiers' व 'No Pasaran' या दोन कादंबऱ्या या जातीच्या म्हणतां येतील. कांहीं कादंबऱ्यांतल्या समरप्रसंगांचं स्वरूप वेगळं असतं. व्यक्तीव्यक्तींतला नव्हे, तर व्यक्ति व परिस्थिति यांतील विरोध त्यांत दाखविलेला असतो. त्यांतल्या प्रधान व्यक्तीला कांहींतरी हवं असतं. पण जें हवं तें मिळविण्याच्या मार्गात परिस्थितीची मोठी भिंत उभी असते. 'We are not alone' ही कादंबरी आठवते आहे कीं नाहीं तुम्हांला ? ती या प्रकारची समजतां येईल. अशा कादंबरींतला समरप्रसंग सूक्ष्म असल्यामुळें तो रंगविणं जरा बिकट असतं. याहूनहि लेखकाचं काम अधिक बिकट करणारी समरप्रसंगाची आणखी एक तिसरी तऱ्हा आहे. ती म्हणजे व्यक्तिव्यक्तींतलीहि नव्हे अन् व्यक्ति-परिस्थितीमधलीहि नव्हे, तर व्यक्तीच्या स्वभावांतल्या भिन्न छटांमधलीच झटापट. हा समरप्रकार बहुतांशीं मनोगत असल्यामुळें अतिशय सूक्ष्म प्रकृतीचा असतो व तो रंगविण्यास लेखकाच्या ठिकाणीं जितकी नाजुक सहृदयता तितकीच असामान्य वर्णनशैली असावी लागते. मात्र हे गुण लेखकाजवळ असले म्हणजे केवळ मनोगत अशा त्या सूक्ष्म समरप्रकाराची जी कथा तयार होते तिची गोडी काय वर्णावी !

'क्षमस्व !' कादंबरींत ही अपूर्व गोडी आहे. तिच्यांतील झटापट व्यक्तीव्यक्तींमधलीहि नाहीं किंवा व्यक्ति व परिस्थिति यांच्यांतलीहि नाहीं. दोन व्यक्तींच्या स्वभावांतल्या अंतरामुळें ती उत्पन्न

झालेली आहे. या कादंबरीच्या द्वारें ज्या विषयाचं प्रतिपादन लेखकाच्या मनांत करायचं आहे तो जरी कांहींसा गंभीर प्रकृतीचा असला तरी कादंबरीचा गाभा पाहिला तर ती एक मनोहर प्रेमकथाच आहे. डिनी व जोन यांची पहिली भेट, त्यांचे प्रेमप्रलाप, त्यांचीं भांडणं, त्यांच्या ताटातुटी अन् अखेर त्याचं कायमचं मीलन अशा वळणांनीच प्रतिपाद्य विषयाचा व कथेचा ओघ वाहत असलेला आपल्याला दिसतो. परंतु ठरीव साचाच्या प्रेमकथांपेक्षां ही प्रेमकथा श्रेष्ठ दर्जाची कां म्हणायची, तर तिच्यांतल्या समरप्रसंगांच्या सूक्ष्म व कलापूर्ण जातीमुळें !

डिनी व जोन एकमेकांवर अनुरक्त होतीं, मग त्यांचा विवाह लगेच कां झाला नाहीं ? त्यांच्या विवाहाला विरोध कुणाचा होता ? वडील माणसांचा ? नाही. जातिभेदाचा अथवा धर्मभेदाचा ? नाहीं. वयाच्या किंवा सांपत्तिक स्थितीच्या विषमतेचा ? छे ! लेखकानं या साऱ्या ठराविक युक्त्या दूर ठेवल्या आहेत व त्या दोघां प्रेमिकांच्या मनोवृत्तींतच इतका जबरदस्त विरोध दाखविला आहे, कीं तो नष्ट झाल्यावांचून त्यांचा विवाह घडून आला नाहीं हें वाचकाला सहज पटावं. जोन एकदा डिनीला म्हणते तें अगदीं खरं, कीं ' तूं जगावर संतापलेला आहेस, मला जगाविषयीं प्रीति वाटते. तुला आदर कसा तो कुणाबद्दल वाटत नाहीं, मला कित्येक व्यक्ति व संस्था आदरणीय वाटतात. तुझं अंतःकरण द्वेषानं भरलेलं आहे, माझं आस्थेनं अन् जिव्हाळ्यानं भरलेलं आहे. तुला जगावर प्रहार करावेसे वाटतात, मला जगाविषयीं अगत्य अन् आपलेपणा वाटतो. ' दोघांच्या स्वभावांतील हा विरोध जितका सूक्ष्म तितकाच मनोज्ञ असल्यामुळें त्यावर आधारलेली प्रेमकथा नाविन्यपूर्ण व विशेष आल्हादकारक वाटल्यावांचून राहील काय ? व केवळ प्रीतीच्या बळावर विवाहित आयुष्य सुखाचं होण्यासारखं नसून ज्यांच्या स्वभावधर्मांत व मनोवृत्तींत पूर्ण संवाद आहे अशा प्रेमिकांनीच आपल्या अनुरागाला विवाहाचं स्वरूप द्यावं, ही जोनची विचारसरणीदेखील मोठी बोधप्रद नाही काय ?

डिनी व जोन यांच्या मनोवृत्तींत पूर्ण विरोध कल्पिल्यामुळे त्यांच्या भावनांचीं किती मनोहर आंदोलनं लेखकाला निर्माण करतां आलीं आहेत तें ध्यानांत घ्या. एकीकडे डिनीचं अंतःकरण जोन-विषयीच्या प्रेमानं उचंबळत होतं तर दुसरीकडे त्याचा कडवटलेला, विद्रेषी स्वभाव कितीहि दाबला तरी वर डोकं काढीत होता. अन् जोनचीहि अशीच द्विधा अवस्था झाली होती ना ? डिनीवर तिचं मन जडलं होतं, एकीकडे ती त्याच्या प्रीतीसाठीं उत्सुक होती, त्याचं चुंबन तिला उन्मादक वाटत होतं, त्याचा बाहुपाश परमसुखाचा वाटत होता; पण दुसरीकडे तिचा जागृत विवेक तिला पुनःपुन्हा मागं ओढून बजावीत होता, ' संभाळ, डिनीशीं विवाह करशील तर स्वतः दुःखी होशील अन् त्यालाहि दुःखांत लोटशील ! '

डिनी व जोन यांच्या मनःस्थितीच्या असल्या भिन्नभिन्न छटा लॉइड डग्लस यांनी फारच हलक्या हातानं रंगविल्या आहेत. त्यांच्या भाषेचा व वर्णनशैलीचा लवचीकपणा अभ्यास करण्यासारखा आहे

ज्यूलिआनं मरणसमयीं लिहून ठेवलेलं पत्र वाचतांना वाच-काच्या डोळ्यांपुढं मूर्तिमंत ज्यूलिआ उभी राहाते. कादंबरीकाराचं त्याला भानहि राहात नाहीं इतकं तें बेमालूम साधलं आहे. डिनी ज्या कॉलेजांत शिकतो तिथल्या विद्यार्थ्यांच्या जीवनाचीं चित्रं रेखाट-तांना लेखकाची भाषाशैली वर्ण्य विषयाला साजेशी खवचट अन् दांडगी बनलेली आहे. डिनीच्या मनांतली धर्मविषयक विचारांची गर्दी, तितक्याच गंभीर भाषेंत सांगितली गेली आहे. प्रारंभीच्या प्रकरणांत ज्यूलिआची प्रेमकहाणी सांगतांना किती सहृदय शैलीनं प्रेमांत सापडलेल्या त्या निष्कपट तरुणीची मुग्धता व्यक्त केली गेली आहे ! डिनी व जोन यांच्या गाठीभेटींचीं वर्णनं अन् त्यांचीं संभाषणं आलीं, की लेखकाच्या लेखणींतून नवयौवनांतल्या उत्कट प्रेमाला योग्य असे लाघवी शब्द पाझरूं लागतात. विरहकालानंतरच्या पुनर्मीलनाची प्रतीक्षा प्रेमिकाच्या अंतःकरणाची जी तारांबळ उडवून

देते तिचं वर्णन वेचक शब्दांनीं करण्यांत तर लॉइड डग्लस यांचा अगदीं हातखंडा आहे. वर्तमानपत्रांत 'सेक्रेटरी पाहिजे' अशी जाहिरात देण्याची डिनीची युक्ति यशस्वी होऊन जोन न्यूयॉर्कला आली तेव्हां तिला आणण्यासाठीं स्टेशनवर गेलेल्या डिनीचं पुढील वर्णन ऐका—

'गाडी साडेसहा वाजतां यायची होती; पण डिनी सहा वाजतांच स्टेशनवर गेला अन् धडधडत्या अंतःकरणानं इकडे तिकडे हिंडूं लागला. वेळ जाईना तेव्हा स्टेशनांत जाहिरात म्हणून मांडून ठेवलेल्या काचेच्या कपाटांतल्या वस्तु त्यानं न्याहाळून पाहिल्या. जोन भेटल्यावर तिला देण्यासाठीं भारी किमतीचा चॉकोलेटचा डबा विकत घेतला आणि एक ताजं वर्तमानपत्र घेऊन त्याचीं पानं चाळून पाहिलीं. सव्वासहा वाजले तेव्हा तो प्लॅटफॉर्मवर गेला. साडेसहाला पांच मिनिटं उरलीं, चार मिनिटं, तीन, दोन, तसतसे त्याच्या हृद-याचे ठोके घाईनं पडूं लागले. अधीरतेनं गुदमरल्यासारखं त्याला झालं. शेवटीं गाडी स्टेशनांत आली अन् माणसं डब्यांतून उतरूं लागलीं. जोन कुठं आहे? ...ती पाहा. जरा श्रमल्यासारखी दिसली ती. डिनीला पाहतांच एकदा ओठ जुळवून तिनं असं कांहीं हास्य केलं, की त्यांत लाडकेपणा तर होताच, पण 'स्टेशनावर यायची तसदी कशाला घेतलीस? अस्सा वेडा आहेस तूं!' अशी प्रेमळ तक्रारहि होती. जवळ जाऊन डिनीनं आपले हात पुढं करतांच जोननं आपले दोन्ही हात प्रेमभरानं त्याच्या हातीं दिले व मान वर करून लाघवी नजरेनं त्याच्याकडे पाहून घेतलं......!'

किती सुंदर वर्णन आहे हें!

त्याचप्रमाणें जोनचा रुकार मिळविण्यासाठीं ज्यूलिआचं पत्र तिच्याकडे धाडून स्वतःच्या स्वभावांत घडून आलेल्या क्रांतीबद्दल तिला डिनी कळवितो आणि आता जोन काय उत्तर देईल तें खरं, अशी काळजी करीत कसाबसा झोपीं जातो त्यानंतरची हकीकत ऐका—

"पहाटे तो दचकून जागा झाला तो टेलिफोनच्या खणखणाटानं. तो जागा होण्यापूर्वी किती वेळ ती घंटा वाजत होती कुणास ठाऊक?

कुणीतरी आपलीं आर्जवं करीत आहे, गळ घालीत आहे, कांहीं तरी करण्याबद्दल धाकसुद्धां दाखवतं आहे अशीं तुटक तुटक स्वप्नं त्याला पडत होतीं, त्यांतच त्याच्या एका मनानं घंटेचा तो खणखणाट ऐकला असला तर कोण जाणे! अर्धवट झोपेंतच त्यानं टेलिफोन कानाला लावला—

'डिनी!' जोनचाच शब्द होता तो. अगदी हळू अन् सद्‌गदित.

'लाडके, मीच!'

'डिनी, मला उजाडेपर्यंत धीर नाहीं धरवणार!'

'मग ये ना इकडे तावडतोब!'

'अशा पहाटेच्या वेळीं मी तुझ्याकडे आलें तर तें भयंकर चमत्कारिक दिसणार नाहीं का? लोकांना काय वाटेल?'

'मरूं देत लोक!...जोन!...लाडके, ये ना!'

बराच वेळ थांबून जोन म्हणाली, 'ठीक आहे. येतें अर्ध्या घटकेंत.'

पोषाख करतां करतां डिनी खुशाल मोठमोठ्यांदा हंसत होता. जणू त्याला हर्षवायूचा झटकाच आला होता अर्धवट. अशा परम-सुखाची घटका कधी कुणाच्या वांट्याला आली नसेल अशी त्याची खात्री होती. गळ्याभोंवती तो कॉलर बसवूं लागला तों ती त्याच्या बोटांत धड सापडेना. त्याचं सगळं अंग अत्यानंदानं अन् अधीरतेनं कापत होतं! आतां जोन भेटणार! त्यानं खिडकींतून बाहेर पाहिलं तों अरुणोदयाच्या कोवळ्या तांबूस छटांनी आकाश खुलूं लागलं होतं!

# भाषण आठवें

कादंबऱ्यांचे निरनिराळे प्रकार मानले जातात. घटना-प्रधान, व्यक्तिदर्शनप्रधान, स्थलवर्णनप्रधान, विषयप्रतिपादनप्रधान–आणखी असेच किती तरी. हें वर्गीकरण कांहीं चुकीचं नाहीं; पण या वर्गीकरणांत अभिप्रेत असलेली गोष्ट जरा वेगळ्या रीतीनं तुम्हांला सांगावीशी वाटते अन् मी म्हणतों, की कादंबरी सजविण्याच्या हजार युक्त्या लेखकाला करतां येण्यासारख्या असतात व ललितकथेच्या रूपानं जी सामुग्री वाचकांना सादर करायची, तिला अनुरूप अशा युक्तींचा निश्चय करण्यांतच उत्तम लेखकाचं अर्ध चातुर्य दिसून येत असतं. आपल्याला जें कांहीं सांगायचं आहे तें चमत्कृतिकारक घटनांच्या अनुषंगानं, की व्यक्तिदर्शनाच्या अनुरोधानं, की कसं सांगायचं याबद्दलचा अदमास कादंबरीकार मनांतल्या मनांत का होईना, पण आधीच घेत असतो व त्या अदमासानं त्यानं कादंबरी लिहिली, की तिची घडण एका विशिष्ट जातीबरहुकूम होत जाते.

तुम्हांला जर मी असं म्हटलं, की घटना, व्यक्तिदर्शन व विषयप्रतिपादन यांपैकी एकाहि गोष्टीचा विशेष आश्रय न करतां एक कादंबरी लिहिण्याची एखाद्याची इच्छा आहे, ती कितपत चित्त-वेधक करतां येईल सांगा, तर तुम्ही साहजिकच उत्तर द्याल, की असला प्रयत्न वेडेपणाचा आहे; त्या माणसानं या फंदांत पडूं नये हें चांगलं. पण समजा, मीं तुम्हांला सांगितलं, की या नमुन्याची एक फार चित्तवेधक कादंबरी मीं वाचली आहे, तर ? तुम्ही माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवणार नाहीं. मला माहीत आहे. तुम्ही विचाराल, 'या कादंबरींत पेचप्रसंग, गुंतागुंत, निरगाठ, उकल असले कांहीं प्रकार नाहींत ?' नाहींत म्हणून मीं सांगितलं की तुम्ही पुन्हा प्रश्न कराल, 'व्यक्तिदर्शनाची गंमतहि त्या कादंबरींत विशेष नाहीं ?' मी नाहीं म्हणेन व तुम्ही आणखी विचाराल, 'एखाद्या प्रचलित प्रश्नाचं उद्बोधक विवेचन तरी त्यांत असेल ?' आणि यावरहि 'छे, मुळीच नाहीं' असं जर मीं उत्तर दिलं तर तुम्ही कांहींशा साशंकतेनं अन् बऱ्याचशा उत्सुकतेनं म्हणाल, 'त्या कादंबरीचं नांव सांगा.'

सांगतों. नांवच नव्हे, तर तिचं कथानक, तें सांगण्यांत योजलेली विलक्षण चतुराई—सगळंच सांगतों. या कादंबरीचं नांव 'Action For Slander' (बदनामीचा खटला), मेरी बॉर्डन (Mary Borden) नांवाच्या लेखिकेनं ही लिहिलेली आहे. (प्रकाशक—वुइल्यम हेनेमन लिमिटेड, किं. ७॥ शिलिंग) या लेखिकेच्या 'Jane our Stranger', 'Jericho Sands' इत्यादि आठ दहा कादंबऱ्या प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्या सर्वांत तिच्या लेखनांतील गुण थोड्या फार अंशानं आढळतात; पण त्या सगळ्या तुम्हीं वाचाव्या अशी शिफारस करण्याइतक्या त्या मला आवडलेल्या नाहींत. 'बदनामीचा खटला' मात्र तुम्ही अवश्य वाचा. ही कादंबरी मला जितकी आवडली तितकीच तुम्हांलाहि आवडेल अशी माझी खात्री आहे. कारण असं, की कादंबरीलेखनाच्या विविध

गुणांपैकीं एकाच गुणाच्या जोरावर कौशल्यानं सजविलेली इतकी चित्तवेधक कादंबरी क्वचितच आढळते.

कित्येक कादंबऱ्यांच्या कथानकांचा प्रपंच इतका मोठा असतो, कीं कथानक दहापंधरा वाक्यांत सांगायची वेळ आली तर तें अशक्य नसलं तरी फार कठीण वाटतं. ज्या कादबरीबद्दल मी आतां बोलणार आहें तिची गोष्ट याच्या अगदीं उलट आहे. या कादंबरीचं कथानक विस्तारानं सांगायची परवानगी असली तरी तसं करतां येणार नाहीं. कारण मुळांतच कथानक अगदीं टीचभर आहे. तुम्हांला जर असं सांगितलं, कीं ' एका श्रीमंत गृहस्थाकडे दोन दिवस मजेनं राहायला आलेल्या पाहुण्यांपैकीं पांच गृहस्थ ' पोकर ' नांवाचा पत्त्याचा जुगारी डाव खेळले. खेळांत दोघां खेळाडूंनीं एका खेळाडूवर पत्त्याची हातचलाखी करून फसविल्याचा आरोप केला. भांडन खूप वर्दळीवर आलं; पण तें कसंबसं त्यावेळेस मिटलं. ज्या गृहस्थावर फसवेगिरीचा आरोप केला गेला, तो जवळ जवळ नऊ महिने स्वस्थ बसला. पण नंतर आपली अब्रू कोर्टांत साफ करून घ्यायचं त्यानं ठरविलं आणि ज्यांनी त्याच्यावर फसवेगिरीचा आरोप केला होता, त्यांच्याविरुद्ध त्यानं फिर्याद दाखल केली. खटला जवळ जवळ आठवडाभर चालला अन् ज्यूरीनं व न्यायाधिशानं फिर्यादीच्या बाजूचा निकाल देऊन सुमारें पंचेचाळीस हजार रुपये अब्रूनुकसानीची भरपाई म्हणून आरोपींनी द्यावे असं ठरविलं–' येवढ्या घटनेवर तीनशें पानांची एक कादंबरी लिहा; तर तुम्हीं साहजिक म्हणाल, कीं ' येवढ्याशा गोष्टीवर अशी कादंबरी लिहिणं जरा कठीणच दिसतं आहे. ' खरो-खरच तें कठीण आहे आणि हें विशेष कठीण काम मेरी बॉर्डन या लेखिकेनं मोठ्या कौशल्यानं साधलं असल्यामुळंच ' बदनामीचा खटला ' या कादंबरीची प्रशंसा केली पाहिजे व अभ्यासु लेखकांनी त्या कादंबरीचा अभ्यास केला पाहिजे असं मी म्हणतों.

या कादंबरीचं कथानक मी मघाशीं सांगितलं तेव्हां तें तुम्हांला अगदीं छोटंसं वाटलं ना ? पण त्या छोट्या कथानकांत वरवर पाहातां

लक्षांत न येणारी अशी एक जागा आहे, कीं तिथं कल्पक लेखकाचा हात घुसला, कीं किल्ल्याच्या तटबंदीला तोफगोळ्यांनी मोठं भगदाड पडावं त्याप्रमाणं मोठी ऐसपैस जागा निर्माण होईल, व मग ती भरून काढण्यासाठीं चित्तवेधक गोष्टींची योजना करून मूळचं लहानसं कथानक बरंचसं फुगवितां येईल. 'ज्याच्यावर फसवेगिरीचा आरोप केला गेला तो गृहस्थ नऊ महिने स्वस्थ बसला.' हीच ती जागा. तो कां स्वस्थ बसला ? आरोप करणाऱ्या त्या दोन खेळाडूंना त्यानं ताबडतोब कोर्टांत कां खेचलं नाहीं ? केवळ मित्रांच्या आग्रहाखातर आपला संतापजनक अपमान विसरायचं त्यानं ठरवलं कीं दुसऱ्याच कांहीं कारणासाठीं ? अशाप्रकारचे कांहीं प्रश्न तुम्हीं आपल्या मनाशीं उपस्थित केलेत तर तुमच्या लक्षांत येईल, कीं कथानकांत मोकळी सुटलेली ही जागा भरून काढायला खरोखरच पुष्कळ वाव आहे. आणि समजा याबद्दल विचार करतां करतां तुमच्या मनांत अशी एक कल्पना चमकली, कीं एका स्त्रीवरच्या प्रेमाखातर, त्या प्रेमाची हकीकत गुप्त राखण्यासाठीं त्या गृहस्थानं मौन स्वीकारलं अन् आपल्या सचोटीला लागलेला कलंक नऊ महिने सहन केला तर ? तर काय, माझी खात्री आहे, कीं आजूबाजूला कोणी नाहीं असं पाहून तुम्हीं आनंदानं आपली पाठ थोपटून घ्याल. म्हणजे बघा, एक सुंदर कल्पना सुचल्याबरोबर मूळच्या साध्या कथानकाला रंगत आणणं कसं सहज शक्य होणार तें !

मी प्रथम तुम्हांला कथानक सांगितलं तेव्हां तुम्हीं मनांतल्या मनांत खचित म्हणालां असाल, कीं शीः ! ही रुक्ष पुरुषी गोष्ट आहे, वाचकांची उत्कंठा सहज वाढविणारा प्रेमाचा भाग यांत कुठंच नाहीं, किंबहुना यांत एखादं महत्त्वाचं स्त्रीपात्र घालावं म्हटलं तर त्यालासुद्धां अवकाश नाहीं, परन्तु ज्या गृहस्थावर फसवेगिरीचा आरोप केला गेला तो एका स्त्रीच्या प्रेमपाशांत गुंतलेला होता ही एकच कल्पना निघाल्याबरोबर कथानकाचं स्वरूप एकदम किती बदललं आणि त्याचा विस्तारहि किती वाढला तें लक्षांत घ्या. आणि

एवढ्यावरच न थांबतां अशी कल्पना करा, कीं ज्या गृहस्थावर फसवेगिरीचा आरोप केला गेला, त्याचं प्रेम अशातशा स्त्रीवर नव्हे, तर आरोप करणाऱ्या दोघां गृहस्थांपैकीं एकाच्या बायकोवर होतं. आणखी अशी कल्पना करा, कीं पत्त्यांचा जुगारी डाव ही मंडळी ज्या दिवशीं खेळली त्याच्या आधीं दोनच दिवस फसवेगिरीचा आरोप ज्याच्यावर केला गेला त्याची बायको त्याच्याशीं आपलं पटणं शक्य नाहीं अशा विचारानं त्याचं घर सोडून निघून गेली होती, या दोन नव्या कल्पनांच्या योगानं तर मूळच्या साध्या कथानकाला किती तरी पिळदार आणि पेंचदार स्वरूप येईल, नाहीं का ?

या सर्व कल्पनांची भर घातल्यावर लेखिकेनं 'बदनामीचा खटला' या कादंबरीसाठीं जें कथानक तयार केलं तें मी आतां थोडक्यांत तुम्हांला सांगतों.

मेजर डेव्हिअट् आणि कॅप्टन ब्रॅडफर्ड नांवाचे एकाच सैन्यांत काम करणारे दोघे अंमलदार होते. डेव्हिअट्च्या बायकोचं नांव ॲन् ब्रॅडफर्डच्या बायकोचं नांव ज्योसी. दोघांचे राहते बंगले शेजारीं शेजारींच होते. डेव्हिअट् पतिपत्नींत वयाचं पुष्कळ अंतर होतं आणि ॲनला मातृपद प्राप्त होणं शक्य नाहीं असा तज्ज्ञ डॉक्टरांनीं अभिप्राय दिलेला होता. ज्योसी म्हणजे एक नाचरी, पुरुषांवर मोहजाल पसरण्यांत आनंद मानणारी अशी स्त्री होती. तिनं दोन नवऱ्यांशीं आधींच घटस्फोट केलेला होता. कॅप्टन ब्रॅडफर्ड हा तिचा तिसरा नवरा; पण तिसरं लग्न झालं तरी तिचा नाचरा स्वभाव कांहीं निवळला नव्हता. अशा परिस्थितींत तिच्या मोहजालांत मेजर डेव्हिअट् सांपडला यात आश्चर्य करायचं कारण नाहीं.

मेजर डेव्हिअट् आणि कॅप्टन ब्रॅडफर्ड हे जरी एकाच सैन्याच्या तुकडींत काम करणारे अंमलदार होते, तरी त्यांचं दोघांचं फारसं कधीं पटलंच नाहीं. ब्रॅडफर्डच्या स्वभावांतला दुष्टपणा डेव्हिअट्ला

अगदीं तिरस्करणीय वाटत असे. एकदां आपल्या स्वारांच्या घोड्याला निर्दयपणानं मारीत असतां ब्रॅडफर्डला पाहिल्यावर डेव्हिअट्नं चारचौघांच्या समक्ष त्याची चांगलीच कानउघाडणी केली होती. या अपमानाचं शल्य ब्रॅडफर्डच्या मनांत राहिलेलं आहे अन् योग्य संधि मिळाल्याबरोबर आपला घात साधण्याइतका तो खुनशी आहे हें डेव्हिअट् मनांतल्या मनांत ओळखून होता. यांतच भर पडली त्याच्या व ज्योसीच्या अनैतिक संबंधाची. याप्रकारची शंका ब्रॅडफर्डला नसणं फारसं संभवनीय नव्हतं.

आपल्या पतीचा व ज्योसीचा अनैतिक संबंध असल्याची शंका ॲनला नसावी असाहि संभव नव्हता. तिनं त्याबद्दल नवऱ्याशी भांडणतंटा कधीं केला नाहीं. परंतु त्याच्याशीं संसार करून राहाण्यांत कुणालाच सुख नाहीं असं तिला वाटूं लागलं अन् अखेर ती त्याचा कायमचा निरोप घेऊन न्यूझीलंडमध्यें तिचं माहेर होतं तिकडे निघून गेली.

ॲनच्या गृहत्यागानंतर दोनतीन दिवसांनी डेव्हिअट् सर बर्नार्ड रोपर यांच्याकडे पाहुणा म्हणून गेला. या ठिकाणीं ब्रॅडफर्ड व ज्योसी आलीं होतीं व आणखीहि सातआठ मंडळी जमली होती. कुणी पार्लमेंटचे सभासद, कुणी लक्षाधीश व्यापारी अशीं सारींच बडींबडीं प्रस्थं होतीं त्या पार्टीत. शुक्रवार ता. २५ ऑक्टोबर रोजीं संध्याकाळीं ही सर्व मंडळी सर बर्नार्ड रोपर यांच्या बंगल्यावर दाखल झाली. शनिवारीं जंगी शिकारीचा बेत झाला, रात्रीं खाना झाला व त्यानंतर कांहीं मंडळी ब्रिज खेळत बसली व डेव्हिअट्, ब्रॅडफर्ड, ग्रॅंट नांवाचा एक पाहुणा व आणखी दोन गृहस्थ यांनीं दुसऱ्या एका खोलींत 'पोकर' नांवाचा पत्त्याचा जुगारी डाव मांडला. ब्रॅडफर्डची बायको डाव पाहात रुमाल विणीत नवऱ्याच्या व डेव्हिअट्च्या मधोमध मागच्या बाजूस बसली. डाव सुरू झाला. निष्णात खेळाडू म्हणून प्रसिद्ध असलेला डेव्हिअट् सारखा जिंकूं लागला. साडेचार हजार

रुपयांपर्यंत त्याची कमाई झाली. बोलूनचालून जुगारीचा खेळ तो. एकानं कमवायचं, एकानं गमवायचं असं चालायचंच त्यांत, अशी बुद्धि ठेवूनच खेळणारांनीं तो खेळ खेळायचा असतो. परंतु ग्रॅंट नांवाचा जो पाहुणा होता तो सारखा हरत होता. खेळतांना सारखं मदिरापान केल्यामुळें त्याच्या वृत्तीचा तोलहि सुटत चालला होता. एका डावांत जेव्हां त्याच्या व डेव्हिअट्च्या हातांचीच शर्त लागली अन् अखेर पानं उघडीं होतांच डेव्हिअट्चा हात सरस ठरून टेबलावर पणाचे म्हणून साचलेले दीड हजार रुपये त्याला मिळाले तेव्हां ग्रॅंट चिडला. तो एकदम उठला, हाताच्या फटकाऱ्यानं त्यानं टेबल उधळून दिलं अन् तो डेव्हिअट्ला म्हणाला, 'तूं पत्त्यांची अदलाबदल केलीस हातचलाखीनं! तूं लबाड, फसव्या, चोर आहेस!'

पत्त्यांचा जुगार खेळणारीं माणसंसुद्धां सच्चेपणाची किंमत फार मानतात व आपल्या सच्चेपणाची कुणी शंका घेतली तर त्यांत त्यांना मोठा अपमान वाटतो. मेजर डेव्हिअट्नं कितीदा तरी पोकरच्या एकेका बैठकीला दोनदोन चारचार हजार रुपये कमावले होते. नामांकित खेळाडू म्हणून त्याची कीर्ति होती. शिवाय तो सैन्यांतला वरिष्ठ अंमलदार होता. ग्रॅंटनं केलेला ठकबाजीचा आरोप ऐकतांच त्यानं त्याला एक ठोसा लगावून जमिनीवर लोळवलं. त्यानं त्याचा प्राणच घेतला असता; पण मंडळींनी त्याला आवरलं. पलीकडच्या दालनांत ब्रिज खेळणारीं माणसंहि धावून आलीं व तींहि डेव्हिअट्ला शांत करूं लागलीं. डेव्हिअट् म्हणाला, 'मी कां गप्प बसेन? या ग्रॅंटनं माझ्यावर गलिच्छ आरोप केलेला आहे, त्यानं तो परत घेतलाच पाहिजे." ग्रॅंट म्हणूं लागला, 'मी कां परत घेईन आपला आरोप? पत्त्यांची अदलाबदल करतांना मीं डेव्हिअट्ला प्रत्यक्ष पाहिलेलं आहे.' डेव्हिअट् व ग्रॅंट या दोघांपैकीं कोणावर विश्वास ठेवायचा तें मंडळींना समजेना. तेवढ्यांत कॅप्टन ब्रॅडफर्ड पुढें होऊन म्हणाला, 'ग्रॅंट म्हणतो तें अगदीं खरं आहे. एका नव्हे, तीन डावांच्या वेळीं त्यानं आपलीं हातांतलीं पानं बदललीं तें मी

पाहिलेलं आहे.' ते त्याचे शब्द ऐकून डेव्हिअट् संतप्त झाला. त्यानं खरं पाहातां पत्त्यांची अदलाबदल मुळींच केलेली नव्हती; पण आतां एकटा ग्रँटच नव्हे, तर ब्रॅडफर्डहि त्याच्यावर आरोप करीत होता. हा आरोप करण्यांत केवळ आपल्यावर सूड उगविण्याची संधि ब्रॅडफर्ड साधून घेत आहे हें डेव्हिअट्ला उघडउघड दिसत होतं; पण ती गोष्ट तो बोलून दाखवूं शकत नव्हता. ग्रँटला व ब्रॅडफर्डला यथास्थित चोप देण्यासाठीं त्याचे हात वळवळत होते; पण त्यानं आपला संताप कसा-बसा आवरला व तो म्हणाला, 'ठीक आहे, मी तुम्हां दोघांवर कोर्टांत फिर्याद करतों. तिथं तुम्हांला माझ्यावरचा आरोप तरी सिद्ध करावा लागेल, नाहीं तर माझी माफी तरी मागावी लागेल.'

पण मित्रमंडळींनी डेव्हिअटला त्या मार्गापासूनहि परावृत्त करण्यास आरंभ केला. कारण जुगारी डावांत झालेल्या या बाचा-बाचीचं प्रकरण एकदां कोर्टांत गेलं कीं पार्टीसाठीं जमलेल्या साऱ्याच बड्याबड्या मंडळींची अब्रू चव्हाट्यावर मांडली जाणार हें उघड होतं. चांगलीं चांगलीं अब्रूदार माणसं हजारो रुपये पणाला लावून जुगारासाठीं पत्ते खेळतात हें जगाला कळलं तर लोकांच्या दृष्टीनं ती एक मोठी नामुष्कीची गोष्ट समजली जाणार होती. डेव्हिअट् व ब्रॅडफर्ड हे दोघे सैन्यांतले मोठे जबाबदार अंमलदार होते. त्यांच्या जुगार-बाजीची चर्चा कोर्टांत निघाली की तिच्या योगानं ब्रिटिश सैन्याच्या नेकीवर अन् शिस्तीवरसुद्धां कलंक चढण्यासारखा होता. या साऱ्या गोष्टी डेव्हिअट्च्या निदर्शनाला आणून पार्टीसाठीं जमलेल्या साऱ्याच मंडळींनी त्याला आग्रह केला, कीं आमची अब्रू लक्षात घेऊन तरी तूं कोर्टांत जाऊं नकोस. झाल्या प्रकाराची कुठेंहि वाच्यता होणार नाहीं; ग्रँट व ब्रॅडफर्डसुद्धां कुठेंहि याबद्दल बोलणार नाहींत अशी सर्वांनी त्याला हमी दिली; तूं आमच्या सर्वांच्या दृष्टींनं निष्कलंक आहेस असं त्याला आश्वासन दिलं अन् पुनःपुन्हा विनंति केली, कीं तुझा अपमान झाला हें तूं कृपा करून विसरून जा अन् हें सारं प्रकरण इथंच संपलं असं समज.

मित्रमंडळींचा हा आग्रह डेव्हिअटनं मान्य केलाच असता असं नाहीं; पण त्याला असाहि विचार करणं भाग होतं, कीं आपण ही गोष्ट कोर्टांत नेली कीं साक्षीपुराव्याच्या गोंधळांत आपल्या वैवाहिक जीवनाची लाजिरवाणी हकीकतहि कोर्टांत येईल. इतकंच नव्हे, तर आपल्या व ज्योसीच्या अनैतिक संबंधाची सारी घाणहि बाहेर निघून जिच्यावर आपण प्रेम केलं त्या ज्योसीवर अब्रूदार माणसांतून उठायची वेळ येईल. हें सारं लक्षांत घेऊन मेजर डेव्हिअटनं तें प्रकरण कोर्टांत नेण्याचा आपला विचार सोडून दिला. मात्र सर बर्नार्ड रोपर यांच्या बंगल्यावर एक घटकाभरहि अधिक राहायचं नाहीं असं त्यानं ठरविलं आणि तो रातोरात तेथून निघून गेला.

पण मनाला झालेल्या वेदना सहजासहजीं विसरणं त्याला शक्य नव्हतं. आपल्यावर ठकबाजीचा आरोप करून ब्रॅडफर्डनं आपला चांगलाच सूड उगविला हें शल्य त्याच्या मनाला बोचत होतं. तो पुन्हा आपल्या दृष्टीसहि न पडेल तर बरं, त्या पार्टीच्या दिवशीं जमलेली मंडळी आपल्याला न भेटतील तर फार चांगलं, इतकंच नव्हे, तर ओळखीच्या कुणाच माणसाचा संपर्क नको अशी त्याच्या मनाची वृत्ति झाली. त्यानं सैन्यांतून रजा घेऊन तीन महिने अगदीं एकांतवासांत काढले आणि परत कामावर रुजूं झाल्यावरदेखील आपल्या बंगल्यावर थाटामाटानं राहाण्याऐवजीं, आपलं कर्ज निवारून टाकण्याच्या हेतूनं लंडन शहराच्या गरीब वस्तीच्या एका भागांत खोल्या घेऊन तो राहूं लागला.

त्याच्या लक्षांत हलके हलके येऊं लागलं, कीं पोकरच्या डावावरून झालेल्या त्या भांडणाची बातमी गुप्त राहिली नव्हती. लोकांत त्याबद्दल चर्चा होत होती. त्याच्या पलटणीच्या मुख्य अंमलदाराच्या कानांपर्यंत कांहींतरी कुजबूज गेली असावी; कारण एक दिवस त्यानं त्याला भेटीला बोलावून त्याबद्दल सरळच प्रश्न विचारला. डेव्हिअटनं सारी हकीत जशी घडली तशी त्याच्या

कानांवर घातली आणि आपण पूर्ण निष्कलंक असल्याचं प्रतिज्ञेवर सांगितलं. सेनापतींचं तेवढ्यानं समाधान झालंसं दिसलं. पण लोकांत एकदां पसरूं लागलेली बातमी कितीहि खोटी असली तरी ती सहजासहजीं थांबत नाहीं. ज्या ज्या क्लबांत डेव्हिअट् खेळत असे त्या त्या क्लबांत लोक आपल्यावर एक प्रकारचा गुप्त बहिष्कार टाकून वागत आहेत अशी डेव्हिअट्ला शंका येऊं लागली. अखेर जेव्हां एका क्लबानं सभासदांच्या यादींतून त्याचं नांवच काढून टाकलं तेव्हां तर डेव्हिअट्ची पक्की खात्री झाली, की ग्रँटनं व ब्रॅडफर्डनं आपल्यावर केलेला ठकबाजीचा आरोप पद्धतशीर रीतीनं प्रसृत करण्यांत आलेला आहे व सारे लोक तो खराच मानीत आहेत. मग त्यानं ठरविलं, कीं यापुढं गप्प बसण्यांत अर्थ नाहीं. ग्रँट व ब्रॅडफर्ड या दोघांवर त्यानं अब्रूनुकसानीची फिर्याद दाखल केली.

हा बदनामीचा खटला एक आठवडाभर चालला. सरतपास, उलट तपास, साक्षी इत्यादि सारे प्रकार झाले आणि अखेर ज्यूरींच्या व न्यायाधिशाच्या निर्णयानं डेव्हिअट्वर केला गेलेला ठकबाजीचा आरोप खोटा ठरून अब्रूनुकसानीची भरपाई म्हणून त्याला पंचेचाळीस हजार रुपये मिळाले.

मूळचं छोटं कथानक लेखिकेनं आपल्या कल्पकतेनें वाढवून फुगविलं असलं तरी तें तिला यापेक्षां अधिक मोठं करतां आलेलं नाहीं. हें वाढविलेलं कथानक ऐकूनसुद्धां बहुतेक तुम्ही आपल्या मनाशीं म्हणत असाल, कीं छे बुवा, हीसुद्धा सामुग्री मोठी कादंबरी लिहायची झाली तर अपुरीच पडेल. तुमची शंका चुकीची नाहीं; पण लहानशा कथानकांत एकदोन घटनांची भर घालून तें मोठं करणारं कल्पकतेचं हत्यार जसं लेखकाजवळ असतं, त्याप्रमाणंच या कामीं उपयोगी पडणारं दुसरंहि एक हत्यार आहे. तें म्हणजे कथानकाचा आविष्कार करण्याचं कसब. या हत्याराचा किती चातुर्यानं मेरी बॉर्डन् या लेखिकेनं उपयोग केला आहे तेंच मी आता तुम्हांला सांगणार आहे.

पहिली गोष्ट अशी, कीं कथानकांतले निरनिराळे प्रसंग ज्या क्रमानं घडले त्या क्रमानं तिनं ते कादंबरींत सांगितलेले नाहींत. एकंदर कथानक वाचकांपुढं मांडण्याच्या दोन पद्धति संभवतात. ज्या क्रमानं गोष्टी घडल्या त्या क्रमानं त्या सांगत जाणं ही एक पद्धति. हिला मी 'अनुलोम' पद्धति म्हणतों. उलट, अखेर घडलेली गोष्ट प्रथम सांगून नंतर उलट्या क्रमानं कथानकाच्या प्रारंभापर्यंत वाचकाला नेणं ही दुसरी पद्धति होय. हिला 'विलोम' पद्धति म्हणतां येईल. (या दोन्ही पद्धतींच विस्तृत विवेचन मीं माझ्या 'प्रतिभा-साधन' ग्रंथांतील 'कादंबरी' या प्रकरणांत केलेलं आहे.) 'बदनामीचा खटला' लिहितांना लेखिकेनं विलोम पद्धतीचा अंगिकार केला आहे. कादंबरीच्या कथानकांतला पहिला प्रसंग कोणता? तर सर बर्नार्ड रोपर यांच्या बंगल्यावर पार्टीसाठीं मंडळी जमली तो. सामान्यतः लेखकानं तेथूनच कादंबरीला प्रारंभ केला असता; पण मेरी बॉर्डनूनं तसं केलेलं नाही.

तिनं आपल्या कादंबरीचा प्रारंभ कुठून केला आहे, माहीत आहे? खटला कोर्टांत सुरू झाल्यानंतर वादीच्या वकिलाचं भाषण सुरू होतं तिथून! कादंबरीच्या एकंदर मांडणीची सविस्तर कल्पनाच मी आतां तुम्हांला देतों. लेखिकेनं कादंबरीचे एकंदर चार भाग पाडले आहेत. पहिला भाग चार प्रकरणांचा असून त्यांत खटल्याच्या सुनावणीची प्रारंभींची बरीचशी हकीकत दिलेली आहे. दुसऱ्या भागाचीं एकंदर सहा प्रकरणं आहेत; त्यांत लेखिकेनं ज्या घटनांतून खटला निर्माण झाला त्या साऱ्या घटना ओळीनं सांगितल्या आहेत. मग पहिल्या भागाच्या अखेरीस सोडून दिलेलं खटल्याचं सूत्र लेखिकेनं तिसऱ्या भागांत पुन्हा हातीं घेतलं आहे. यांतील पहिल्या प्रकरणांत प्रतिवादीच्या वकिलानं डेव्हिडअट्ची केलेली उलट-तपासणी विस्तारानं दिलेली आहे. ती ऐकून डेव्हिडअट्च्या विरुद्ध खटल्याचा निकाल लागणार असंच सगळ्या लोकांना कसं वाटायला लागलं तें दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणांत सांगितलेलं आहे. चवथ्या

भागाच्या पहिल्या प्रकरणांत प्रतिवादीच्या वकिलानं समारोपादाखल केलेलं भाषण दिलेलं आहे. कादंबरीच्या या टप्प्यापर्यंत पोचलेला वाचक मनांतल्या मनांत म्हणूं लागतो, ' छे, डेव्हिडअट् या खटल्यांतून निष्कलंक म्हणून आतां कसचा बाहेर पडतो ? साराच साक्षीपुरावा त्याच्या विरुद्ध चाललेला आहे. खटल्याचा निकाल त्याच्या बाजूचा होणं शक्यच नाहीं. प्रतिवादींनीं खटला जिंकला यांत संशय नाहीं. ' असं वाचकाला वाटायला लागतं तोंच अखेरीच्या भागाच्या दुसऱ्या प्रकरणांत ब्रॅडफर्डच्या उलटतपासाला प्रारंभ होतो. खटल्याचा रंग थोडा बदलूं लागतो अन् त्याच्या पुढच्या प्रकरणांत तर डेव्हिडअट्च्या वकिलानं या उलटतपासांत योजिलेल्या एका अतिशय चतुराईच्या डावानं ब्रॅडफर्डची जबानी सर्वस्वीं त्याच्या विरुद्ध जाऊं लागते. सबंध खटल्याला अकल्पित कलाटणी मिळते व डेव्हिडअट् आतां खटला जिंकणार अशी सगळ्यांची खात्री पटते !

म्हणजे मूळ कथानकांत नसलेले गुणधर्म केवळ निवेदनशैलीच्या जोरावर लेखिकेनं कादंबरींत कसे उत्पन्न केले आहेत तें पाहा. वाचकांच्या जिज्ञासेला आणि उत्कंठेला ताण देण्यासारखे पेच मूळ कथानकांत नाहींत; पण कादंबरीची मांडणी लेखिकेनं अशा युक्तीनं केली आहे, कीं तिच्या पकडींत सापडलेल्या वाचकांची उत्कंठा सारखी वाढत जावी, अखेरअखेर डेव्हिडअट् विनाकारण ठकबाज ठरणार असं वाटून वाचकाला त्याच्याविषयीं विलक्षण अनुकंपा वाटावी, ' संपलं सारं ! बिचारा डेव्हिडअट् ! ' असा उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडावा, अन् हें होतं न होतं तोंच पुढच्या प्रकरणांत सारा रंग पार बदलून ब्रॅडफर्डच लुच्चा ठरलेला पाहून वाचकाला सानंद विस्मयाचा धक्का बसावा !

हें झालं कथानकाचा हलके हलके आविष्कार करण्याच्या चातुर्याबद्दल. त्याच्या जोडीला निवेदनशैलीच्या कित्येक गंमती करून मेरी बॉर्डननं कादंबरीची रंगत कशी वाढविली आहे तेंहि लक्षांत

घेण्यासारखं आहे. वाचकाला क्षणभर श्वास धरायला लावणारे महत्त्वाचे प्रसंग दोन. एक प्रतिवादीचा वकील डेव्हिअट्चा उलटतपास घेतो तो, अन् दुसरा ब्रॅडफर्डचा उलटतपास घेतांघेतां प्रश्नोत्तरांच्या जाळ्यांत त्याला हलकेंहलकें पकडून डेव्हिअट्चा वकील त्याचीच जबानी साफ त्याच्या गळ्यांत घालतो तो. हे दोन्ही प्रसंग लेखिकेनं फार उत्कृष्ट वठविले आहेत.

ज्या युक्तीनं ब्रॅडफर्डची जबानी उलटविली जाते ती तुम्हांला विस्तारानं सागतां आली असती तर फार बरं झालं असतं; पण तसं करण्यांत फार वेळ जाईल म्हणून त्या युक्तीची तुम्हांला थोडक्यांत कल्पना देतों. डेव्हिअट्च्या वकिलानं ब्रॅडफर्डला विचारलं,

'डेव्हिअट्नं हातचलाखीनं पत्त्यांची अदलाबदल केली असं तूं म्हणतोस; पण असं मोघम सांगू नकोस. तो कसा बसला होता, त्यानं टेबलावर हात कसे टेकले होते, कुठल्या हातांत डाव धरला होता, डावांतलीं पानं त्यानं खाली कशीं टाकलीं, आधी टाकलेल्या पानांपैकी कांहीं पानं त्यानं कशीं उचलून घेतलीं व कशीं डावांत मिसळलीं तें सगळं वर्णन करून सांगशील का ?' ब्रॅडफर्ड म्हणाला, 'हो, त्यांत काय ? सांगतों की !' आणि त्यानं तें वर्णन केलं. त्याचं तें वर्णन संपल्यावर डेव्हिअट्चा वकील न्यायाधिशाकडे वळून म्हणाला, 'महाराज, पत्त्याचा एक जोड मीं कोर्टांत आणलेला आहे. ब्रॅडफर्डनं तो हातीं घ्यावा आणि डेव्हिअट्नं ज्या तऱ्हेनं पानं बदललीं असं त्याचं म्हणणं आहे, त्याप्रमाणं त्यानं तीं प्रत्यक्ष बदलून दाखवावीं. माझं म्हणणं असं आहे, की अशा तऱ्हेनं पानं बदलणं कधींहि शक्य नाहीं. अशा तऱ्हेची पानांची अदलाबदल केली तर ती करतांना माणूस ताबडतोब पकडला जाईल अशी अदलाबदल करणं शक्य आहे असं ब्रॅडफर्डनं दाखविलं तर वाहवा; पण तसं त्याला दाखवितां आलं नाही तर त्यानं केवळ दुष्टपणानं डेव्हिअट्वर ठकबाजीचा आरोप केला होता असं सिद्ध होईल.' न्यायाधिशाला हें म्हणणं पटलं

आणि ब्रॅडफर्डला कोर्टांत पत्त्यांची अदलाबदल कशी झाली तें दाखविणं भाग पडलं. पण ती गोष्ट तो करूं लागतांच त्याला तें मुळीच साधेना. तो पुरता बावरला आणि बाजू आपल्या अंगावर आली असं पाहतांच संतापानं उठून ' ही साक्ष आहे का फार्स आहे ? ' असं ओरडून त्यानं हातांतले पत्ते फेकून दिले. झालं ! आणखी काय पाहिजे होतं ? तो डघडउघड खोटी साक्ष देत होता हें सिद्ध झालं ! डेव्हिअट्‌वरचा आरोप खोटा ठरला ! डेव्हिअट्‌नं खटला जिंकला !

या दोन मुख्य प्रसंगांप्रमाणेच वकील व साक्षीदार यांच्यांतल्या प्रश्नोत्तरांच्या झटापटी लेखिकेनं दाखविल्या आहेत, मधूनमधून न्यायाधीश आणि ज्यूरींतली मंडळी यांच्या मनांतल्या विचारांचीं चित्रं कौशल्यानं रंगविलीं आहेत आणि कोर्टातलं वातावरणहि ठिकठिकाणीं मोजक्या शब्दांत परिणामकारक रीतीनं उठविलं आहे.

व्यक्तिदर्शनाच्या खटाटोपांत लेखिका फारशी पडलेली नाहीं. डेव्हिअट् हा कादंबरीचा नायक, त्याची बायको अन् व ज्योसी याच काय त्या कथानकांतल्या महत्त्वाच्या स्त्रिया, आणि ब्रॅडफर्ड हा एकप्रकारचा खलपुरुष. परंतु या मंडळींच्या स्वभाववर्णनांत लेखिका फारशी गुंतलेली दिसत नाहीं. यांचे स्वभाव कथानक सांगतां सांगतां जेवढे स्पष्ट होतील तेवढे पुरे अशी तिनं स्वतःला मर्यादा घातलेली असावी. मात्र याचा अर्थ असा नव्हे, कीं या कादंबरींत व्यक्तिदर्शनाचं कौशल्य तुम्हांला आढळायचं नाहीं. तीहि मौज या कादंबरींत तुम्हांला मनसोक्त लुटतां येईल. आणि तें सारं कौशल्य लेखिकेनं गौण पात्रांवर खर्चिलं असल्यामुळं तें करतांना तिनं जो सूक्ष्म विनोद साधला आहे त्याचा तर तुम्हांला विशेष आनंद होईल.

' ज्यूरीं 'तल्या मंडळींपैकीं तीन व्यक्ति लेखिकेनं विनोदगर्भ व्यक्तिदर्शनासाठीं निवडल्या आहेत. एक ब्राऊनरिग नांवाचा शाळामास्तर, दुसरा साइडबॉटम नांवाचा व्यापारी आणि तिसरी व्यक्ति म्हणजे मिस् पॅंड्लटन् नांवाची एक स्त्री !

खटल्याचं काम ऐकतां ऐकतां या तीन व्यक्तींच्या मनोगत विचारांना कशींकशीं आंदोलनं मिळत होतीं तें लेखिकेनं फार मार्मिकपणानं ठिकाठिकाणीं सांगितलेलं आहे. एकच खटला तिन्ही व्यक्ति ऐकत होत्या; पण त्यांतला एक होता शाळामास्तर, एक होता व्यापारी आणि तिसरी होती एक सामान्य कोवळ्या अंतःकरणाची स्त्री! त्यामुळं त्या तिघांच्या मनांत किती भिन्नभिन्न विचार येत होते व डेव्हिड्अटविषयींची त्यांच्या मनाची वृत्ति किती वेगवेगळी होती त्याचीं मोठीं सहृदय वर्णनं जागोजागीं विखुरलेलीं आहेत. तीं सगळींच कांहीं मला या ठिकाणीं सांगतां येणार नाहींत; पण नमुन्यादाखल कांहीं सांगतों.

खटला सुरू होऊन डेव्हिड्अट्चा सरतपास संपला तेव्हां शाळामास्तर बाऊनरिंग याला काय काय वाटलं त्याचं वर्णन ऐका. 'ब्राऊनरिंगची पहिल्यापासून खात्री होती, कीं डेव्हिड्अट्नं ठकबाजी केलीच असली पाहिजे; तो एक नंबरचा लबाड असला पाहिजे. तो स्वतः शाळामास्तर होता आणि शिपाई लोकांचा त्याला तिटकारा वाटत असे. या शिपाई गड्यांना पोसायचं म्हणून सैन्यांची गरज अन् सैन्य ठेवलीं कीं त्यांच्यासाठीं लढाया उरकून काढायची गरज. तेव्हां जगांतल्या साऱ्या रक्तपातांना हे शिपाईच मूळ कारण होत जशी त्याची विचारसरणी होती. अशा पूर्वग्रहदूषित दृष्टीनंच तो डेव्हिड्अट्कडे पाहात होता. शाळेतल्या पोरांच्या वह्या तपासून तपासून चिडलेल्या या शाळामास्तराला जगांत जिकडेतिकडे बुद्धीचा मठ्ठपणा भरलेला आहे असं वाटूं लागलेलं होतं. साक्षीपुरावे ऐकतांना त्याच्या मनांत सारखं येत होतं, हे सारे लोक खऱ्या प्रश्नाचा ब्रह्मघोटाळा करून सोडताहेत. खरा प्रश्न डेव्हिड्अट्नं पत्त्याचीं पानं बदललीं की नाहीं हा नव्हताच. डेव्हिड्अट् व ब्रॅडफर्ड हे दोघे एकमेकांचं वैर कां करीत होते, हाच अधिक महत्वाचा प्रश्न होता अन् या वैराच्या मुळाशीं एक व्यभिचारिणी स्त्री होती हें तर उघड होतं...!'

आता व्यापारधंदा करणाऱ्या साइडबॉटमला खटला ऐकतांना काय वाटत होतं त्याचं वर्णन ऐका. 'पोकरच्या डावाची माहिती डेव्हिअट्चा वकील देत होता; पण त्यांतलं एक अक्षर साइडबॉटमला कळलं असलं तर शपथ! तें समजण्याचा प्रयत्न करतां करतां त्याचं अवाढव्य स्थूल शरीर अगदीं घामानं डबडबून गेलं. जुगारासाठीं माणसांनीं पत्ते खेळावेत हेंच त्याला मुळीं भयंकर वाटलं. एखाद्या छोट्या लॉटरींत पैसे लावणं निराळं. त्याच्या बायकोनं एकदां असं एक लॉटरी-तिकीट विकत घेतलं होतं अन् त्यावर तिला चॉकोलेटचा डबा आला होता त्याची त्याला आठवण झाली. त्याला वाटलं, पत्त्याच्या डावावर हजारो रुपये लावायचे म्हणजे काय आहे काय? तो पोकरचा डाव त्याला कांहीं केल्या समजेना. अखेर तो समजून घेण्याचा नादच त्यानं सोडून दिला, तो दुसऱ्याच गोष्टींचा विचार करूं लागला. दुकानांत आज नवीन माल आला आहे तो आपल्या दुकानाच्या मॅनेजरनं नीट तपासून घेतला असेल कीं नाहीं? काय काय माल खरेदी केला होता बरं आपण आज? खवा, मांस, अंडीं—खरं म्हणजे आपण आपल्या दुकानांत केवळ देशी मालच ठेवायला हवा, पण आपण तरी काय करणार व्यापाऱ्यांचीं नीट संघटना असल्या-वांचून?' अशा प्रकारें त्याचे विचार भटकत होते तोंच 'हं मग, तुम्हीं जीं पानं नको म्हणून टाकलींत त्याचं काय केलंत?' असा डेव्हि-अट्च्या वकिलानं त्याला मोठ्या आवाजांत प्रश्न विचारला अन् तो ऐकून साइडबॉटम भानावर आला.

'खटल्याची सुनावणी चालू असतां निरनिराळ्या वेळीं मिस् पेंडल्टन्च्या मनांत कोणकोणते विचार येत होते त्याचं वर्णन तर लेखिकेनं फारच छान केलेलं आहे, वकिलानं डेव्हिअटला विचारलं, 'त्या पोकरच्या डावांत भांडण झालं नसतं तर किती पैसे तुम्हाला मिळाले असते?' यावर डेव्हिअट् म्हणाला, जवळजवळ साडेचार हजार रुपये.' त्याचं तें उत्तर ऐकतांच मिस् पेंडल्टन् दचकली. 'साडे-चार हजार रुपये! बापरे!' एवढ्या पैशांत काय काय विलक्षण

गोष्टी करतां येतील ! इतके पैसे मिळण्याइतकं आपलं नशीब अकस्मात् उघडलं तर त्या बातमीचा पुकारा करीत आपण रस्त्यारस्त्यांतून कशा धावत सुटूं अन् शेजाऱ्यापाजाऱ्यांना जागं करून सांगण्यासाठीं आपण त्यांच्या दारांवर कसे धक्के मारूं त्याचीं स्पष्ट चित्रं तिच्या डोळ्यांपुढं उभीं राहिलीं. युद्धांतल्या रक्तपाताचा तिला तिटकारा होता; पण सैन्यांतल्या शिपायांबद्दल नव्हता. तिच्या धाकट्या भावावर तिचं फारच प्रेम होतं. त्याचं नांव रोनी. तो महायुद्धांत मेला होता. ती स्वतः दारिद्र्याशीं झगडत दिवस काढीत होती अन् तिच्या ओळखीचीं सारींच माणसं तशींच धडपडत असलेलीं तिला दिसत होतीं. देशांत अशी बेकारी अन् गरिबी असतांना, लाखो मुलांना पुरतं पोटभर अन्नहि मिळत नसतांना पत्त्याच्या डावांत कुणी चारपांच हजार रुपये मिळवावे किंवा घालवावे म्हणजे एक प्रकारचा क्रूरपणा होय असं तिच्या मनांत आलं; पण साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभ्या राहिलेल्या उंचनिंच, देखण्या, रुबाबदार अशा मेजर डेव्हिअट्कडे नजर लावल्यावर खटला त्याच्या विरुद्ध जावा असं कांहीं केल्या तिला वाटेना. तिच्या धाकट्या भावाला पोकरच्या खेळाचा नाद होता; पण अखेर देशासाठीं त्यानं प्राण अर्पण केले होते. डेव्हिअट् जुगारबाज असेल, त्यानं खेळतांना ठकबाजीहि केली असेल; पण त्याच्याकडे ती जेव्हां जेव्हां पाही तेव्हां तेव्हां तिचं अंतःकरण सहानुभूतीनं भरून येई.

ज्यूरींतल्या या तीन व्यक्तींप्रमाणं ज्याच्यापुढं तो खटला चालला होता त्या न्यायाधीशाच्या मनांतल्या विचाराचंहि पृथक्करण लेखिकेनं मोठ्या मनोहर रीतीनं ठिकठिकाणीं केलं आहे. त्याचा एक नमुना ऐका–' वादी, प्रतिवादी अन खटला ऐकण्यासाठीं जमलेलीं बडबडी मंडळी पाहून जस्टिस ट्रॉटर यांना एक प्रकारची चीड आली होती. मनांतल्या मनांत ते सारखे म्हणत होते, ' संपत्तींत अन् ख्यालीखुशालींत लोळणारीं हीं सारीं माणसं एक दिवस नष्ट

झालीं तर कांहीं वाकडं व्हायचं नाहीं समाजाचं! सत्ता, पैसा, मानमान्यता, सुदृढ प्रकृति सारं कांहीं या नशीबवान् चोरांच्या वांट्याला आलं होतं; अन् त्याचा विनियोग ते कशांत करीत होते? तर व्यभिचारांत अन् जुगारांत. कोर्टांत साक्षीपुरावे चालले होते ते सगळे पत्त्याच्या डावाबद्दल; पण खरं भांडण कांहीं पत्त्याच्या डावावरून झालं नव्हतं खास. हे सारे लबाड लोक तें खरं कारण लपवून ठेवीत होते. खटला ऐकण्यासाठीं ब्रॅडफर्ड व त्याची बायको ज्योसी आली होती. तीं शेजारींशेजारीं बसलीं होती. ज्योसीकडे नजर टाकतांच जस्टिस ट्रॅटर थोडेसे चमकले. ती सुंदर नसली तरी देखणी होती. तिचे टपोरे डोळे, फुगीर नाकपुड्या, रंगवून लालभडक केलेली जिव्हणी पाहून जस्टिस ट्रॅटर यांच्या मनांत आलं, वरवर पाहिलं तर हा एक बदनामीचा खटला आहे खरा; पण खरं पाहतां हें सारं एक गलिच्छ व्यभिचाराचं प्रकरण आहे.'

या इतक्या उताऱ्यावरून तुमच्या लक्षांत आलं असेल लेखिकेनं गौण पात्रांचं व्यक्तिदर्शन करतांना अनेक ठिकाणीं कशी गंमत केली आहे तें! जागोजागच्या या वर्णनांच्या सहाय्यानं लेखिकेनं अनेक महत्त्वाच्या गोष्टी एकदम साधल्या आहेत. त्यांपैकी पहिली अशी, की कोर्टांत चाललेल्या साक्षीपुराव्याच्या प्रश्नोत्तरांनीं किंचित कंटाळूं लागणारी वाचकाची वृत्ति गमतीचं विषयांतर करून पुन्हा उद्दीपित करण्याचं काम तिनं साधलं आहे अन् दुसरी गोष्ट अशी, की त्या योगानं कोर्टांतल्या एकंदर देखाव्याचं अगदी हुबेहूब चित्र तिला वाचकांपुढं उभं करतां आलं आहे. परंतु या छोट्या छोट्या विषयांतरांच्या योगानं या दोहोंपेक्षाहि जें एक महत्त्वाचं कार्य लेखिकेनं साधलं आहे तें म्हणजे मानवी स्वभावावरची किंचित् उपहासात्मक अशी विनोदी टीका. मिस् पेंडल्टन्, ब्राऊनरिग्, साइड-बॉटम् आणि जस्टिस ट्रॅटर यांचीं चित्रं मधूनमधून रंगवितांना लेखिका जणू वाचकाला हळूच चिमटा घेऊन अन् डोळे मिचकावून म्हणते, 'जी ती व्यक्ति आपापल्या विशिष्ट परिस्थितीनुसार अन्

पूर्वग्रहानुसार खटल्याचा विचार कसा करते, पाहिलंत ? आहे की नाही मनुष्याच्या स्वभावाची मौज ? आणि न्याय देण्यासाठीं बसलेलीं माणसं अगदी निःपक्षपाती, शुद्ध न्याय देऊं शकतील असं मानणारा मनुष्य वेडाच नव्हे काय ?

म्हणजे 'बदनामीचा खटला' या कादंबरीचं सामान्य स्वरूप जरी एखाद्या रहस्यकथेसारखं असलं तरी मानवी स्वभावाच्या ज्या मार्मिक चित्रांनीच कोणत्याहि कादंबरीला एक प्रकारच्या उच्च दर्जाची चित्तवेधकता प्राप्त होते तीं देखील या कादंबरींत तुम्हांला हवीं तेवढीं सापडतील. कादंबरीचा अखेरचा भाग तर या दृष्टीनं फार मनोज्ञ झालेला आहे. डेव्हिअट्ची बायको ॲन् त्याचं घर सोडून माहेरीं गेली होती खरी, पण तो संकटांत आहे हें समजतांच ती ताबड-तोब त्याच्याकडे निघून आली, खटल्याची सुनावणी चालली असतांना ती शक्य तों त्याच्या शेजारीं बसली होती अन् त्याला धीर देत होती. आपला नवरा मोठ्या विचित्र संकटांत सांपडलेला आहे, आणि जगानं कांहीहि म्हटलं तरी अन् न्यायदेवतेनं कसाहि निकाल दिला तरी आपल्या बायकोची आपल्यावरली निष्ठा अढळ आहे असं समा-धान या वेळीं त्याला हवं आहे ही एकच गोष्ट ॲनला समजत होती. नवऱ्याचे पूर्वीचे सारे अपराध ती या वेळीं विसरून गेली होती. खटल्याचा निकाल ज्या दिवशीं झाला त्या रात्रीं जेवणानंतर ती व डेव्हिअट् जेव्हां एकांतांत समोरासमोर बसलीं तेव्हां डेव्हिअट्नं तिला हळूच विचारलं, 'ॲन्, आतां तूं काय करणार ?' ॲन् म्हणाली, 'मी आता इथंच राहाणार.'

ते तिचं उत्तर ऐकतांच डेव्हिअट्ला गहिंवर आला. तो उठून तिच्याजवळ गेला अन् तिच्यापुढं गुडघे टेकून म्हणाला, 'ॲन्, लाडके, मी तुझ्याशीं फार वाईट वागलों.' तिनं त्याला आपल्या बाहुपाशांत घेतलं आणि तिच्या वक्षस्थलावर आपलं मस्तक टेकून डेव्हिअट् एखाद्या लहान मुलासारखा स्फुंदून स्फुंदून रडूं लागला.

खटला चालू असतांना जो आपला पति क्षणभरहि विचलित झाला नव्हता त्याला या वेळीं असं रडतांना कुणीं पाहिलं तर काय वाटेल असं ॲनूच्या मनांत आलं. पण असं कोण पाहणार होतं? या वेळीं तो आणि ती अगदी एकटी होती, तिनं त्याला खुशाल रडूं दिलं. तिच्याहि डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले; पण तिनं ते आपल्या पतीच्या मस्तकावर पडूं दिले नाहींत आणि सुखातिशयाचा हुंदकाहि तिनं तोंडाबाहेर फुटूं दिला नाहीं!

मुद्रक:—एम. इ. करीम, डी लक्स प्रिंटर्स, १३३ ए, व्हिक्टोरिया गार्डन रोड, भायखळा, मुंबई नंबर २७.

प्रकाशक:—वि. श्री. मोडक, कमला प्रकाशन, ५७५ शनिवार पुणें.

## प्रो. फडके यांचें इतर वाङ्मय

**घुकथा**

प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला

" " " " " २ रा

लोला आणि इतर गोष्टी

नमुनेदार गोष्टी

उल्हास कथा

वत्सला व इतर गोष्टी

चंद्रा व इतर गोष्टीं

लाडकी लक्ष्मी व इतर गोष्टी

माझा देश व इतर गोष्टी

**ाटकें**

युगांतर

संजीवन

तोतया नाटककार

जडावाची देवी ( २ री आ. )

आगलावी

क्षमेसाठीं अपराध

**बंध**

मानसोपचार ( २ री आ. )

मानसोन्नति

सुखाचे संसार

संततिनियमन

आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न ( २ री आ. )

प्रतिभासाधन ( ३ री आ. )

वाङ्मयविहार ( २ री आ. )

आधुनिक गीता( २ री आ. )

मानसमंदिर

१० साहित्य व संसार (२ री आ.)

११ आकाशवाणी (२ री आ )

१२ वेचलेले मोती

१३ टाकीचे घाव

१४ टाकाच्या फेकी

१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति भाग १ ला ( २ री आ. )

१६ शेलापागोटें

**ललितनिबंध**

१ गुजगोष्टी ( ३ री आ. )

२ नव्या गुजगोष्टी ( २ री आ. )

३ धूम्रवलयें

**चरित्रें**

१ दादाभाई नौरोजी (३ री आवृत्ति)

२ टेरेन्स मॅक्स्विनी

३ डी. व्हॅलेरा

४ तीन थोर देशभक्त

**व्याख्यानें**

१ गाजलेलीं भाषणें

२ मित्रहो !

**इंग्रजी**

1 Sex Problem in India ( 2nd Edition )

2 Psychology

3 Elements of Ethics

4 Manual of Logic ( 3rd Edition )

5 Birth Control

6 History of Philosophy